शारदाश्रम-माला नं. २

प्राचीन मराठी वाङ्मय

खंड १ ला

# श्री ऋद्धिपूरवर्णन

पंडीत नारायणव्यास बहालिये कृत

सपादकः-यशवंत खुशाल देशपांडे,
एम्. ए., एलूएलू. बी., यवतमाळ

यवतमाळ

१९२९

आवृत्ति १ ली] [किंमत १॥ रुपया

# पुरस्कार

यवतमाळच्या "शारदाश्रमा"च्या विद्यमाने श्री. य. खु. देशपांडे ह्यांच्या संपादकत्वाखालीं सुरूं झालेल्या "प्राचीन मराठी वाङ्मयमाले" पैकी पहिला खंड, पंडित नारायण व्यास बाहाळियेकृत "ऋद्धिपुरवर्णन", ह्या ओवीबद्ध ग्रन्थास "विदर्भ-साहित्य-संघा"-तर्फे हा पुरस्कारलेख लिहून देतांना अतिशय साभिमान आनंद होतो. पंडित नारायण व्यास हे जवळ-जवळ श्रीज्ञानेश्वरसमकालीन असून, त्यांची प्रतिभा उज्ज्वल आहे, व इतक्या प्राचीन काळच्या मराठी भाषेतीलहि ह्य पुस्तकांतील जागोजागचीं वर्णनें मनाला चटका लावल्यावांचून रहात नाहीत. काव्यदृष्टीखेरीज भाषा व इतिहास ह्या दृष्टीने ह्या प्राचीन ग्रन्थाचें महत्त्वहि तितकेंच मोठें आहे. असा सुंदर व उपयुक्त ग्रन्थ श्रमपूर्वक मिळवून, व संपादन करून, प्रकाशित केल्याबद्दल श्री. य. खु. देशपांडे व यवतमाळचा "शारदाश्रम" ह्यांचें करावें तितकें अभिनंदन थोडें आहे. श्री. य. खु. देशपांडे हे "विदर्भ-साहित्य-संघा"चे एक प्रारंभापासूनचे व कळकळीचे सभासद असून आपल्या "शारदाश्रमा"चें काम, संघाची एक शाखा अशासारख्या भावनेनेच, ते करतात, ह्यावरूनच त्यांचें ह्या कार्यावरील, आपल्या आश्रमावरील, व त्याबरोबरच संघावरील, प्रेम व्यक्त होतें; व म्हणूनच, मराठी भाषा आहे तोंवर नित्य स्मरणांत राहण्याजोग्या त्यांच्या ह्या अति महत्त्वाच्या प्रकाशनकार्याबद्दल संघाला, कार्याच्या उपयुक्ततेशिवाय व उत्तमतेशिवाय आत्मीयतेमुळेंहि, एक प्रकारचा वेगळाच आनंद व अभिमानहि वाटावा, हें स्वाभाविकच आहे. अखिल महाराष्ट्र श्री. य. खु. देशपांडे व "शारदाश्रम" यवतमाळ, ह्यांच्या ह्या श्रमांचें सर्व दृष्टींनीं पूर्ण चीज करील अशी आशा आहे.

**ब. ग. खापर्डे**
सरचिटणीस, वि. सा. संघ.

## "प्राचीन मराठी वाङ्मय" या ग्रंथमालेस

# शुभाशीर्वाद

प. महन्त **श्रीदत्त-लक्षराज कवी** *र* **महानुभाव** संस्थान श्रीदेवदेवेश्वर देवापूरः माहूर यांचेकडून.

यवतमाळ येथील "शारदाश्रम" या संस्थेतर्फे "प्राचीन मराठी वाङ्मय" या नांवाची ग्रंथमाला उदयास आली आहे. त्याबद्दल 'शारदाश्रमा' मध्यें कार्य करणाऱ्या निरपेक्ष विद्वान मण्डळीचे आम्ही अत्यंत प्रेमाने अभिनंदन करतों.

वरील ग्रंथमालेच्या प्रकाशनाने मराठी वाङ्मयांत अपूर्व भर पडेल असा आम्हांस भरवसा वाटतो. या मालेमध्यें १२ व्या व १३ व्या शतकांतील महानुभाव सांप्रदायीक ग्रंथ प्रकाशीत करण्याचा चालकांचा हेतु स्तुत्य आहे. या ग्रंथमालेंतील 'प्रथम खंड' म्हणून "श्रीऋद्धिपुरवर्णन" हा बाहालिये ग्रामनिवाशीकृत जो काव्यग्रथ नुकताच छापविला आहे तो आम्ही आद्यन्त वाचून पाहिला. मूळ काव्यग्रंथ व त्यांतील कठीण शब्दांवर १६ व्या शतकांतील टीपा आणि "श्रीगोविंदप्रभुचरित्र" ग्रथामधील निवडक लीलांचे उतारे देऊन विद्वत्तेस योग्य अशी मांडणी केली आहे. ती सांप्रदायीक सद्भात्रिकांना अत्यंत उपयोगी होईल.

महानुभावीय पंथाचें आद्यक्षेत्र श्रीऋद्धिपूर यासंबंधानें, अत्यंत परिश्रमपूर्वक महाद्वारांत प्रतिष्ठित मूर्तींचा फोटो, यासंबंधीं यथातथ्य माहिती आणि राजमठाचा जुना नकाशा देऊन पुस्तकाची संग्राहकता वाढविली आहे. तरी प्रत्येक महात्मधर्माभिमानी जनतेनें या ग्रंथास आश्रय देऊन आपला धर्माभिमान जागृत ठेवावा अशी आमची सर्वांस विनंति आहे.

श्री० यशवंत खुशाल देशपांडे, एम्. ए., एल्एल्. बी., या विद्वान सद्गृहस्थांनीं शोधपूर्वक लिहिलेली प्रस्तावनाहि संपूर्ण वाचून पाहिली. प्रस्तावनेमुळें महात्मपंथियांना तसेंच मराठी भाषेच्या अभ्यासकांना ग्रंथाचें रहस्य कळावयास फार सोईचें होईल.

वरील ग्रंथाच्या प्रकाशनानें महानुभावीय समाजास जगापुढें प्रामुख्यानें आणावयाचे यवतमाळ येथील शारदाश्रमानें श्रेय संपादन केलें आहे. वास्तवीक महात्मधर्म-

ग्रंथप्रकाशनाचे कार्य पंथांतील विद्वान संन्यासी व उपदेशी धनीक वर्गाने हातीं घ्यावयास पाहिजे होते. त्याकडेस अद्यापपर्यंत संप्रदायीक विद्वानांचें अंतःकरण वेधावे तसें वेधलें नाहीं ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. यास प्रमाण परिशिष्ट अ आणि ब हीं पुस्तकाच्या शेवटीं विद्यमान आहेतच. तथापि तसा स्वतंत्र रीतीनें प्रयत्न होईपर्यंत महानुभाव पथांतील संन्यासी वर्गाने ग्रंथद्वारां आणि धार्मिक सद्गृहस्थवर्गानें द्रव्यद्वारां या शारदाश्रमाने चालविलेल्या सत्कार्यास आत्मीयतेच्या भावनेनें हातभार लावावा अशी आमची इच्छा आहे. शारदाश्रमानें सद्धेतूनं चालविलेल्या या राष्ट्रकार्यास अंतःकरणपूर्वक आमचा शुभाशीर्वाद आहे.

पौष शुक्ल ५ शके १८५०
श्रीक्षेत्र देवदेवेश्वर-माहूर

महात्मवाङ्मयसेवक
**म. दत्त. क. महानुभाव**

# संपादकीय निवेदन

प्राचीन मराठी वाङ्मयाचा प्रथम खंड म्हणून हें श्री ऋद्धिपुर वर्णन काव्य महाराष्ट्रशारदेच्या चरणी अर्पण करीत आहोत. यवतमाळ येथील शारदाश्रमांत सहकार्य करणारे वाङ्मयसेवक अशा प्रकारचे आणखी दहा बारा खंड प्रकाशीत करण्याची उमेद बाळगीत आहेत. तीन चार खंडाच्या मूळ ग्रंथाच्या नकला तयार असून टीप ग्रंथाच्या नकला करणें सुरू आहे. प्रस्तुत खंडास जोडलेला टीप सोळाव्या शतकाच्या पूर्वीचा असून त्रोटक आहे. हा टीप छापल्यानंतर दत्तराज मराठे या प्रसिद्ध टीपकाराचा साती ग्रंथावरील सतराव्या शतकांतील विस्तृत टीप आम्हांस उपलब्ध झाला व पुढील खंडांस तोच टीप द्यावयाचें आम्ही ठरविले आहे. या टीप ग्रंथावरून महाराष्ट्रशब्दकोशास जुने मराठी शब्द पुरविण्याचे कार्य शारदाश्रमांत सुरूं झालें आहे.

प्रस्तुतच्या खंडांत दिलेला टीप आम्ही जशाचा तसाच दिला आहे त्यामुळे कांही ठिकाणीं उघड उघड चुकीचा असा अर्थ आम्हास वाटला तरी तो बदलण्याचा प्रयत्न केला नाहीं. सांप्रदायीक टीप द्यावा हाच आमचा हेतु होता. पुढील खंडांत अभ्यासकांच्या सोयीकरतां अवश्य वाटेल तेथें संपादकीय टीपा कंसात देण्याचे ठरविलें आहे.

मूळ ग्रंथाची नक्कल करण्यासंबंधानेहि विद्वानांचा, आम्ही योजिलेल्या धोरणाशीं, मतभेद होण्याचा संभव आहे. वत्सनंदनी, कार्दिबिनी इत्यादि अशुद्ध रूपे मूळ प्रतींत आहेत तशींच आम्ही कायम ठेविलीं आहेत. प्रतिलेखनासंबंधाने प्रस्तावनेंत २३व्या परिच्छेदांत आम्ही विवरण केलें असून पुढील खंडांकरितां विद्वानांच्या व तज्ज्ञांच्या सहविचारानें एक सर्वसाधारण धोरण ठरवूं एवढेंच येथे आश्वासन देतों. शेवटी जोडलेल्या शुद्धिपत्रकाकडेस वाचकांनीं अवश्य लक्ष द्यावें.

यवतमाळसारख्या एकीकडेच्या गांवीं वाङ्मय, इतिहास यासंबधाने संशोधन, संरक्षण, प्रकाशन इत्यादि प्रकारच्या चालविलेल्या शारदादेवीच्या सेवेची स्फूर्ति व्हावयास विदर्भ-साहित्य-संघाची स्थापनाच कारणीभूत झाली आहे; किंबहुना शारदाश्रमांत कार्य करणारे सहकारी वाङ्मयसेवक विदर्भ-साहित्य-संघाचे सभासद असून संघाचें उद्दिष्ट कार्यच पुढें चालवीत आहेत.

शारदाश्रमाजवळ द्रव्यनिधि नसल्यामुळे प्राचीन मराठी वाङ्मयाचे खंड प्रकाशीत करणे वाङ्मयाभिरुची असणाऱ्या रसिक गृहस्थांच्या औदार्यावरच अवलंबून आहे. प्रस्तुत खंड प्रकाशीत करावयास लागणारे द्रव्य श्री. जयवंत नारायण लोणकर, इजारदार व ऑ. माजिस्ट्रेट पांढुर्णा, या महानुभावधर्मानुयायी गृहस्थांनी लाविले आहे. तसेच पुढील तीन खंडांच्या प्रकाशनास लागणाऱ्या द्रव्यसाहाय्याचेंही निरनिराळ्या तिघा गृहस्थांकडून अभिवचन मिळाले आहे. त्या सद्गृहस्थांची नावें यथासमय प्रसिद्ध करण्यांत येतील. शारदाश्रमांत चालविलेल्या वाङ्मयसेवेच्या पुण्याचे वरील सद्गृहस्थ अनायासेच भागीदार झाले आहेत.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे सन्मान्य अध्यक्ष, प्राचीन मराठी वाङ्मयाचे विद्वान व सुप्रसिद्ध तज्ज्ञ आणि महानुभावीय सांप्रदायांतील पूजनीय विद्वान महंत आणि अनेक सन्मान्य विद्वान संन्याशी यांनी प्रस्तुत योजिलेल्या प्राचीन मराठी वाङ्मयमालेस शुभाशीर्वाद दिले आहेत; यांतील कांही शुभाशीर्वाद या प्रस्तुत खंडामध्यें शेवटीं जोडिले आहेत.

प्रस्तुत पुस्तकावर महाराष्ट्रांतील अनेक विद्वान तज्ज्ञांकडून विधायक टीका यावी अशी शारदाश्रमांतील साहित्यसेवकांची अपेक्षा आहे. वरील टीपांचा कृतज्ञतापूर्वक उपयोग करून घेऊन या मालेंतील पुढील खंड शक्य तोपर्यंत निर्दोष व अभ्यासकांस उपयुक्त करण्याचा प्रयत्न करण्यांत येईल.

आम्ही योजिलेली प्राचीन मराठी वाङ्मय ग्रंथमाला त्या त्या सांप्रदायिकांस आणि प्राचीन मराठी भाषेचा अभ्यास करणारांस उपयुक्त व्हावी म्हणून प्रसिद्ध करण्याचे ठरविलें आहे. ह्या धोरणानें केलेल्या सूचनांचाही मोठ्या आनंदानें विचार करण्यांत येईल व आमचा असा विश्वास आहे कीं या ग्रंथमालेंतील खंड हिंदुस्थानांतील विश्वविद्यालयांमध्यें मराठी भाषेच्या उच्च अभ्यासक्रमांत लावण्यास फार उपयोगाचे होतील. त्या दृष्टीनेही विश्वविद्यालयांतील अध्यापकांकडून सूचना आल्यास त्यांचा पुढील खंडप्रकाशनाच्या वेळीं उपयोग केला जाईल.

पुस्तकाची व्यवस्थीत व सुंदर छपाई व्हावयास आर्यसंस्कृतीचे विद्वान आणि उद्योगी मालक डॉ. वा. गो. परांजपे, एम्. ए., एल्एल्. बी., डी. लिट्., यांचेच परिश्रम कारणीभूत झाले आहेत.

ता. १-३-२९
यवतमाळ

**यशवंत खुशाल देशपांडे**

# श्री ऋद्धिपुरवर्णन

## प्रस्तावना

### १ साती ग्रंथ

श्री ऋद्धिपुरवर्णन हे काव्य महानुभावीय मराठी वाङ्मयांत साती ग्रंथ म्हणून प्रसिद्ध असलेल्या सात काव्यांपैकी एक होय. बहुधा ही सातही काव्ये एकाच पोथीत लिहिलेली आढळतात. हे सात ग्रंथ खाली दिले आहेत.

| | ग्रंथ | कवि | शक |
|---|---|---|---|
| १ | शिशुपालवध | भास्करकवीश्वर व्यास | ११९५ |
| २ | एकादश स्कंद (उद्धवगीता) | ,, | ११९६ |
| ३ | वत्सहरण | दामोदरपंडीत | १२०० |
| ४ | नरेंद्ररुक्मिणीस्वयंवर | नरेंद्रकवि | १२१३ |
| ५ | सह्याद्रिवर्णन | रवळो उर्फ राघोव्यास | १२२४ |
| ६ | ज्ञानप्रबोध | पंडीत विश्वनाथ | १२५३ |
| ७ | ऋद्धिपुरवर्णन | नारायणपंडित | १२८५ |

वरील सातही ग्रंथ मराठी ओवीवृत्तांत आहेत; ह्या संबधाने माहिती त्या त्या ग्रंथांच्या प्रस्तावनेत दिली जाईल. येथे फक्त ऋद्धिपुरवर्णन या काव्यासंबधानेच विचार करावयाचा आहे.

### २ ऋद्धिपुरवर्णन

कालानुक्रमाने हे काव्य साती ग्रंथांपैकीं शेवटचें आहे तथापि वर्ण्य विषयानुक्रमानें पाहातां तें प्रथम गणलें पाहिजे. कारण या ग्रंथांत महानुभाव पंथीयांना अत्यंत पवित्र असें जें ऋद्धिपुर क्षेत्र त्याचें वर्णन आलें आहे. या क्षेत्राला महानुभावांच्या दृष्टीनें अनेकांपैकीं प्रमुख तीन गोष्टींकरितां पावित्र्य आलें आहे.

( १ ) येथें श्रीगोविंदप्रभु या अवतारी पुरुषाच्या 'लीला झाल्या व येथेंच त्यांचें अवतारकार्य झालें. ( २ ) पंथाचा संस्थापक श्रीचक्रधरस्वामी यांची

आणि श्रीगोविंदप्रभु यांची प्रथमच भेट येथे झाली आणि येथेच श्रीचक्रधरस्वामीस उपदेश झाला. ( ३ ) महानुभाव पंथाची स्थापना येथेंच होऊन येथूनच महानुभाव उर्फ महात्मधर्म याचा प्रसार झाला. सारांश ऋद्धिपुर हे महानुभाव पंथाच्या संस्थापनेपासून आजतागायत पवित्र केंद्र झालें आहे.

अवतारी पुरुषांच्या चरणस्पर्शाने पवित्र झालेल्या अशा ऋद्धिपुर क्षेत्राचे एकदा तरी दर्शन घेतल्याशिवाय जीविताचे साफल्य व्हावयाचे नाही, असा महानुभावांचा विश्वास आहेः आणि कित्येक भाविक तर या पवित्र क्षेत्राच्या नित्य आणि नैमित्तिक भेटी घेऊन आणि कित्येक तर तेथे आजन्म वास करून आपल्या जीवितांचें सार्थक करून घेतात. असल्या पवित्र स्थळाचे ज्यांना वारंवार दर्शन घडत नाहीं त्यांना नवविधा भक्तीपैकीं स्मरण, मनन इत्यादिकांनीहि पुण्य लाभावें म्हणून या छोट्याशा काव्यग्रंथाचा उपयोग होतो. कवीने स्वतःस या पवित्र क्षेत्राच्या दर्शनास जाणारा यात्री कल्पून " दुरोनिया ते श्रीऋद्धिपुर देखिले " तेव्हांपासून अगदी राजमठातील प्रभूची सेज पाहीपर्यंत कवीच्या मनांत जे विचार आणि ज्या भावना उत्पन्न झाल्या त्याचे वर्णन कवीने या काव्यांत केले आहे. शेवटी "हें ऋद्धिपुरवर्णन जे अभ्यासिती करुनि मनन तेआंसि कैवल्याचे साधन दुरी नोव्हे' अशी प्रतिज्ञाहि कवीने ठेऊन दिली आहे.

## ३ ग्रंथाचा रचनाकाल.

हे छोटेसें काव्य मराठी ओवीछंदांत असून त्यांत केवळ ६४५ ओव्या आहेत या काव्याचा कर्ता नारायणपंडित व्यास उर्फ नारो बहाळिये व्यास हा होय.

या काव्याचा रचनाकाल एका प्रतींत दिला आहे तो असा

" बाणाष्टयमचंद्र शोभनेसी : आषाढें निशाकर चंद्रेसी :
ग्रंथु पावला सिद्धीसी : ऋद्धिपुरवर्णनु ॥'

या ओवीवरून " अंकानां वामतो गतिः " या नियमानें शक १२८५ हा काल येतो. ही ओवी सर्व प्रतींत सांपडत नाहीं त्यामुळें ती प्रक्षिप्त असावी असें वाटतें. तथापि तींत दिलेला काळ कवींच्या प्रचलित असलेल्या गुरुपरंपरेशीं सुसंबद्ध असल्यामुळें तो खरा धरून चालावयास हरकत नाहीं. " महानुभावीय मराठी वाङ्मय " या पुस्तकांत कवींची परंपरा दिली आहे; तींत श्रीगोविंदप्रभूचे शिष्य श्रीचक्रधरस्वामी, त्यांचे शिष्य श्रीनागदेवाचार्य, त्यांचे शिष्य श्रीभास्करकवीश्वर व्यास,

त्यांचे श्री परशरामाचार्य, त्याचे श्री पेठे हरि व्यास, त्यांचे श्री अचल मुरार मल्ल व ह्यांचे बहाळे नारो व्यास असें दिले आहे. शककालाची ओंवी असलेल्या पोथीत आणखी एक ओवी आहे ती अशीः---

अचल मुरारीनंदने : माल्लिनाथ परमार्गे विवर्द्धने :
तया सुतु नारायणें : बोलीला श्रीऋद्धिपुरवर्णनु ।।

वरील परंपरेतील श्रीचक्रधरस्वामींचा बदरीकेदारप्रयाण शक ११९३–९४, श्रीगोविंदप्रभुचा निर्याणकाल शक १२०८, श्री नागदेवाचार्यांचा समाधिकाळ शके १२२४, पेठे हरि व्यासांचा ग्रंथरचनाकाल शके १२६० यावरून नारायण व्यासाच्या ऋद्धिपुरवर्णनाचा रचनाकाल शके १२८५ असणे विसगत नाहीं. कवी हे महानुभावपंथीय कवीश्वराम्नांयांतील दीक्षित होते हे ग्रंथाच्या शेवटल्या समासावरून दिसून येते; तो समास असा: —

"इति श्रीपरमधर्मे महामोक्षिक साधने श्रीनागार्जुनोपदेशे कवीश्वराम्नाय दीक्षित पंडित नारायण व्यास बहाळियेकृत श्रीऋद्धिपुरवर्णन सपूर्णम् "

या काव्यांत महानुभाव पंथाचीं तत्वे निगडीत केली आहेत हे ग्रथाच्या वाचनानें दिसून येईल.

## ४ कवीचें चरित्र.

कवीच्या चरित्रासबंधाने फारशी माहिती उपलब्ध नाही. कवीनें या ग्रंथांत ३० व्या ओंवीपासून ४२ व्या ओवीपर्यंत स्वात्मनिवेदनपर ओंव्या दिल्या आहेत. त्या ओंव्यावरील टीपेमध्ये टीपकारांनीं वरील ओंव्यावरून स्वात्मचरित्राचा निर्देश केला आहे. नारायणव्यास हे कवि मूळ बाहाळिये या ग्रामाचे राहणारे होत. हें गांव हल्ली पश्चिमखानदेश जिल्ह्यांत असून नाघळी स्टेशनपासून तें उत्तरेस २ कोस व नाशीकहून पश्चिमेस ३ कोस आहे. तेथे हल्ली वस्ती आहे. या गांवास कोणी रजपूत राजा त्याकाळीं राहात असून नारायणव्यास हे त्याचे आश्रित असत.

या कवीचे वडील या मांडलीक राजाचे मुख्य ज्योतिषी होते. राजावर यांचें फार वजन होते तें इतके कीं राजा कोणतीहि गोष्ट यांची सल्ला घेतल्याशिवाय करीत नसे. त्यामुळे दरबारांतील इतर मंडळींस त्यांचेविषयीं द्वेषभाव उत्पन्न झाला. या राजदरबारी मंडळींनीं नारायणपंडिताच्या वडिलाविरुद्ध

कांहीं राडयत्र ( कुभाड ) रचून त्यास ठार मारविलें. त्यावेळीं नारायण कवि अज्ञानदशेत होते. त्याचे पालनपोषण त्यांच्या मातुःश्रीनें केलें. सज्ञान झाल्यावर ह्यांना आपल्या वडिलांची हकीकत समजली. विद्याभ्यास करून त्यानी विद्वत्ता संपादन केली व त्यांनीं अथर्ववेदाचा अभ्यास केला जारणमारण, मंत्रतंत्र, जादुटोणा इत्यादि मार्गांचा अवलंब करून नारायण पंडितांनी जे जे म्हणून त्यांच्या पित्याच्या वधास कारणीभूत झाले होते त्यांचा त्यांचा त्या राजाच्या समक्ष निःपात करून आपल्या वडिलांच्या वधाचा सूड उगविला. नारायण कवि हे फलज्योतिषांतहि फार निष्णात झाले. अनेक हत्या आपल्या हातून घडल्याचा नारायणपंडितास पुढे फार पश्चात्ताप झाला, ह्याचाच अनुवाद प्रस्तुत काव्याच्या ३३ व्या ओवींत केला आहे घडलेल्या दोषांचे निरसन व्हावयास नारायणपंडितांनी महात्मधर्माची दीक्षा घेऊन संन्यासाश्रम स्वीकारिला आणि मग त्यांनीं ऋद्धिपुर येथे येऊन वास्तव्य केलें. सन्यास घेतल्यावर नारायणपंडित उर्फ नारोव्यास यांची आणि ज्ञानप्रबोध या ग्रंथाचे कर्ते श्री विश्वनाथपंडीत बाळापूरकर यांची गांठ पडली त्यावेळी विश्वनाथपडितांनी कवितामय पृच्छा केली त्यास नारोव्यासांनींही पण कवितामय उत्तर दिलें. तेव्हां विश्वनाथ पंडितांनी त्यांना तुम्ही ईश्वराचें वाक्पुष्पार्चन का केलें नाहीं म्हणून प्रश्न केला. ती गोष्ट नारोव्यासांस मान्य होऊन त्यांनी हा ऋद्धिपुरवर्णन ग्रंथ लिहिला ग्रंथावरूनहि असें दिसते कीं प्रथमतः संसारामध्ये व्यग्र असतांना तारुण्यामध्यें विवेकाचा ताबा न राहिल्यामुळें कवीच्या हातून अनन्वित कृत्ये घडलीं व त्यामुळे सुकृतक्षय झाला. अशा रीतीनें संसारतापानलाने दग्ध झाल्यावर कवीने महात्ममार्गाकडेस (महानुभावीय पंथाकडेस) धांव घेतली व त्या मार्गानेच गेल्यावर प्रभुचरणोदकाने शांति मिळाली. कवीनें हा ऋद्धिपुरवर्णन ग्रंथ संन्यासदीक्षा घेतल्यानंतर उत्तरवयांतच लिहिला आहे.

### ५ कवीचे ग्रंथ

पंडित नारायण व्यास यांचा हा एकच स्वतंत्र काव्यग्रंथ आहे. याशिवाय ढंक म्हणून एक खंडकाव्य आणि शिवाय किरकोळ स्फुट पद्यें या कवीचीं नुकतींच उपलब्ध झालीं आहेत. या स्फुट पदांची एक पोथी चांदुरबाजार येथें नागेराज बुआ महानुभाव यांच्याजवळ आहे.

ढंक या खंडकाव्याचीं एकंदर १६ पद्यें आहेत. भव म्हणजे संसार यास

भुजंगाची उपमा देऊन त्या संसारार्त स्थितीसि डंकाची (दंशाची) उपमा या काव्यांत दिली आहे व तो दंश उतरण्याकरितां मांत्रिक, मत्र इत्यादिकांच्या योजनेचे वर्णन करून परमेश्वरभक्तीचा महिमा या काव्यांत गायिला आहे.

शेवटचें पद असे आहे

भव भुजंग दिठी : पाडीलेया कव्हणीही नुठी :
मंत्रे तंत्रे वांणे मृष्टी : निज दृष्टी वाचोनीया :
सकल मगल पावना . सकळ जीवाचेया जावना :
परमुखाचे माधन क्रिया अवलोकन तुझे देवा :
जयजय परमेश्वरा परात्परा : परात्परा परब्रह्मा :
जयजय कैवल्यदानी : प्राकृना वाचा :
काइ जीउनि बाहाळेया : नारायणा स्वामी
पुनर्भवा पावौनि : राखै देवा ॥१६॥ एव डक सपूर्ण

के. भावे यांच्या कविकाव्यसूचीमध्ये ऋद्धिपुरवर्णनाशिवाय अनवेल, वनजारा, साइलेपद, अत्राका, रुक्मिणीपत्रिका, रुक्मिणीस्वयंवर आणि आरत्या इतके प्रबंध कवीच्या नांवावर दिले आहेत

## ६ काव्यांतील प्रसंग

आतां आपण मूळ काव्याकडेस वळू प्रथमतः कवीने परावाचेला नमन करून तिचे महत्व वर्णन केले, नतर नागाविंकेची स्तुति गाइली व तिला ब्रम्हतनया शारदा कल्पून नमस्कार केला. नागाविका ही पैठणकर असून श्रीचक्रधर स्वामींची शिष्यीण होती इला श्रीचक्रधरस्वामी बाईसा म्हणत. तीर्थमालिकेत शाकेशास्त्रपुराणभूपरिमिती म्हणजे शके ११८६ मध्ये नागाबिकेची श्रीचक्रधराशीं प्रथम भेट झाल्याचे लिहिले आहे नंतर महानुभावसंप्रदायाचे मार्गप्रसारक श्रीनागदेवाचार्य यांना नमस्कार करून कवीने परमार्गाचे महत्त्व व उपयुक्तता वर्णिली. नंतर कवीने आत्मनिवेदन वर्णन करून स्वतःच्या ससारार्त स्थितीचे कार्यकारणरूप वर्णन करून त्यांतच प्रस्तुत ग्रंथाच्या कर्तृत्वाचे कारण जे ऋद्धिपुरवर्णन ते बीजरूपाने सांगून टाकिले. ती ओवी अशीः—

जें आर्तीसि कारणें : संसारश्रमाचे विसंबणें :
ते श्रीऋद्धिपुर देखिले तेणें : दुरौनिया : ॥४४॥

कवीची संसारातें स्थिती नाहीशी करुन संसाराच्या श्रमाचें परिहरण करावयास श्रीऋद्धिपुराचें दर्शनच योग्य आहे असे या ओंवीनें दर्शविलें. कवीच्या मनाची स्थिती ऋद्धिपुरदर्शनानें किती तल्लीन झाली ही पुढील दृष्टांताने दिसून येईल.

सासुरवासें शीणलीं : तियें भेटे जवि माउलीं :
असो हे तैसी परि जालीं : श्रीऋद्धिपुर देखिलेआ : ॥४८॥

इतका प्रेमभाव वाटावयास असे ऋद्धिपुराचे महत्त्व तरी काय आहे हें कवी पुढीलच ओंवीत सांगतात

ढाळोळिता तीनि लोका : मां उपमा न देखे आणिका :
जे जाले जगदेकनायका : क्रीडास्थानु ॥४९॥

या ऋद्धिपुराशी तुलना करावयास तिन्ही लोक शोधिले तरी त्यांस उपमा सांपडावयाची नाही. कारण या पुराचे वैशिष्ट्यच तसें आहे, कारण ते जगदेकनायकाचे क्रीडास्थान झाले आहे अशा प्रकारची "ते देखौनि देवनगरी" तेया कवी "साष्टांग नमस्करी". नंतर कवी म्हणतात की ते "तापासी बोहरी" कशी "जाली ते परिएसा पां". असे ५४ व्या ओवीत कवीने सांगून पुढील वर्णनास सुरवात केली आहे.

## ७ श्रीगोविंदप्रभु आणि श्रीचक्रधरस्वामी यांचीं चरित्रें:—

तथापि पुढील विवेचनाकडेस वळावयापूर्वी ज्या श्रीप्रभूंच्या चरणांकितांनीं ऋद्धिपुरास महानुभावीय पथास पावित्र्य आलें त्या अवतारी पुरुषांविषयी व तदनुषंगाने महानुभाव पंथासंबंधाने सारांशरूपाने माहिती दिली असतां ती अप्रस्तुत होणार नाही.

ज्यांच्यामुळे या पुरास पावित्र्य आलें ते अवतारी पुरुष श्रीगोविंदप्रभु ऊर्फ गुडम प्रभु आणि श्री चक्रधरस्वामी हे होत. श्रीगोविंदप्रभूसंबंधाने माहिती प्रभूच्या ऋद्धिपुरचारित्र नांवाच्या प्राचीन ग्रंथामध्यें मिळते व श्रीचक्रधरप्रभूंसंबधाने तर महींद्रव्यासाचें लीळाचरित्र हे प्रसिद्धच आहे; या शिवाय स्थानपोथीमध्ये उभयता अवतारी पुरुषांच्या स्थानमाहात्म्यदर्शक लीळा वार्णिलेल्या आहेत. उपरिनिर्दिष्ट ग्रंथ हे बहुधा या अवतारी पुरुषांच्या काळापासून एक शतकाच्या आंतच तयार झाले आहेत. याशिवाय त्यांच्या चरित्रावर आजपर्यंत महानुभावीय पंथाचें विस्तृत वाङ्मय तयार झाले आहे.

## (अ.) श्रीगोविंदप्रभूंचें चरित्र

श्रीगोविंदप्रभूंचा जन्म, अवतारसमाप्ति आणि मधल्या ३१४ निवडक लीळा श्रीऋद्धिपुरचरित्र या गद्यग्रंथातून उद्धृत केल्या आहेत व ते मूळ उतारे या ग्रंथाच्या शेवटी परिशिष्टरूपानें दिले आहेत त्याचप्रमाणे ऋद्धिपुरासंबधानें स्थानपोथीमध्ये जे वर्णन आलें आहे तेंहि अभ्यासकांच्या सोयीकरिता मूळ गद्यात जसेच्या तसेच परिशिष्टांत दिलें आहे

ऋद्धिपुराजवळ काटसुरे गव्हाण नांवाच्या गावी अनंत नायक नावाचे काण्व-शाखी ब्राह्मण होते, याच्या पोटी श्रीगोविंदप्रभूंचा जन्म झाला मातेचें नाव नेमा-इसे (नेमांबिका) होतें. त्यांची मुलें जगत नसत म्हणून दगड, धोंडा असें नांव ठेवा-वयाचा हल्ली कोठे प्रचार आहे त्याप्रमाणें त्यांनी या मुलाचें नाव गुंडोबा असें ठेविलें जन्मानंतर वर्ष दोन वर्षातच मातापितर निवर्तले त्यामुळे श्रीगोविंदप्रभूंच्या मावशांनी व मामांनी त्यांना वाढविलें सातव्या वर्षी त्यांना ऋद्धिपुरास आणून मौंजीबंधन केलें श्रीगोविंदप्रभूंनी अनेक चमत्कार केल्यामुळे व त्यांची विदेही वृत्ति असल्यामुळे त्यांची अवतारी पुरुष म्हणून प्रसिद्धी झाली

## (ब) श्रीचक्रधरस्वामींचें चरित्र.

श्रीचक्रधरस्वामी हे पूर्वाश्रमी भरवस (भडोच) येथील प्रधान सामवेदी नागर ब्राम्हण विशालदेव यांचे पुत्र हरिपाळ देव होत त्रिमल्लदेव हे भरवसला राज्य करीत होते व त्याच्या पदरी विशालदेव प्रधान असत त्रिमल्लदेवास पुत्र-संतति नसल्यामुळे त्यांनी अंतसमयी आपले राज्य विशालदेव प्रधानाच्या स्वाधीन केलें बापाच्या राजवटीत हरिपाळदेवानें राजकारण, लढाया इत्यादिकांत भाग घेतला होता संसारसुखाचा उपभोग घेतल्यावर आपली माता माल्हणदेवी इच्या अनुज्ञेने हरिपाळदेवानें रामयात्रेस (रामटेक येथ) जावयाची सिद्धता केली मार्गांत श्रीऋद्धिपुरी श्रीगोविंदप्रभूंचे दर्शन झालें ऋद्धिपुरी उभयता अवतारी पुरुषांची राधवणहाटामध्ये प्रथम भेट झाली, व तेथेंच श्रीगुंडमप्रभूंनें हरिपाळ देवास ज्ञानशक्ति देऊन अनुग्रह केला. हरिपाळदेवाचें नाव चक्रधर असें श्रीगोविंद-प्रभुनेंच ठेविलें त्यानंतर श्रीचक्रधरांनीं आपल्या वयाच्या ११० व्या वर्षी प्रति-ष्ठान (मुंगी पैठण) येथे सन्यासाश्रम स्वीकारिला व ऋद्धिपुर येथें महानुभाव

पथाची स्थापना केली. श्रीचक्रधरस्वामींनीं नागदेवाचार्यादि अनेक शिष्य केले. धर्मप्रसाराचें कार्य केवळ ९ वर्षें करून आपल्या वयाच्या ११९ व्या वर्षीं शके ११९३–९४ चे सुमारास श्रीचक्रधरस्वामींनीं बदरीकेदाराकडेस प्रयाण केलें. ह्या-नंतर त्यांचेसंबधीं कोणी कांही ऐकिले नाहीं श्रीचक्रधरस्वामीनतर श्रीगोविंद-प्रभु १६ वर्षें हयात होते. श्रीचक्रधरस्वामींच्या शिष्यांपैकी नागदेवाचार्य, म्हाइंभट, महादांबा, कोथळोबा इत्यादि शिष्य श्रीगोविंदप्रभूजवळ अवतार-समाप्तीपर्यंत होते ऋद्धिपुर येथे श्रीगोविंदप्रभु प्रथम तीकोपाध्यांचे येथे राहत; पण गांवास अग्नि लागून तीकोपाध्यांचे घर जळाल्यावर ते राजमठांत अवतार-समाप्तीपर्यंत राहूं लागले. त्यांचा शेवट शके १२०७ व्यै संवत्सरे भाद्रपद शु॥ ८ मी जेष्टा नक्षत्र अवसीं पाहारा आंत जाला असे ऋद्धिपुर चरित्रांच्या मज-जवळील प्रतीत लिहीलें आहे. कांहीं महंतांच्या माहितीवरून तो निर्याणकाळ शके १२०८ आषाढ वद्य ७ बुधवार हा आहे असे कळते.

श्रीगोविंदप्रभूचा जन्मशक ऋद्धिपुर चरित्रात लिहून ठेविलेला आढळत नाहीं तथापि त्यांचा जन्मशक १०८३ वृषनाम संवत्सर भाद्रपदमासे अष्टमी शु॥ सोमवारी असा येतो असे परंपरेच्या माहितीवरून समजते. शारंगधर पंडित भोजनेकृत तीर्थमाळिका ग्रथांत नखि शशि वरुषी श्री ऋद्धिपूरीं विहारी ॥ मग विभु निजधामा वास इच्छागिकारी ॥ असे लिहितात त्यावरून गोविंदप्रभु यांना ऋद्धिपुरात १२० वर्षे अवतारकार्य केले असे मानावे लागते व ५ वे वर्षी श्रीगोविंदप्रभू ऋद्धिपुरला आले व सातवे वर्षी मौंजीबंधन झाले. या प्रमाणावरून श्रीगोविंदप्रभूचा काळ शक १०८३ चा येतो. या दोन्ही अवतारी पुरुषांच्या जन्मशकासबधानें व अवतारशकासबंधानें साधनाभावी ऐतिहासिक कसोटी लावून निश्चय करता येत नाहीं.

श्रीगोविंदप्रभूची अवतारसमाप्ति झाल्यानतर आउसा खेरीजकरून श्रीचक्र-धरांचे श्रीनागदेवाचार्यादि सर्व शिष्य गंगातीरास गेले आणि महानुभावधर्माचा प्रसार मुख्यत्वेंकरून या पथाचे प्रथमाचार्य जे श्रीनागदेवाचार्य यांनीच केला.

## ८ महानुभाव पंथ व त्यांचीं मतें.

**महानुभावपंथाच्या धर्ममतासंबंधानें आणि त्यांच्या तत्वज्ञानासंबंधानें विस्तृत विवेचन करावयाचें हें स्थळ नव्हे. तथापि सारांशरूपानें येवढे सांगितलें म्हणजे**

पुरें आहे. महानुभावपंथ श्रीमद्भगवद्गीतेंतील अहिंसा तत्वावर स्थापिला असून महानुभावीय लोक भगवद्गीता व श्रीमच्चक्रधरस्वामीचे मुखांतून निघालेले सूत्ररूप पाठ आद्यधर्मग्रंथ मानतात. तसेंच श्रीदत्तात्रय आणि श्रीकृष्ण हे अवतार मानीत असल्यामुळे श्रीकृष्णलीलावर्णनपर श्रीमद्भागवत दशमस्कंद आणि एकादश स्कंद हे पूज्य ग्रंथ मानतात. वरील कारणांमुळेंच या महानुभावीय पंथात चरित्रपर, स्थळवर्णनपर, टीकारूप व तदनुषांगिक विषयावर श्रीमच्चक्रधरकाळा-पासून अनेक ग्रंथ निर्माण झाले आहेत; त्यापैकींच प्रस्तुतचा " ऋद्धिपुरवर्णन " हा काव्यग्रंथ होय.

नागदेवाचार्यांचा शिष्य केशवपंडित यांनीं, महिंद्र व्यास यांनी लिहिलेल्या लीलाचरित्र ग्रंथांतून आढळून आलेली श्रीचक्रधरस्वामींच्या मुखांतून निघालेली सूत्ररूप वचनें एकत्रित करून, सूत्रपाठ म्हणून एक छोटेखानी ग्रंथ केला आहे त्या ग्रंथांत महानुभावीयांचे तत्वज्ञान सूत्ररूपानें ग्रथित केलें आहे. हा महानुभावीयांचा इतका पवित्र ग्रंथ मानला जातो की दक्षिणमहाराष्ट्रापासून थेट काश्मीर–काबूलपर्यंत वस्तीस असलेल्या प्रत्येक धार्मिक प्रवृत्तीच्या पंथीयास, मग त्यास मराठी भाषा अवगत असो अथवा नसो, तो मुखोद्गत आलाच पाहिजे व त्या ग्रंथाचा रोज त्यानें पाठ केलाच पाहिजे असा साधारण नियम आहे.

महानुभावीयांचे संस्कृत–हिन्दीमध्येही ग्रंथ आहेत परंतु मुख्यतः ते मराठी भाषेतच आहेत व आपल्या अज्ञ अनुयायांच्या उपयोगाकरिता मराठींतूनच धर्म-ग्रंथरचना करावयास पाहिजे अशी श्रीचक्रधरप्रभूंची आपल्या शिष्यांना आज्ञाहि पण आहे. महानुभावीय तत्वज्ञान हे द्वैतमताचे असून जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर हे चार मुख्य पदार्थ मानिले आहेत या चार पदार्थांनी चराचर दृश्यादृश्य विश्वाची रचना झाली आहे. जीव हा स्वतः पंगु, असमर्थ आहे परंतु त्याबरोबर मायास्वरूपाचा अंश, ज्यास संलग्न म्हणतात तो लावला जातो व तो संलग्न साक्षीरूप राहून जीवास प्रेरणा करतो व त्या प्रेरणेने जीव कर्मास प्रवृत्त होऊन शुभाशुभ कर्माचे फल भोगतो. हा संलग्न जीवास मुक्ति मिळेपर्यंत त्याची साथ करतो. जीवास शुभाशुभ कर्माचे फल भोगावयास लावण्याचे कार्य देवता करितात. प्रत्येक देवतांचे कार्य करण्याकरितां जीवास एक एक देह दिला जातो. देवतागणीक असंख्य देह जीवास प्राप्त होतात त्यास लिंगदेह अथवा मल अशी,

महानुभावीय तत्त्वज्ञानांत संज्ञा आहे. वरीलप्रमाणें अनेक लिंगदेह अथवा सूक्ष्म देह मिळाल्यानंतर जीवास मनुष्यादि स्थूल देह प्राप्त होतात.

परमात्माही कृपा परतन्त्र होऊन अवता धारण करून सर्व जीवांना ज्ञान —अविद्ये-पासून मुक्त होण्याचें ज्ञान— देतो. म्हणूनच दोन प्रकारचें ज्ञान सांगितलें आहे. एक देवतांचे ज्ञान व दुसरें परमेश्वरविषयक देवताविषयक ज्ञान स्वर्गादि फलप्राप्ति करून देते पण तें मोचक नव्हे; केवळ परमेश्वरीय ज्ञान मोक्षप्राप्ति करून देते. म्हणून महानुभावीय तत्त्वज्ञानांत परमेश्वरज्ञान श्रेष्ठ गणलें गेले आहे व देवताभक्ति ही गौण अतएव त्याज्य मानिली आहे. ईश्वरज्ञान प्राप्त झाल्यावर ज्यांनीं ईश्वरआज्ञेप्रमाणें आचरण केले त्यांना परमेश्वर अपरोक्ष ज्ञान देतो आणि त्यास ईश्वरीय स्वरूपाचा साक्षात्कार होतो व मग त्या जीवास मल अथवा सूक्ष्म देह यापासून व तदगभूत कर्मांपासून मुक्ति मिळते.

केवळ ज्ञान, केवळ भक्ति अथवा केवळ कर्म यांनीं मुक्ति मिळत नसल्यानें तिन्हीहि गोष्टींचा मेळ बसविण्याकरितां व तदनुसार वर्तन करून मुक्ति प्राप्त व्हावी म्हणून श्रीचक्रधरस्वामींनीं आचार सांगितला आहे. सूत्रपाठाच्या आचार-प्रकरणात तो सूत्ररूपाने ग्रथित केला आहे.

आचारप्रकरणाचा इत्यर्थ असा आहे कीं, लौकिक व्यवहारांत सस्कारादि कर्मे वैदिक प्रक्रियेस अनुसरून गृहस्थाश्रमीयांनी करावे, परतु फलाची आसक्ति न धरितां जें जें कांहीं करावयाचे ते तें परमेश्वरार्पण करावयाचे व त्यांतहि संन्यासधर्माचेच प्राधान्य विशेष असल्यामुळें सन्यासधर्माचाच श्रीचक्रधरस्वामींनीं प्राधान्येंकरून आपल्या अनुयायांस उपदेश केला आहे; व मोक्षप्राप्तीच पाहिजे असल्यास सर्व देवी–देवतांचा त्याग करून अनन्य श्रद्धेने भगवताचेंच चरणी स्वार्पण केलें पाहिजे असा त्यांचा उपदेश आहे

याप्रमाणे महानुभावीयांचे तत्त्वज्ञान स्थूलदृष्ट्या सांगतां येईल. जिज्ञासूस तें विस्ताराने सूत्रपाठ आणि त्यावरील भाष्य, महाभाष्य, लापिका इत्यादीमध्यें पहावयास मिळेल.

नागदेवाचार्यांच्या तेरा प्रमुख शिष्यांच्या तेरा शाखा झाल्या आहेत त्यांस आम्नाय म्हणतात. या आम्नायांपैकीं कवीश्वर, विद्वांस, उपाध्य या प्रमुख होत.

प्रस्तुतच्या काव्याचा कर्ता नारायणपंडित हाहि कवीश्वर आम्नायाचाच होय. मनुष्य कोणत्याहि आम्नायांतील असला तरी त्यास श्रीऋद्धिपुर क्षेत्र, श्रीगोविंदप्रभु आणि श्रीचक्रधरस्वामी हे पूज्य आहेत.

## ९ ऋद्धिपुरवर्णनावरील ग्रंथ

ऋद्धिपुरासबधाने सह्याद्रि खंड आणि भविष्यपुराण या दोन संस्कृत ग्रंथांमध्यें उल्लेख आहे त्यानंतरचा विशेष महत्वाचा ग्रंथ म्हणजे ऋद्धिपुरमहात्म्य हा मराठी ग्रंथ होय तो ग्रंथ ओवीबद्ध असून महेश्वरपंडित यांनीं शके १२२४ च्या सुमारास रचला आहे. हा ग्रथ आम्हास ऋद्धिपुर येथील श्री गोपीराज महात्मग्रंथ-संग्रहालयामध्ये प० महत गोपीराज बुआ यांच्या कृपेने मिळाला. ग्रंथामध्यें कवीचा शक नाहीं व प्रतिलेखकाचाहि शक नाहीं; तथापि अक्षरवटिकेवरून ती प्रत २५० वर्षांची लिहीलेली असावी. ग्रंथांत अप्रसिद्ध शब्द फारसे नाहींत तथापि शब्दांच्या व प्रत्ययांच्या रूपांवरून ग्रथ बराच जुना असावा असे वाटतें. महेश्वर-पंडित हे श्रीनागदेवाचार्यांचे पुत्र असून श्रीगोविंदप्रभूसमोर राजमठाच्या रायांगणांत ज्या सात मुंजी एकाच वेळी झाल्या त्यांत महेश्वर पंडितही बटु होते. या सात मुंजींची सात बहुली वंदनीय स्थळे म्हणून अद्यापिही रायांगणांत दाखवितात. महेश्वरपंडितांनी ग्रथामध्ये श्रीचक्रधरांना व श्रीनागदेवाचार्यांना नमन केलें आहे. नागदेवाचार्य हेच त्यांचे दीक्षागुरु होते. या काव्याचे एकंदर ९ प्रसंग असून ओवीसख्या ८२७ आहे

मंगलाचरणाच्या ओव्या विशेष महत्वाच्या आहेत त्या:—

श्रीआनदमूर्तये नमः ॥

जो हेमवर्णा सारिखा : नमन करूं इनि मुनि वेखा :
जो न वर्णवे सेखादिकां : सहस्रमुखी : ॥१॥
वेद जयाचे नागारी : वर्णितां गुण लावण्याची थोरी :
श्रमले तयाचि परी : नेणती म्हणौनि : ॥२॥
श्रुतींवरि रचिलीं पुराणे : ते बोलों नेणति अज्ञाने :
भाबावले षट् दर्शनें : जयासि पाहातां ॥३॥
अज्ञानाचेंनि प्रमादें : आगम दुरि राहिले विसंवादें :

ननु वादितीचि उपनिषदे : भूलिकी जाली : ॥४॥
ऐसा षट्प्रमाणी अगोचरू : श्रुती नव्हेचि निर्धारू :
तो नमस्करिला श्री चक्रधरू : मुनी महेश्वरी : ॥५॥
प्रभुचेनि नाम प्रमादेके : देवा आळवितां कवतिकें :
तया नागार्जुनासि मी अमृत सुखे : नमस्कारीन : ॥६॥

सह्याव्या प्रसंगांत श्रीगोविंदप्रभूचे वर्णन आहे ते याप्रमाणेः—

प्रथम चरणी कळी : जंबुद्वीप वैदर्भकुळी
अवतरला मूतिघनःशाम सावळा : परब्रम्ह वस्तु : ॥२४९॥
वैदर्भकुळी मातुलग्रामु : तेथ अवतरला आत्मारामु :
फेडावया भवश्रमु : जीव जाताचा : ॥२५०॥
याज्ञवल्की ऋषीश्वरू : प्रथम शाखे अवतरला ईश्वरू :
घनःशाम मनोहरू : माया वेषे : ॥२५१॥
सप्त वर्षी व्रतबंधन : द्वादश वर्षी वेदपठण :
यापरी माया वेषु नटण आदि पुरुषाचे ॥२५२॥

या ऋद्धिपुर महात्म्याचा शेवट असा आहे

जी तुमचेनि पसायदान : ऋद्धिपूर महात्म्य अनुसंधाने :
बोधुनि पुराण प्रबंधरत्ने : पदी प्रमेयाचा ॥९२१॥
जी ते परावाणीचेनि बोले : मुनी नागदेवी अनुवादिन्नले :
ते हा रचेल परि भले : स्वीकारिजो का : ॥९२२॥
तेण न करोनिया सलगी : तुम्हा संताची केली चागी :
प्रसाद पसावा योग्ये : म्हणौनि : ॥९२३॥
जी मी अमंगळु ऐसा निन्हा पा पाहो नय हा भरवसा :
सावधा चाल हा विवसा . उबन्ना मज ॥८२४॥
तऱ्ही मी बडबडेला भलतेउती : ते उपसाहावे संतो :
जैसे बालक घास सुये आपुला हातीं : पित्यामुखीं : ॥८२५॥
परि हे देवाचे स्तवन : सलगी केलें अनुवादन :
तें उपसाहावे तुम्हीं संतजन : म्हणे महेश्वरू : ॥८२६॥

ऋद्धिपुरवर्णनावर प्रस्तुत काव्याशिवाय श्रीगोविंदप्रभुचे ऋद्धिपुरचरित्र आणि स्थानपोथी हे दोन ग्रंथ आहेत म्हणून वर सांगितलेच आहे. स्थानपोथी म्हणून तीन निरनिराळ्या ग्रंथकारानी ग्रंथ केलेले आहेत त्यांत वरील उभयता अवतारी पुरुषांच्या लीलास्थानांचा उल्लेख आहे. प्रथम भावे देवव्यास उर्फ भावे-देव पडीत यांनीं श्रीगोविंदप्रभूच्या कळीच स्थानपोथी लिहिली होती असे कळते. ती आम्हास उपलब्ध झाली नाही. त्यानतर तेराव्या शतकांत कमळाकर व्यास अयाचित उर्फ कुमाराम्नाय कोठी यांनी एक विस्तृत स्थानपोथी शके १२७५ च्या सुमारास लिहिली तिची शके १५१४ मध्ये लिहिलेली प्रत आम्हांस मिळाली; तिचेवरूनच आम्ही या पुस्तकाचे शेवटी ऋद्धिपुरांतील समग्र स्थानांचा उतारा परिशिष्ट अ मध्ये दिला आहे. त्यानंतर तिसरी अलीकडील पोथी चिरडे महानुभाव यांनी लिहिली आहे पण तीहि आम्हांस मिळाली नाही. कुमराम्नाय कोठी यांच्या स्थानपोथीवरून रितपूर येथील श्रीपाचराऊत महंतांनीं ऋद्धिपुर येथील स्थळे दर्शविणारा नकाशा तयार केला आहे. पण तो विस्तारभयास्तव देतां येणे शक्य नाही. जिज्ञासूस तो रितपूर येथे त्यांच्या मठांत पहावयास मिळेल. महंत श्रीगोपीराज बाबा संस्थान रितपूर याचेजवळही राजमठाचा फार जुना म्हणजे मसजीद होण्यापूर्वीचा नकाशा आहे ह्यावरूनच या पुस्तकाच्या शेवटी राजमठाचा नकाशा दिला आहे.

उपाध्ये आम्नायांतील शारंगधर भोजने यांनीं तीर्थमाळिका या नांवाचा ९० श्लोकांचा एक छोटा ग्रंथ सुमारे सोळाव्या शतकांत लिहिला आहे त्यात श्रीचक्रधर आणि श्रीगोविंदप्रभु यांच्या चरणस्पर्शाने पवित्र झालेल्या ग्रामाची नांवे आहेत. यात ऋद्धिपुर येथील तीर्थांचाहि उल्लेख आहे.

त्याचप्रमाणे सोळाव्या शतकांतच उपाध्याय आम्नायांतील दीक्षित विराट-देशोपनाम (वाईदेशकर) मयकराजशिष्य कृष्णमुनि उर्फ कवि डिंभ यांनीं "ऋद्धिपुर-महात्म" या नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ लिहिला आहे त्यांत फक्त ८८२ ओव्या आहेत. या ग्रंथास सह्याद्रि खंड पुराणाचा आधार घेतला असल्याचे कवीने म्हटलें आहे. ऋद्धिपुरासंबधीं पौराणिक माहिती त्यांत दिली असून भविष्यपुराणांत ऋद्धिपुरी गुडमेश यांचा काण्वब्राह्मण कुळीं अवतार होईल असें आधीच लिहून ठेविले असे सांगून श्री गुडमप्रभूचे चरित्र आणि त्यांनीं ऋद्धिपुरी केलेल्या लीला

या ग्रंथांत वर्णिल्या आहेत. या ग्रंथांत श्रीगोविंदप्रभूच्या जन्मशकासंबंधानें खालीलप्रमाणें ओव्या आहेत.

" जंबुद्वीप भरत खंड भूमिसी । गोदावरी उत्तरे वैदर्भ देशीं ।
विंध्याचळ प्रदेशीं । खेड नाम नगरी ॥२१॥

तयाजवळ दक्षीण दिशे । ऋद्धिपुर नगर पट्टण असे ।
तेथें अवतार धरीजे परेशें । काण्णव शाखी ॥२२॥

शालीवाहन शके एकादश शतेवरी । नव वरुषे प्लव संवत्सरी ।
भाद्रपद शुद्ध अष्टमी गुरुवारीं । अवतरले परमेश्वर ॥२३॥

श्री गुंडमनाम स्वीकारू । बाळ लीळा क्रीडे अवतारू ।
निरहेतु जीवोद्धार करी विहारू । ऐश्वर्य सामर्थ्यें ॥२४॥

या कवीच्या मताप्रमाणे ११०० हा गोविंदप्रभूचा जन्मशक आहे. यांचा हा जन्मशक खरा मानल्यास श्रीगोविंदप्रभूची वयोमर्यादा १०० वर्षांची सरासरी येते.

याप्रमाणें श्रीगोविंदप्रभु व श्रीचक्रधरस्वामि यांचीं त्रोटक चरित्रे, महानुभावीय तत्वज्ञानासंबंधीं स्थूलमानानें विवरण आणि ऋद्धिपुरवर्णनात्मक ग्रंथांचा विहंगमदृष्ट्या विचार करून आतां काव्यांतील वर्ण्यविषयाकडेस वळूं.

## १० प्रस्तुत काव्यांतील वर्ण्यविषय

ऋद्धिपुर नगर दुरून दृष्टीस पडतांच कवीच्या मनांत शांततेचा भाव उत्पन्न झाला व त्यांनी नमस्कार घातला. पंढरपुरास विठ्ठलाच्या दर्शनास जाणाऱ्या यात्रेकरूच्या प्रथमच जेव्हां पंढरपूर क्षेत्र दृष्टीस पडतें तेव्हां त्यांचे हृदय आनंदानें भरून येऊन त्यांच्या मुखांतून ' पुंडलीक वरदे हरि विठ्ठल ' हीं अक्षरें पडतात; हे दृश्य ज्यांनीं पाहिलें असेल त्यांना वरील वर्णनाची सत्यता पटेल. त्यानंतर नगराचा बाह्यप्रदेश प्रभूंच्या चरणांकिताने पवित्र झाला म्हणून त्या प्रदेशास कवीनीं नमस्कार केला. ५७ वे ओवीपासून ७० व्या ओवीपर्यंत प्रभूंची थोरवी आठवीत सद्गदीत अंतःकरणानें पुढें चालत असतां वृक्षराजी अवलोकन केली असें वर्णन आहे. नंतर वृक्षराजी, त्यावरील विहंगम, त्या तळीं असलेले ईश्वराचे संतभिक्षुक यांचें वर्णन करून कवीनीं संतांना नमस्कार केला. (ओ. ७१ ते ओ. ८२).

नंतर कवींच्या दृष्टीस देवायतनांची आणि प्रासादाची शिखरें दृष्टीस पडलीं; पुढें तलाव, घाट, पुष्करणी इत्यादि स्थानें दृष्टीस पडल्यावर मग कवी नगरांत प्रवेश करते झाले. (ओ. ८२ ते १०२). तेव्हां नगरांतील पुनीत जन, हाट, चौहाट, मढ, मंडप, धर्मशाळा इत्यादि त्यांनी अवलोकन केलीं व मार्गांत पालाशकुसुमवत् काषाय वस्त्र परिधान केलेले भिक्षुक महानुभाव महात्मा त्यांच्या दृष्टीस पडले. नंतर कवि राजवीदीवरून थेट महाद्वारापर्यंत आले ( ओ. १०२ ते १७ ). नतर महाद्वाराचें दर्शन झाल्यावर जगती आणि तीनि मढ यांचे दर्शन झाले. (ओ. ११८ ते १२७). या मठांच्या आवारांत असलेल्या संतांच्या ज्ञानोपदेशानें कवी म्हणतात सोमकांताप्रमाणे जीव द्रवून गेला; व प्रभूस आवडतें असे ते राजभुवन त्याचे त्यांनीं दर्शन घेतले. ( ओ. १२७ ते १५९ ). कवि आपल्या संसारांत स्थितीचे वर्णन करून भवबांधोडीपासून मुक्त होण्याचा उपाय आपण शोधिला असे सागतात. ( ओ. १६०-१८१ ). परमेश्वर सकल जीवांचे जीवन असून तोच सर्व जीव जातांना आधार आहे असें परमेश्वराचे गुणानुवादन करून जगतीमधील रायांगणाची स्तुति कवींनीं आरंभिली ( ओ. १८१-२०५ ). नंतर परमेश्वराची स्तुति करून स्तुति करणाराची रंकवृत्ति प्रामुख्यानें वर्णिली आर्तस्थितीतून उद्धार व्हावा म्हणून राजभुवनास आलों असें कवि सांगतात (ओ. २०६ ते २२६). नंतर राजमठाची स्तुति कवींनीं गायिली. ( ओ. २२७-२५५ ). ईश्वर अनादि असून यानें मानव वेष घेऊन विरुद्धाचरण केलें असें कवि सांगतात. ( ओ. २४६-२५७ ). जीव हा प्रपचानें भोवंडिला म्हणून कवी परमेश्वराची करुणा भाकतात. (ओ. २५९ २८०). परमेश्वराची थोरवी व जीवाचे रंकपण दाखवून रंकवृत्तीचे कारण जी विषयलोलुपता तिचा नाश करून परमेश्वर जीवाचा उद्धार करील म्हणून कवीस उमेद आली. ( ओ. २५८-३५० ). नंतर राजमठाच्या पाठशाळेच्या खांबाचें, तसेच भिंतीचें, राजमठ द्वाराचें आणि उंबरठ्याचें वर्णन करून कवि राजमठ प्रवेशाचे वर्णन करितात. ( ओ. ३५१-३७५ ). नतर कवींनीं राजमठप्रवेशामुळे उत्पन्न झालेल्या अंतःकरणांतील भावनांचें वर्णन केलें. ( ओ. ३७६ ते ४२२ ). नंतर भीतभंग, देवळामधील खांब यांचें वर्णन करून राजमठांतील नृसिंहमूर्तीचे कवींनीं वर्णन केले. ( ओ. ४२२ ते ४४९ ) नंतर ओटा, मर्दनास्थान, रंगमाळिका, वगैरेचें वर्णन करून कवी आरोगणास्थान म्हणजे भोजनस्थानाचें वर्णन करितात. ( ओव्या ४४९ ते ५०४). यापुढें कवि पक्वान्नांचें वर्णन करितात. (ओ. ५०४-५४३). नंतर

प्रभूच्या मंचकाचें वर्णन करून कवि प्रभूच्या मूर्तीचे वर्णन करितात. (ओ. ५४३ ते ६१२ ) नंतर श्रीप्रभूच्या विरहाचे वर्णन करून कवि परमेश्वराची करुणा भाकतात व प्रभूनें "उडी घालुनि संतथडी पावविला तेव्हेळि जिआत्रेआ आसु फुर्डा जाली" असे कवि सांगून "प्रबंध कळसा आला" म्हणून समारोप करितात ( ओ. ६१२ ते ६३३) शेवटचे मगलाचरण करून कवि ग्रथाची समाप्ति करितात. (६३४ ते ६४५).

येवढाच काय तो वर्ण्यविषय प्रस्तुतच्या काव्यांत आहे, तथापि तो विषय कवीने आपल्या प्रतिभायुक्त आणि साहित्यसपन्न कुशलतेने रगवून नितांत मनोहर करून ठेविला आहे.

## ११ ऋद्धिपुर नगर

गोविंदप्रभूची अवतारसमाप्ति शके १२०८ मध्ये झाली असे धरले तर त्यानतर अवघ्या ७५–८० वर्षांच्या अवधींतच हे काव्य निर्माण झाले आहे. ऋद्धिपुरनगर आणि महाद्वार, जगती, राजमठादि तीनि मठ यांमध्ये या अवधीत फारसा फरक झाला नसला पाहिजे तथापि कविकाळापासून आज जवळ जवळ ५६५ वर्षे झालीं आहेत या अवधीत वरील स्थळांमध्ये फार फरक पडला आहे. कुमाराम्नाय कोठी यानी शके १२७५ मध्ये म्हणजे कवीच्याच काळी स्थानपोथी नांवाचा ग्रथ लिहिला त्यातील ऋद्धिपुर येथील स्थळाच्या वर्णनाचा भाग या पुस्तकात शेवटीं परिशिष्ट अ म्हणून दिला आहे, त्या वर्णनावरून, त्या काळी ऋद्धिपुर हे शहर केवढें विस्तृत होते याची चागली कल्पना येईल या ५००–६०० वर्षांच्या अवधींत ऋद्धिपुर हे शहर अगदी जीर्णावस्थेत आलें आहे. त्या काळीं अस्तित्वांत असलेली देवालये, मोठमोठे वाडे जाऊन आतां नुसतीं खडारीं मात्र राहिलीं आहेत. नाहीं म्हणावयास त्या भग्न अवशेषांमध्ये मधून मधून तुरळक घरे नदरेस येतात ही अवस्था प्राप्त व्हावयास यवन राजसत्ताच कारणीभूत झाली. कवीनें वर्णन केलेला तलाव आतां गाळानें भरून गेला असून तेथे शेते झालीं आहेत. तलावाचे प्रस्तर, घाट, देवालये आणि पुष्करणी ह्या नाहीशा झाल्या आहेत. महाद्वारासमोर असलेली राजवीदी नाहींशी होऊन तेथें आतां महाद्वारासमोर आवार घातला आहे. महाद्वारामध्यें हल्लीं सोबत जोडलेल्या फोटोमध्यें दिलेली श्रीगोविंदप्रभूची मूर्ति बसविलेली आहे. ती मूर्ति केव्हां बसविली याचा कोठें उल्लेख नाहीं. महाद्वारांत मूर्ति बसविल्यामुळें अर्थातच जगतीचें

प्रवेशद्वार बंद झालें, त्यामुळें जगतीची पूर्वाभिमुखी भिंत महाद्वाराच्या उत्तरेस फोडून आंत जावयास रस्ता करावा लागला आहे.

## १२ महाद्वार जीर्णोद्धार

हल्लीं महाद्वाराचा जीर्णोद्धार करण्याच्या उद्देशाने एक महानुभाव उपदेशीयांची कमिटी स्थापन होऊन बराच निधि जमविण्यात आला आहे या कमिटीने महाद्वारा समोरील सभामंडप उकलला आणि खुद्द महाद्वारही काढून टाकिले आहे. या मंडळीचा तेथें एक विस्तीर्ण मंदीर बांधावयाचा विचार आहे तथापि ते काम अगदीच रेंगाळत चाललें आहे. बरेच दिवसांपासून नुसता पायाच भरून ठेविला आहे. जीर्णोद्धारकमिटीने हल्ली महाद्वार काढून टाकिलें ते सदहेतूनेच केलें याबद्दल शंका नाही. तथापि पुराणवस्तुसंरक्षणाच्या दृष्टीने पाहिलें तर जुने महाद्वार नाहीसे करण्यांत कमिटीने अक्षम्य चूक केली, असे म्हणावे लागते. दुसरे श्रीगोविंदप्रभु आणि श्रीचक्रधरस्वामी यांच्या करचरणादि स्पर्शाने पवित्र झालेले महाद्वार, पाहिऱ्या, उंबरवट इत्यादि, महानुभावीयाना वंदनीय असल्यामुळे त्यांनीं आज ६५० वर्षे मोठ्या आस्थेने रक्षण करून ठेविल्या होत्या; परतु जीर्णोद्धाराच्या सद्हेतूनेंच का होईना पण ते सर्व वंदनीय प्रस्तर कमिटीने स्थानभ्रष्ट केले आहेत व ते इतस्ततः पडले आहेत. कमिटी त्या महाद्वाराच्या जागी लाखो रुपये खर्च करून भव्य मंदीर बांधतील परतु महाद्वाराच्या साध्या घडणीच्या चिऱ्यांना जी पवित्रता आणि महनीयता आहे ती त्या मंदिरास केव्हांही आणू शकणार नाहीत. दुसरे असें की शेंकडों वर्षेपर्यंत ज्या प्रस्तरांना कोट्यावधि महानुभावीयांनी आणि इतर हिंदुपंथीयांनीं पूज्य मानिले ते प्रस्तर आतां स्थानभ्रष्ट झाल्यामुळें एखाद्या अपवित्र कार्यासही लागले जाण्याचा संभव आहे परतु अद्याप दुरुस्तीला सवड आहे. भिंतीचें काम सुरू झालें नाही तेव्हां आमची अशी सूचना आहे कीं निदान सोबत दिलेल्या फोटोंत दर्शविल्याप्रमाणे महाद्वार, आणि त्याबरोबर जुन्या पाहिऱ्या, उंबरवट वगैरे पूर्वीप्रमाणेंच आणून जागच्याजागीं पूर्ववत बसवून द्यावेत आणि नंतर त्यावर कमिटीनें ठरविला असेल त्या नकाशाप्रमाणें मंदीर उभारण्यांत यावें म्हणजे परंपरागत चालत आलेल्या पावित्र्याचेंही रक्षण केल्याचें श्रेय येऊन जीर्णोद्धाराचेंही संकल्पित कार्य पार पाडल्यासारखें होईल.

## १३ तिन्ही मढ

श्रीगोविंदप्रभुच्या अवतारापूर्वी बरीच वर्षे किंबहुना शतकें हें महाद्वार, जगती अथवा प्राकार आणि आंतील देवायतने अर्थात् सुप्रसिद्ध तिन्ही मढ हे आस्तित्वांत आले असले पाहिजेत; हे या पुस्तकाच्या पारीशिष्ट अ मध्यें दिलेल्या श्रीगोविंदप्रभूच्या काळी असलेल्या ऋद्धिपुरशहराच्या विस्तारावरून कळून येईल. प्राकारामध्यें दक्षिण–पूर्व कोपऱ्यांत एक मदीर आहे त्यास त्रिपुरुषाचा मढ असें म्हणतात. कारण या मदिरांत उच्चासनावर ब्रह्मा, विष्णु आणि महेश या तीन मूर्ति होत्या असे वर्णन आहे. मदिरात तीन प्रस्तरासनें आहेत, मूर्ति मात्र नाहींत. गेल्या वर्षी महाद्वारमदिराकरितां पाया खर्णात असता कांहीं मूर्ति सापडल्या त्यांत एक पार्वतीसह शिवाची मूर्ति सांपडली आहे. तीच या मदिरांतील महेश मूर्ति असावी अशी शंका येते. हा त्रिपुरुषाचा मठ तळापासून वर सरासरी अर्धा दगडी बांधणीचा आहे. तो पुरातनच असावा, परतु त्यावरील अर्धा भाग आणि वरील गोलाकार शिखर हे विटानीं बांधिले असून अगदी अलीकडील तरी तीनशे वर्षांचे असावे. महत गोपीराज पजाबी म्हणजे विद्यमान गोपीराजजी महंत यांचे पूर्वज यांनी सुमार २५० वर्षांपूर्वी, या त्रिपुरुषाच्या मठाचा जीर्णोद्धार करून हे मंदीर व महाद्वारासमोरील नक्षीयुक्त प्रसिद्ध लाकडी सभामडप बांधिला. त्यानतर दुसरें महत्त्वाचे मंदीर म्हणजे उंचमढ. या मदिरास उचमढ म्हणावयाचें कारण हेंच की या मदिराचे आसन ( ओटा ) हा दुसऱ्या दोन्ही मदिरांपेक्षां उच म्हणजे सरासरी ४।५ फूट उच आहे. हल्लीं या मदिराचा जोता तेवढा कायम आहे, इमारत नष्ट झाली आहे. खांबांचे उथळे अद्याप स्थानभ्रष्ट झाले नाहींत; दगडी खांब मात्र इतस्ततः पडलेले आहेत. या मदिरांत केशवाची मूर्ति होती असें वर्णन आहे. मूर्तीचा आतां पत्ता नाहीं. महाद्वारामध्यें श्रीगोविंदप्रभूची म्हणून जी मूर्ति बसविली आहे तीच केशवमूर्ति असावी असेंही म्हणावयास आधार नाही. तिन्ही मढांपैकीं तिसरें परतु विशेष महत्त्वाचें असे मंदीर ज्यास राजमढ ही संज्ञा प्राप्त आहे त्या मंदिराच्या विवेचनाकडेस वळूं. या मंदिराची कथा अत्यंत उद्वेगजनक आहे. या मंदिराच्या जागेवर हल्लीं महमदीधर्माची पताका फडकत असून त्याचें मशीदीमध्यें रूपांतर झालें आहे. श्रीगोविंदप्रभूच्या सहवासानें आणि करचरणस्पर्शानें पुनीत झालेले प्रस्तर, स्तंभ आणि स्तंभासनें हल्लीं मशीदीच्या आवारांत इतस्ततः पडलीं

आहेत. या मंदिरांत पूर्वी नरसिंहाची मूर्ति होती व हेंच मंदीर श्रीगोविदप्रभूचें निवासस्थान होतें व श्रीगोविदप्रभूच्या निवासस्थानामुळेच या मदिरास हे वैभव प्राप्त झाले आहे. नरसिंहमढासच राजमढ ही सज्ञा देण्याचा प्रघात आहे. श्रीऋद्धिपुरचरित्रांत हा राजमढ गोविंदप्रभूस कसा मिळाला याचे सविस्तर वर्णन दिलें आहे तो कथाभाग या पुस्तकाच्या शेवटी परिशिष्ट ब मध्ये ऋद्धिपुरचरित्रातील जे उतारे दिले आहेत त्यांत लीला म्हणून दिला आहे श्रीगोविंदप्रभूच्या निवासास सत्तेचा मठ असावा म्हणून ऋद्धिपूरच्या महाजनांजवळून म्हाइभटांनी ६० चौथरिया आसु ( आसु व चौथरिया हीं दोन्हीं सोन्याची नाणी होतीं. ) देऊन जगतीच्या आंतील सर्व मंदिरांसह राजमठ विकत घेतला होता आणि त्या संबंधाने महाजनांनीं ताम्रपटावर विक्रीपत्रही करून दिलें होते. हा ताम्रपट जगतीमधील प्रसिद्ध कपरबांवीजवळ कोठेतरी प्रस्तराखालीं जमीनीत ठेविला अशी परंपरागत वदंता आहे असे हल्लीचे यक्षदेवबुआ यांनी आम्हांस सांगितले आहे. या पवित्र राजमढाचे महमदीय मशिदीत कसे रूपांतर झाले या दुर्दैवी इतिहासाची कल्पनेवरच इमारत रचावयास नको. त्याचा स्पष्ट इतिहास मशिदीच्या पूर्व भिंतीवर एका काळ्या पाषाणावर फारशी लिपीमध्ये प्रामुख्याने कोरून ठेविला आहे. मूर्तिभंजक आणि देवायतनविध्वंसक म्हणून भारताच्या इतिहासांत रक्ताक्षरांनीं ज्याचे नांव चिरंतन झाले आहे त्या धर्मशील औरंगजेबाचेच हे कृत्य हें सांगावयास नकोच. या मदिरात विराजित असलेल्या नरसिंहाच्या मूर्तीस मशीद बांधतांना मशिदीच्या पश्चिम भिंतीच्या पायांत घातले असल्याची अद्यापही लोकवार्ता आहे. या पुस्तकांत जुना नकाशा दिला आहे. त्यांत मशीद दाखविली नसून तेथे राजमढ आहे. पूर्वी या मशीदीत महाद्वाराजवळूनच पूर्व बाजूस जात असत, तथापि ३० वर्षांपूर्वी मुसुलमान आणि महानुभाव यांच्यामध्ये तटाभांडणें होऊन आतां जगतीच्या बाजूनें मशिदीच्या आवाराच्या पूर्वभागीं भिंत घालण्यांत आली आहे; आणि मशिदीस जावयास पश्चिमेच्या बाजूनें स्वतंत्र रस्ता पाडण्यांत आला आहे. यद्यपि राजमढाच्या जागेवर मुसुलमानांनीं मशीद बांधली आहे तरी राजमढावरील महानुभावीयांचा भक्तिभाव कमी झाला नाहीं. श्रीगोविंदप्रभु यांनीं राजमढामध्यें ज्या लीला केल्या त्या आठवून अद्यापही महानुभाव हल्लीं मशीद असलेल्या या स्थानाचें मोठ्या आदरानें दर्शन घेतात.

या तिन्ही मठाच्या आवाराभोंवतीं असलेली भिंत ही जुनीच आहे आणि आवारामध्ये कपूरबाव, खोलेश्वराचें मंदीर वगैरे २-३ स्थळेही पुरातनच असून त्यांत कांही फरक झालेला नाहीं. कपूरबाव या विहीरीचा विहीर म्हणून उपयोग हल्लीं केला जात नसून तीत पाणीही पण असते. ही विहीर वंदनीय स्थळांपैकी एक असून तिचा उपयोग एका विशेष कामासाठी केला जातो. महानुभाव पंथाचे विस्तृत वाङ्मय हस्तलिखित पोथ्यांमधून शेकडो वर्षांपासून सुरक्षित ठेविले आहे. कालाचा परिणाम होऊन पोथ्या जीर्ण झाल्यावर त्यांची पाने विस्कळीत होऊन त्या वाचावयास निरुपयोगी होतात. अशा स्थितीत विस्कळीत जीर्ण पाने इकडे तिकडे पडून त्या पवित्र पोथ्यांचा अनादर होऊ नये म्हणून त्या विस्कळीत जीर्ण पोथ्यांचे या विहिरीत विसर्जन करितात. ही क्रिया आज अनेक शतकांपासून सुरू आहे. उन्ह आणि पाऊस यांचा परिणाम होऊन या पोथ्यांची आतां माती झाली आहे. पाऊस-पाण्यापासून जर रक्षण करतां आले असते तर ज्ञानभांडाराचा अपूर्व ठेवा आपणास सहज हस्तगत झाला असता.

## १४ ऋद्धिपुरांतील आणखी अवशेष.

ऋद्धिपुरामध्यें तिन्ही मठाशिवाय श्रीगोविंदप्रभूंच्या वेळचे भैरव बुरुज, केशव-विहीर, कोल्हारीदेवी इत्यादि अनेक अवशेष अद्याप शाबूत आहेत तथापि त्या सर्व स्थळांचा प्रस्तुत काव्याशी संबंध येत नसल्यामुळें येथे त्या संबंधानें उल्लेख करावयाची आवश्यकता नाहीं. जिज्ञासूंकरितां स्थानपोथींतील ऋद्धिपुरविषयक संपूर्ण उतारा परिशिष्टांत दिलाच आहे.

## १५ प्रस्तुत काव्यांतील छंद.

आतां आपण ऋद्धिपूरवर्णन काव्याचा काव्य या दृष्टीनें विचार करूं. हें काव्य स्थळवर्णनपर आहे. या पूर्वी ६० वर्षांपूर्वीच रवळोव्यास यांचा सह्याद्रिवर्णन नांवाचा स्थळवर्णनात्मक काव्यग्रंथ निर्माण झाला होता. प्रस्तुतचें काव्य ओवी-छंदांत आहे. ओवीछंदांत मराठी ग्रंथरचना करावयाची पद्धत पुष्कळ वर्षांपासून रूढ झाली होती. कै. वि. का. राजवाडे यांनीं "मराठी छंद" या पुस्तकांत ओवी-छंदासंबंधानें विवेचन केलें आहे. अक्षरसंख्येच्या मानानें ओवीचे अनेक प्रकार होऊ शकतात असे त्यांनीं सांगितलें आहे. खुद्द ज्ञानेश्वरीमध्यें सुद्धां अक्षरसंख्येचा निय-

मीतपणा राखण्यांत आला नाहीं असें त्यांनीं दाखविलें आहे. हल्लींचें काव्यसुद्धां निरनिराळ्या प्रकारच्या साडेतीन चरणी ओवीछंदांत आहे. अक्षरमात्रागणांच्या संबधानें नियंत्रितपणा नसल्यामुळे कवीना काव्य रचावयास हा छद फार सोईचा वाटत असल्यामुळे मराठीत या छदांत ज्ञरीच काव्यें निर्माण झालीं आहेत. हा ओवीछद निवळ मराठी छद आहे तो महाराष्ट्राचा इतका आवडता आहे की महाराष्ट्रांतील युवती पुरातनकालापासून दळतांना किंवा कांडतांना ओवीछदांत गीत म्हणतात "महाराष्ट्रयोषिद्भिरोवी गेया तु कडने" असा दहाव्या शतकांतील अभिलषितार्थचिंतामणि या नांवाच्या प्रसिद्ध ग्रथांत उल्लेख आला आहे.

महाराष्ट्र-काव्य-प्रदीपिका या नांवाचा महानुभावीय कवि, कवि लक्षधीर, यांचा छदशास्त्रावर एक ओवीबद्ध ग्रथ आहे. हे लक्षधीर कवि शके १५४० च्या सुमारास होऊन गेले. या छद:शास्त्रावरील ग्रथांत कवीनें महाराष्ट्राच्या आवडत्या ओवीछंदावरच निरूपण केले आहे. त्यांनी साडेतीन चरणी, चार चरणी, साडेचार चरणी व पांच चरणी असे ओवीचे प्रकार सोदाहरण सांगितले आहेत व साडेतीन चरणाचे ओवीचे सुद्धा अक्षराच्या न्यूनाधिक्यामुळे एकदर शुद्ध १६ व मिश्र ६ एकूण बावीस प्रकार सनाम व सोदाहरण सागितले आहेत. सर्वांत कमी अक्षरांची साडेतीन चरणी ओवी ती लघुचरणी, तिची व्याख्या:—

पाचसा सात अक्षरे गणती : तिहीं चरणी एती :
सेवटी चार पाच होती : ते लघुचरणी : २

सर्वांत जास्त अक्षरांची साडेतीन चरणी ओवी ती अतिदीर्घा; तिची व्याख्या—

चौदा पधरा सोळा : तिहीं चरणी अक्षरांचा मेळा :
सेवटी दश एकादश दिसती सोळा : ते अति दीर्घा: ॥ ५ ॥

चौचरणीचे उदाहरण:—

रसनेचियें चाडे : हिंसा करीती कोडे
दावनी देती बोकडे : देवते पुढे : ॥४३॥

चोहड ऊर्फ साडेचार चरणीचे उदाहरण:—

ऐसिया एकैके दृष्टांतीं : अनेक खंडनाचिया मुक्ति :
अभेदु दूषिजे हेतुमंतीं : परि न मानिती : अहंभावें : ॥४४॥

पच चरणींचें उदाहरणः-

जे सांडुनी ज्ञानवैराग्यभक्ति : अन्य साधने करीती :
यथार्थ नमविती : ते पावती : नरकगती : ॥४५॥

दामोदरपंडितांची गीतेवर साडेचार चरणी ओवींमध्ये टीका आहे तिचा एक अध्याय रिद्धपूर येथें प. महंत गोपीराज यांचेजवळ आहे दामोदरपंडीतकृत सकष्टहरणस्तोत्र ही याच ओवीछंदांत आहे दामोदरपंडीत हे कवि १३ व्या शतकांत होऊन गेले.

## १६ कवीची व्युत्पन्नता

या काव्याच्या रचनेवरून हें स्पष्ट दिसून येते की महात्मा नारायण पंडित व्यास हे चांगले व्युत्पन्न असून त्यांना संस्कृत काव्यशास्त्राची व साहित्यशास्त्राची चांगली माहिती होती. या कवीचा एवढाच कायतो स्वतंत्र व संपूर्ण काव्यग्रंथ उपलब्ध आहे आणि या एकाच काव्यग्रंथाकरितां कर्त्याचे नांव मराठी वाङ्मयांत अजरामर राहण्यासारखे आहे.

## १७ मराठी वाङ्मयाचें विहंगमदृष्ट्या निरीक्षण

प्रस्तुत काव्याच्या गुणदोषासंबधानें विवेचन करण्यापूर्वी त्या काळापर्यंतच्या उपलब्ध मराठी वाङ्मयाचा विहंगमदृष्ट्या विचारण करणे अप्रस्तुत होणार नाही. प्रो. एच्. एच्. उइल्सन यांनी महारांचे राष्ट्र म्हणजे महाराष्ट्र अशी जरी महाराष्ट्राची मनःपूत व्याख्या कल्पिली आहे तरी महावंशांत लिहिल्याप्रमाणे अशोकाच्या काळीं महाराष्ट्रामध्ये रट्ट-राष्ट्रिक अथवा महारट्ट अथवा महाराष्ट्रिक लोक राहत होते. नाणेघाटाच्या शिलालेखांत वर्णिल्याप्रमाणे महारथिनी हे नांव प्रचलित होतें. या महाराष्ट्र नांवाशी संबध दाखविणारी प्राकृत भाषांपैकी महाराष्ट्री ही भाषा लोकप्रसिद्धच आहे. त्याचप्रमाणे महाराष्ट्राचा प्रमुख आणि बीजरूप भाग जो विदर्भदेश त्या विदर्भाचा संस्कृत वाङ्मयाशी अगदीं निकटचा संबध आहे. विदर्भावरूनच संस्कृत भाषेंतील प्रमुख रीतीला वैदर्भीरीति असें नांव पडलें आणि विदर्भाच्या क्रथकैशिक या दुसऱ्या नांवावरून क्रथकैशिकी असें संस्कृताच्या एका विशिष्ट व महत्त्वाच्या वृत्तीचें नांव पडलें आहे, असा महाराष्ट्राचा संस्कृत भाषेशीं संबंध आहे.

संस्कृत भाषेपासून स्थलकालमाहात्म्यानें ज्या प्रमुख पांच प्राकृत पोटभाषा

बनल्या, त्यांमध्यें महाराष्ट्री ही प्रमुख पोटभाषा होय. शालिवाहन शकारभीं संस्कृत भाषा प्रचारांतून जाऊन प्राकृत भाषांना महत्त्व आले होते त्या सुमारास व त्यानतर ७-८ शतकेपर्यंत महाराष्ट्रीमध्ये ग्रथरचना झाली, तथापि सातवाहनांचें राज्य गेल्यानतर शक ३००।४०० च्या सुमारास महाराष्ट्रांत अराजक माजून प्राकृत भाषांची हेळसांड झाली. त्यानतर कांही दिवस शुङ्ग, गुप्त, चालुक्य इत्यादि सनातन-धर्मीय राजानी सस्कृत भाषा व वाङ्मय यास उत्तेजन दिलें. त्या अवधींत महाराष्ट्री इत्यादि प्राकृत भाषा अशिष्टाच्या प्रचारांत राहिल्याने अपभ्रष्ट झाल्या व महाराष्ट्री वगैरे प्राकृतांचे अपभ्रश सुमारे शकाच्या ३ ऱ्या व ४ थ्या शतकापासून प्रचारांत आले. कै. राजवाडे, डॉ. गुणे आणि प्रो. कुलकर्णी यांचे या विषयावरील लेख विचारार्ह आहेत. शके ३००।४०० च्या सुमारास प्राकृत भाषा प्रचारांतून जाऊन प्राकृत भाषांचे अपभ्रश प्रचारांत यावयास आणखी एक गोष्ट कारणीभूत झाली. अराजक माजल्यानतर कांही काळपर्यंत महाराष्ट्रांत आणि नर्मदेच्या आसमतांतील प्रांतांत अशिष्ट अशा आभीर जातीचें प्राबल्य वाढलें आणि सरासरी १००।२०० वर्षें तरी या आभीरांनी राजसत्ता धारण केली होती. यांच्या सांनिध्याने प्राकृतांची अशिष्ट अर्थात् अपभ्रष्ट रूपे प्रचारांत येऊ लागली. हे महाराष्ट्री इत्यादि प्राकृतांचे अपभ्रश नक्की केव्हां पूर्ण झाले या सबधाने अद्याप निश्चय करतां येत नाही; तथापि हे अपभ्रश सहाव्या सातव्या शतकांत पूर्णावस्थेत आल्याचे आढळून येतात. कारण याच सुमारास जैन पडितांनी आपले ग्रथ महाराष्ट्री आणि अर्धमागधी या भाषांच्या अपभ्रशामध्ये लिहावयास सुरवात केली. वेदानुयायी ग्रथकार प्रथमतः जरी लौकिक सस्कृत भाषेत ग्रथरचना करू लागले तरी पुढे सस्कृत भाषा प्रचारांतून जाऊन प्राकृत भाषा व नतर अपभ्रश जरी प्रचारांत आले तरी त्यांनी सस्कृत भाषेत ग्रथरचना करावयाची आपली परपरा कायम ठेविली, तथापि बुद्ध आणि महावीर यांना आपल्या नूतन धर्माचा प्रसार जनतेत करावयाचा असल्यामुळे त्यांना तत्काली प्रचलित असलेल्या लौकिक भाषांचाच आश्रय करावा लागला. म्हणून बौद्धांनीं पाली भाषेत ग्रथरचना केली व जैनांनी तर प्रथम अर्धमागधी आणि महाराष्ट्री, नंतर त्यांचे अपभ्रश व त्यानतर हल्ली रूढ असलेल्या मराठी-हिंदी इत्यादि भाषांमधून, त्या भाषा तयार होऊन लौकिकांत रूढ झाल्यावर, त्यांतून ग्रथरचना केली आहे. महाराष्ट्रांत जैन धर्माचा प्रसार शालिवाहन शका-

रभापासूनच नव्हे तर महावीरस्वामी शेवटचे तीर्थकर यांच्या कालापासूनही असल्याचा उल्लेख आढळतो. त्याचबरोबर महाराष्ट्रांत निदान शालिवाहन शकारंभापासून अगदी आजतागायत जैनधर्मीयानीं त्या त्या काली प्रचलित असलेल्या भाषेत ग्रंथरचना केली आहे, त्यामुळें महाराष्ट्रामध्ये जैनधर्मीयांनी केलेले संस्कृत, महाराष्ट्री, अर्धमागधी, त्यांचे अपभ्रंश आणि सांप्रत मराठी इत्यादि भाषेतील जैन ग्रंथ आज उपलब्ध आहेत. मराठी भाषेच्या उत्पत्तीच्या दृष्टीने या ग्रंथांचें संशोधनात्मक अध्ययन केल्यास मराठी भाषेचा इतिहास पूर्वपीठिकेसह अवगत होण्याचा संभव आहे. असला एकत्रित संग्रह वऱ्हाडांतील पुरातन प्रसिद्ध अशा कारंजा शहरांत विद्यमान आहे. अनेक शतकांपासून परंपरागत अशा तीन प्राचीन जैन मंदिरामध्ये सरासरी २५००।३००० जैन हस्तलिखित ग्रंथ संरक्षित आहेत व ते तज्ज्ञ व संशोधक भाषाकोविदांची प्रतीक्षा करीत आहेत.

प्रो. चिं वि. जोशी यांनी विविधज्ञानविस्ताराच्या १९२८ च्या सप्टेंबरच्या अंकांत देशी भाषांचे प्राचीनत्व म्हणून एक स्फुट दिले आहे. त्यांत अपभ्रंश-काव्यत्रयी या ग्रंथाच्या परिशिष्टात दिलेल्या कुवलय-कथामाला नांवाच्या सातव्या शतकांत लिहिलेल्या एका जैन काव्यग्रंथांतील उताऱ्यांचा उल्लेख केला आहे. वरील कुवलयकथामालाकाव्य अपभ्रंश भाषेंत आहे पण त्यांत वेगवेगळया १८ देशी भाषांचे अस्तित्व असल्याचा उल्लेख असून मराठीला त्यांत मरहट्ठ (महाराष्ट्र) असें म्हटलें आहे. व दिण्णल्ले, गहिल्ले म्हणजे दिले, घेतले असे बोलणारे ते मरहट्ठे (महाराष्ट्रीय) असें वर्णन केलें आहे. यावरून शालिवाहनाच्या ७ व्या शतकांत मराठी भाषा बनत चालली असून स्वतंत्र नांव प्राप्त होण्याइतके वैशिष्ट्य तिला प्राप्त झाले होतें. या शोधाच्या प्रसिद्धीकरणाबद्दल प्रो. जोशी यांस धन्यवाद दिला पाहिजे. जैन वाङ्मयाच्या परिशीलनाने मराठी भाषेच्या इतिहासास फार मदत होईल या आमच्या विधानास वरील शोधाने पुष्टि मिळते.

अद्यापपर्यंत तरी संस्कृतमहाराष्ट्री-अपभ्रंश आणि मराठी या भाषांचा संधिकाल निश्चयात्मकपणें ठरवितां येत नाहीं. विद्वानांस तर्कावरच भिस्त ठेवावी लागते; तथापि त्या भाषेतील जुन्यांत जुने ग्रंथ कोणत्या कालांतले हल्लीं उपलब्ध आहेत हें मात्र निश्चयानें सांगतां येईल. हालाची सप्तशती जरी शालिवाहन शकारंभानंतर लिहिली आहे तरी त्यामध्यें पूर्वी होऊन गेलेल्या अनेक ग्रंथांचा संग्रह

आहे. अपभ्रंश ही शालिवाहन शकाच्या प्रथम शतकांत आभीरांची भाषा होती, पण दहाव्या शतकांत तींत वाङ्मय निर्माण होण्याइतके प्रगल्भ स्वरूप आले व भामह व दंडीसारख्या विद्वान कवींना त्या भाषेस व वाङ्मयास मान्यता द्यावी लागली. अपभ्रंशापासून मराठी केव्हां बनली हे निश्चयात्मक सांगणे संशोधकांस अद्याप सुकर नाही. मराठी भाषेतील अगदी बाल्यावस्थेतील ग्रंथ आपणांस उपलब्ध नाहींत. ज्ञानेश्वरी, विवेकसिंधु अथवा तत्पूर्वींचे महानुभावीय ग्रंथ आणि नाथ-सांप्रदायीय अनेक ग्रंथ बाराव्या शतकांत रचलेले उपलब्ध आहेत, तथापि ते सर्व मराठी भाषा सारस्वत निर्माण करावयास समर्थ झाल्यावर लिहिल्या गेल्या आहेत. तत्पूर्वींचे शिलालेख शालिवाहनाच्या १२ व्या शतकाच्या आरंभापासूनचे आहेत. केवळ श्रवणबेळगोळचाच कायतो एक छोटासा शिलालेख १० व्या शतकांतील आहे व सोमदेवाच्या अभिलषितार्थचिंतामणी नांवाच्या अकराव्या शतकाच्या पूर्वार्धांत लिहिलेल्या मराठी ग्रथांत कांहीं मराठी पद्ये उद्धृत केलेली आहेत. याशिवाय १० व्या शतकांतील मराठी लिखाण उपलब्ध नाही. अभिलषितार्थचिंतामणीच्या रचनाकाळीं महाराष्ट्रामध्यें मराठीमधून पद्यरचना होत असली पाहिजे व त्याकाली महाराष्ट्र योषिता दळतांना व कांडणाच्या प्रसंगीं मराठीचा जो ओवी-छंद या छंदामधून गाणी म्हणत असत इतकी मराठी भाषा रूढ झाली असली पाहिजे. श्रवणबेळगोळ हा कर्नाटकाचा भाग आहे. तेथील लेख इतर भाषेतील लेखांबरोबरच मराठी यात्रेकरूंनी खोदविला असला पाहिजे. अभिलषितार्थ-चिंतामणी हा संस्कृत ग्रंथ कल्याणि येथील राजानें लिहिला अथवा लिहविला आहे व कल्याणि हे शहरहीं पूर्णपणे महाराष्ट्रांत आहे असे म्हणतां येत नाहीं. त्या शहराचा कर्नाटकाशींच विशेष संबंध आहे त्यामुळें अभिलषितार्थचिंतामणी-मधील पद्यांमध्ये कानडी रूपांची झाक मारिते. यामुळे १० व्या व अकराव्या शतकांतील महाराष्ट्रांत मोडणाऱ्या भागांतील लिखाण अद्याप व्हावें तसें उपलब्ध नाहीं. पळसदेव येथील एकच काय तो मराठी शिलालेख उपलब्ध आहे तथापि या दोन्ही शतकांत मराठी भाषा निर्माण झाली असून महाराष्ट्रांत ती रूढ झाली होती व तिची मजल तींत पद्ये, ओव्या रचिली जाण्याइतकी रूढ झाली होती हें निर्विवाद आहे. शके ११०० ते १२०० या दरम्यानचे मराठी शिलालेख आज अनेक उपलब्ध आहेत. या शतकांतील उपलब्ध शिलालेखांच्या भौगोलिक विस्ता-

रावरून मराठी भाषेची बाराव्या शतकांत केवढी व्याप्ति होती याची कल्पना येईल. पश्चिमेस अगदीं ठाणे व परळ, पूर्वेस उनकेश्वर (हल्लींच्या निजामचे राज्याची उत्तरसीमा) व चंद्रपूर (मध्यप्रांत), दक्षिणेस कोल्हापूर, उत्तरेस पाटण (खानदेश उत्तरभाग) येवढा मराठीचा विस्तार होता या शतकांत देवगिरी येथील यादव-वंशीय मराठी राज्य जोमांत असून तेथील राजे स्वतःस चक्रवर्ति म्हणवून घेत असत. त्यांची राजभाषा मराठी असल्यामुळे अर्थातच या भाषेस वैभव प्राप्त झालें होतें. ११ व्या शतकांतील पळसदेव येथील शिलालेखावरून ही मराठी भाषा पूर्णावस्थेस आली असल्याचें दिसून येते. त्यांतच बाराव्या शतकांत नाथसांप्रदाय व महानुभावसांप्रदाय यांनीं मराठी भाषेत ग्रंथ निर्माण करावयास सुरवात केली. देवगिरीच्या यादवांच्या दरबारींही अनेक विद्वानांना आश्रय मिळाला असून त्यांनीं मराठी ग्रंथकारांस उत्तेजन दिल्याचाही दाखला उपलब्ध झाला आहे. नाथसांप्रदाय व महानुभावसांप्रदायांपूर्वी जैन पंथ आणि लिंगायत पंथ यांनींही मराठींतून ग्रंथरचना करावयास सुरवात केली असली पाहिजे. या अनुमानांची सत्यता त्या त्या पंथाच्या वाङ्मयाच्या संशोधनानें व अभ्यासानें कळून येईल. आज आपणांस ज्ञानेश्वरीपूर्वीचे अमरनाथसंवाद, गोरक्षगीता इत्यादि नाथसांप्रदायी व शिशुपाल-वध, वच्छहरण, एकादशस्कंद, श्रीकृष्णचरित्र इत्यादि अनेक महानुभावीय मराठी ग्रंथ उपलब्ध आहेत. त्या ग्रंथांच्या परिशीलनानें एक गोष्ट विशेष प्रामुख्यानें दृष्टोत्पत्तीस येते ती ही की मराठी भाषेंतील प्रथमची जी ग्रंथसंपत्ति उपलब्ध आहे ती सर्वस्वी संस्कृत भाषेंतील वाङ्मयावर उभारलेली आहे. भाषेच्या-च दृष्टीनें पाहिले असतां तत्कालीन ग्रंथांत विभक्तीचे प्रत्यय व कांहीं शब्द संस्कृत-महाराष्ट्री-अपभ्रंश व मराठी या परंपरेनें तयार झाले आहेत; तथापि पाहूं गेलें असतां मूळ संस्कृत शब्दांचाच भरणा फार आहे. मूळ देशी शब्द ज्यांना चुकून शुद्ध मराठी म्हणतात त्यांचा तर भरणा फारच थोडा आहे. मराठींतील देशी म्हणून गणले जाणारे हे जे शब्द आहेत त्यांची संस्कृत भाषांतून अथवा कानडी इत्यादि ज्या भाषांशीं मराठीचा संबंध होता त्या भाषेंतून उपपत्ति लागत नाहीं व ते मराठींत रूढ आहेत म्हणून त्यांस शुद्ध मराठी शब्द म्हणणे तर्कशुद्ध नाहीं. मराठी ही संस्कृतोत्पन्न भाषा नसून स्वतंत्र भाषा होती असा जोंपर्यंत निर्णय होऊं शकत नाहीं अथवा हे शब्द मराठींत नव्यानें प्रथमच प्रचारांत आले अशी उपपत्ति

लागत नाही तोपर्यंत या शब्दांना शुद्ध मराठी म्हणणें योग्य होणार नाहीं. त्यांना हेमचद्र म्हणतो त्या देशी अथवा देश्य नामानेच सबोधणे योग्य आहे अद्यापि महाराष्ट्रांत सस्कृत भाषेच्या पूर्वीपासून प्रचारांत असलेल्या अनेक अनार्य भाष होत्या त्यांपैकी अद्यापही कोरकु, गोंड इत्यादिकांच्या भाषा अवशिष्ट आहेत व त्यांचे भाषातौलनिक शास्त्राच्या दृष्टीनें अद्याप सशोधन झालेले नाहीं. तेव्हां त्या भाषांतीलही कित्येक शब्द या देशी शब्दांमध्ये आले असण्याचा सभव आहे.

मराठीच्या वाङ्मयनिर्मितीसंबधानें मात्र तशी गोष्ट नाही. मराठी भाषा ही वाङ्मयासबधानें सर्वस्वी सस्कृत भाषेची ऋणकरी आहे. उपलब्ध असलेल्या मराठी-मधील ग्रथांवरून पहिली गोष्ट ही दिसून येते की हे ग्रथ निर्माण करणारे शब्द सृष्टीचे ब्रह्मदेव सस्कृत वाङ्मयांत पूर्ण निष्णात होते आणि त्यांनी सस्कृतवाङ्म-याचें मराठी वाङ्मयांत अगदी हुबेहुब रूपांतर केले आहे. त्यामुळें मराठी भाषे-तील उपलब्ध वाङ्मयांतील अगदीं प्रथमचे म्हणून मानले जाणारे ग्रथसुद्धा संस्कृत सारस्वताच्या कसोटीस उतरणारे असे निर्माण झाले आहेत. १२व्या शत-कांतील कोणताही उपलब्ध मराठी ग्रथ घ्या व त्यास छद, अलकार, रस, गुण, काव्य-लक्षणादिकांच्या दृष्टीने आपण परीक्षा करून पाहा, आपणास वरील सिद्धांताचा प्रत्यय येईल. या एकाच कारणामुळे मराठी भाषेला बराच काळपर्यंत या उपशास्त्रां-च्या निर्मितीची आवश्यकता भासणार नाही.

देवगिरीच्या यादवांच्या राज्याचा अत झाल्यावर महाराष्ट्रावर मुसुलमानांचा अम्मल झाला तथापि त्यानतर १–२ शतकेपर्यंत मुसुलमानांच्या अल्पसंख्याकत्वा-मुळे आणि केवळ राजकारण व क्वचित् अल्पस्वल्प धदे या पुरताच मराठी भाषेशीं मुसुलमानांच्या अरबी व फारशी भाषांतील शब्दांचा संबध आला. मुसुलमान आणि महाराष्ट्रवासी यांचे धर्म भिन्न सस्कृतीचे असल्यामुळे व विशेषतः महाराष्ट्री-यांचे धर्म जुन्यास चिकटून राहणारे असल्यामुळें व त्यांचे वाङ्मय बहुतांशीं धर्माशीं सबद्ध असल्यामुळे महाराष्ट्रीयांच्या वाङ्मयांत निदान प्रथमच्या एकदीड शतकांत तरी मुसुलमानांच्या भाषेचा कांहीं एक परिणाम झाला नाहीं असे दिसून येईल. आज आपणांस तेराव्या शतकांतील बरेच मराठी ग्रथ उपलब्ध झाले आहेत. त्यांत आपणांस मुसुलमानांच्या भाषेंतील एकही शब्द आलेला दिसणार नाहीं. हें १२ व्या व १३ व्या शतकांतील मराठीवाङ्मय चरित्र, पुराण, स्थळ-

वर्णन, काव्यात्मक कथा इत्यादि विविध स्वरूपाचे आहे तथापि त्यांचा संबध कोणत्याना कोणत्या तरी धर्मपथाशीं अथवा सांप्रदायाशी जडलेला दिसून येतो. या एकाच गोष्टीमुळे मराठी भाषेचे अविकृत स्वरूप निदान तेराव्या शतकाच्या अखेरीपर्यंतच्या वाङ्मयांत टिकून राहिलें दिसून येते.

## १८ काव्यांत मुसुलमानांचा उल्लेख

हल्ली आम्ही प्रकाशित करीत असलेला ऋद्धिपुर काव्यग्रंथ हा त्याच स्वरूपाचा ग्रंथ आहे. तो शके १२८५ च्या सुमारास लिहिला हे वर आलेच आहे. मुसुलमानांची सत्ता स्थापन झाल्यावर ५०।६० वर्षांनी निर्माण झाला आहे व तो रीतपूर येथे ऐन मुसुलमानांच्या राजवटीतल्या गांवीं रचलेला आहे काव्यरचनाकालीं म्लेच्छ जे मुसलमान त्यांच्या छलाची व त्यांनीं चालविलेल्या कृत्यांची जाणीव कवीच्या अतःकरणांत जागृत असली पाहिजे हे पुढील ओव्यांवरून दिसून येतें.

भणे अनादि अविद्या अवघडी : भवम्लेच्छाचिए वांदोडी :  
पडिलेया बापुडी कव्हणाते जाणोचिना ॥ १६२ ॥  
भणौनि आम्हा कवण आहे कवणाते पुसो बापु माए  
कवणा बंध सोडीयाचे पाए धरुनि राहो : ॥ १६३ ॥  
ऐसा कव्हणी नाही सोएरा : जो न कृपावताचेआं द्वारां  
आम्हां बांधिलिया मोकारा : कवण घाली ॥ १६४ ॥

अशा भवम्लेच्छामुळे झालेल्या आर्तदशेचें वर्णन कवीनें केले आहे. याशिवाय तत्कालीन राजकारणपरिस्थितीचा काव्यांत कोठेंही उल्लेख नाहीं.

## १९ संस्कृत काव्याची परंपरा-मंगलाचरण.

कवीने हे काव्य सस्कृत सारस्वतांतील काव्यशास्त्राच्या नियमानुसार रचलें हें पुढील विवेचनावरून दिसून येईल. काव्यनाटकादि प्रबंधामध्यें नमनाची परिपाठी आहे. तें नमन तीन प्रकारचें असते." "आशीर्नमस्क्रियावस्तुरूपनिदर्शनम्" या वचनाप्रमाणे एक आशीर्वादात्मक, दुसरें नमस्कारात्मक आणि तिसरें वस्तुनिदर्शनात्मक म्हणजे काव्यनाटकाचा विषय बीजरूपानें सांगावयाचा असें तीन प्रकारचें नमन सांगितलें आहे. कित्येक ग्रंथांत काव्याच्या आरंभींच्या नमनांत या तिन्ही प्रकारच्या नमनाचा अंतर्भाव होतो. तशा तऱ्हेचे नमन आपणास संस्कृतमध्यें

अभिज्ञानशाकुन्तलांत तसेच वच्छहरण या मराठी काव्यांत दिसून येतें. या शिवाय नमनाचा आणखी एक प्रकार आहे त्या प्रकारासंबधाने विवरण शिशुपाल-वध या नांवाच्या मराठी काव्याच्या एका जुन्या टीपग्रंथामध्यें आलेले आहे तोच भाग येथें उद्धृत करतो.

" ग्रन्थादौ ग्रन्थमध्ये ग्रन्थान्ते मगलाचरणमिति श्रेष्ठाचारः । ग्रंथादौ म्हणजे ग्रंथाच्या आदि, ग्रथमध्ये म्हणजे ग्रथाच्या मध्ये, ग्रंथान्ते म्हणजे ग्रथाच्या अती । मंगळ म्हणजे कल्याणरूप । आचरणें म्हणजे बोलणें । इति म्हणजे ऐसा । श्रेष्ठाचार म्हणजे श्रेष्ठ आचार. आचार आहे तेचि प्रमाण । नमस्कारात्मकु दुसरें वस्तु निर्देशात्मकु तिसरें आशिर्वादात्मकु । प्रथम नमस्कारात्मक तें विघ्नविध्वंसकारक, दुसरें वस्तुनिर्देशात्मक ते ग्रंथसिद्धिकारक, तिसरें आशिर्वादात्मक ते ग्रथवृद्धिकारक. येणेंप्रमाणे प्रस्ताव करून टीपकाराने शिशुपालवधाचा टीप आरभ केला आहे. प्रस्तुतच्या काव्यांतही प्रथमारंभी मगलाचरणाच्या ज्या ओव्या नमस्कारात्मक दिल्या आहेत त्यांमध्ये हा काव्यग्रथ निर्विघ्नपणे सिद्धीस जावा म्हणून परावाचेची नागांबिकेची तसेच श्रीनागदेवाची स्तुति करून त्यांना नमस्कार केला आहे.

अगदीं प्रथमचीच ओवी

जे आर्त वच्छानदनी तापोपशमकादंबिनी
ते नमस्करू अमृतसजीवनी: श्रीदेववाणी: ॥ १ ॥

ही पाहिली तर या ओवीवरूनसुद्धा आशीर्नमस्क्रिया या त्रयीचा अंतर्भाव तींत येतो. परावाचेस नमस्कार करतांना उत्कठीत अशा भक्तरूपी वत्सांना आनंद देणाऱ्या धेनूची उपमा देववाणीस दिली आहे. तसेंच ससारतापाने पोळलेल्या भक्तांस शांत करणाऱ्या मेघमाळेची उपमा दिली आहे व श्रीऋद्धिपुरवर्णन करण्याचा हेतु तरी संसारतापाने त्रस्त झालेला कवि अथवा कविप्रमाणे इतर भक्त यांना ऋद्धिपुर येथील श्रीगोविंदप्रभु अवताराच्या लीलांचे कीर्तनश्रवण व लीलावस्तु व स्थळें यांचें दर्शन इत्यादिकांनी शांति अर्थात् मुक्ति मिळावी हाही हेतु या दुसऱ्या उपमेनें गर्भित आहे. तसेंच अमृतसजीवनी या उपमेनें संसारार्त भक्तांस परमेश्वरकृपा अमृतसजीवनीप्रमाणें सद्यः जीवविणारी आहे अशी आशाही पण आहे.

ते प्रसन्न नागांबिका: प्रसन्न होए आएका:
तरी सिद्ध सारस्वतमूर्खा: प्रकटों लागे : ॥ १३ ॥

सृष्टी परौता जेआ : सौरसु होए बोलावेआ :
ते नमस्करू ब्रम्हतनया : श्रीनागांबिका: ॥ १४ ॥

श्रीचक्रधरस्वामींची शिष्यीण श्रीनागांबिका इला ब्रह्मतनया शारदा कल्पून व मूर्खासहि तिच्या कृपेनें सारस्वत प्रकट होते असे सांगून सुकाव्य निर्मितीकरितां तिला कवीनें नमस्कार केला आहे.

श्रीनागार्जुनास नमस्कार करीत असतांना

बापुकळावानु कैसी : जो भास्करातें प्रकाशी :
जाणिवा पंडितासि : अधिकरणु होए : ॥२४॥

या श्लेषात्मक ओवीनें श्रीनागार्जुनाचे सामर्थ्य वर्णन करून कवित्वशक्ती प्राप्त व्हावयाची कवीनें अपेक्षा केली आहे. येथ कवीनें नागदेवाचार्यास कलायुक्त भास्कर म्हणजे सूर्य त्या सूर्याची उपमा दिली. त्याचप्रमाणें कळावान् म्हणजे इतका विद्यासपन्न की श्रीभास्कर कवीश्वराचार्यासारख्या विद्वानांस सुद्धां विद्यादान करी. तसेच जाणिवां पंडितांसी म्हणजे जे ज्ञानी आहेत, पडित आहेत अशांना सुद्धां ज्ञानोपदेश करी. येथ जाणिवां पंडिता या पदानी श्रीनागदेवाचार्यांचे शिष्य जनार्दनोपाध्ये उर्फ जानोपाध्ये व दामोदर-केशवाचार्यादि पंडीत यांचाहि उल्लेख करण्याचा कविमानस दिसतो.

मंगलाचरणाच्या ओव्यामध्ये शेवटी परमार्ग म्हणजे हा महानुभाव पंथ याचीं मूलभूत तत्त्वे – ज्यांचा या काव्यग्रंथाशीं निगडीत संबध आहे – ती सांगून त्यांसहि नमस्कार केला आहे. त्या ओव्यांतील मुख्य ओवी.

आतां अहिंसे निस्संगु : निवृत्ति भक्ति योगु :
तो नमस्करू परमार्गु : दाताराचा ॥२५॥

अशी आहे. याशिवाय ही परमार्गदर्शक ३।४ ओव्या पुढे दिल्या आहेत. या ओवींत हिंसारहीत, संगरहीत, प्रवृत्तिधर्मकर्मरहीत अशा तऱ्हेच्या परमेश्वरीय अनन्य भक्तियुक्त असा जो परमार्ग अर्थात् महात्म उर्फ महानुभावीय पंथ त्यास कवीनें नमस्कार केला आहे.

हीं सर्व नमनें विशेषतः मंगलाचरणरूप काव्यनिर्मितिसफलतेकरितां केलेलीं आहेत. यानंतर काव्याच्या अंतरंगांत मध्यवर्ति ओवी २०६ पासून २१५ पर्यंत

दुसरें मंगळाचरण आलें आहे. ते कवीने मोठ्या कुशलतेनें योजिलें आहे. कवि श्रीऋद्धिपुराचे दर्शन झाल्यापासून निरनिराळया भागांचें वर्णन करीत थेट रायांगणांमध्ये आला आणि तेथें आल्यावर

ते नव्हे हें रायागण : जे पात्र झालें श्रीचरणा :
बीजे करितां जीवोद्धारणा : लिळावशें ॥२०३॥

या ओवीत श्रीप्रभूने जीवांचा उद्धार करण्याकरितां अवतार धारण करून राजमठ आणि रायांगण यांत वास केला. येथ श्रीप्रभूचा प्रवेश होतांच

सर्वज्ञाकरितां बीजे : तरि दीशाचि आनदे फुजे :
तेथ जयजयशब्दी स्तविजे : देवनागणी : ॥२०६॥

यांत वर्णन केल्याप्रमाणे कवि म्हणतो देवतागणांनी विमानांतून जयजयकार शब्दांनीं प्रभूवर स्तुतीचा वर्षाव केला. २०७ व्या ओवीपासून २०९ ओवीपर्यंत परमेश्वराचे गुणानुवाद कथन केले असून मायावेषा व जीवांसुखनिधि या विशेषणद्वयाने प्रभूनें अवतारधारणा करून जीवोद्धरणाचा मार्ग सुलभ केला हें दर्शविलें आहे. २११ व्या ओवीत तुझ्या सन्निधीपुढे अमृत, स्वर्ग इत्यादि सुखसाधनें बापुडी आहेत असे दर्शविले. अशा प्रभूची करुणा २२२ व्या ओवीपासून २२६ ओवीपर्यंत कवी मोठ्या सद्गदीत अंतःकरणाने भाकतो व भवार्णवांत बुडणारा मी तू (परमेश्वर) जो तारक त्या तुझ्यासाठी राजभुवनाकडेस धांवत आलों असें कवीनें सुचवून या काव्यरचनेचा बीजरूप हेतुहि दर्शविला आहे.

यानंतर तिसरें मगलाचरण कवीनें या काव्यग्रंथाच्या शेवटीं ६३८ व्या ओवीपासून ६४१ व्या ओवीपर्यंत घातलें आहे. हें यांतील पहिल्या तीन ओवींमध्यें परमेश्वराची सार्थ विशेषणे देऊन त्यास आळविलें आहे व ६४१ व्या ओवींत

जय अव्यक्ता निर्गुणा : जयमूर्ती सगुणा :
वरद होई नारायणा : अनाथासि : ॥६४१॥

याप्रमाणें निर्गुण आणि सगुण परमेश्वरास आळवून अनाथ अशा नारायणकवीस वरद होई अशी आशी देई अशी करुणा भाकिली आहे. अशी कवीनें परंपरागत काव्यरचना केली आहे.

## २० वैदर्भी रीतीचें काव्य.

प्रस्तुत काव्यग्रथ हा संस्कृत वाङ्मयांतील प्रसिद्ध आणि प्रमुख असलेल्या वैदर्भी रीतीचा उत्कृष्ट नमुना म्हणून म्हणावयास हरकत नाही. "अस्पृष्टा दोष-मात्राभिः समग्रगुणगुम्फिता । विपञ्चीस्वरसौभाग्या वैदर्भीरीतिरिष्यते ॥" अशी वामनाने व्याख्या केली आहे. तसेच वैदर्भी रीतीचे समग्रगुणगुम्फितत्व अथवा सर्वगुणाश्रयत्व सांगतांना 'ओज.प्रसादश्लेषसमतासमाधिमाधुर्यसौकुमार्योदार-तार्थव्यक्तिकान्तयो बन्धगुणाः त एवार्थगुणा इति" याप्रमाणे गुणांची यादी दिली आहे. प्रस्तुत गुण हे उभयविध म्हणजे शब्दरचनाचातुर्य आणि अर्थचम-त्कार यांवर अवलबित आहेत. आधुनिक मराठी साहित्यशास्त्रकारांनी संस्कृत साहित्यशास्त्रावरच आपल्या शास्त्राची इमारत उभारली आहे व त्यांनी वरील गुणां-पैकी प्रसाद, ओज आणि माधुर्य या प्रमुख गुणांचेच विशेष विवेचन केले आहे. वरील सर्व गुण हे काव्यांतील रसांचे परिपोषक असल्यामुळे निरनिराळे रस साधा-वयास निरनिराळ्या गुणांचा अवलब करावा लागतो. या नियमास अनुसरून प्रस्तुत काव्यांत शांत, करुण, उदात्त, आणि मराठी शास्त्रकारांनीं मानलेला दहावा भक्तिरसांचा परिपोष करावयास कवीने प्रसाद, ओज, माधुर्य, सौकुमार्य, उदारता इत्यादि गुणांचा अवलंब केला आहे. प्रस्तुत काव्य एका वीतरागी निवृत्तिमार्गीयाने रचिले असल्यामुळे या काव्यांत शृंगार आणि हास्य या रसांना थारा मिळाला नाही, तथापि भक्तिरसप्रधान असल्यामुळे आणि निवृत्तिमार्गाची महती वर्णावयास आणि भवपथाचा तिटकारा उत्पन्न होऊन त्यावर विजय मिळवावयास क्वचित् क्वचित् भयानक आणि वीर या रसांचाहि या काव्यांत अवलंब केला आहे. तसेंच वरील रसांचा परिपोष व्हावयास कवीनें शब्दगुणांपेक्षां अर्थगुणांकडेस विशेष लक्ष दिले आहे; त्यामुळे या काव्यांत आपणास शब्दालंकारांपेक्षां अर्थालंकारच जास्त दृष्टोत्पत्तीस येतील. तरीहि कवीनें शब्दालंकारांकडेस अगदींच दुर्लक्ष केलें असें म्हणतां येत नाही. या विवेचनावरून दिसून येईल कीं अलकार, गुण आणि रस यांचा परस्परांशी कार्यकारणरूप सबंध असून या साहित्याच्या आधारावर कवीस काव्याचा प्रासाद उभारतां येता. ही जाणीव प्रस्तुत कवीस पूर्णपणें होती व तो साहित्यशास्त्रज्ञ होता हें

तऱ्हीं आळंकारेंवीण : न मिरवे काव्यलक्षण :
रत्नें नव्हति कां पाषाण : पुन राजा योग्य कीं : ॥३८१॥

मणौनि शब्दरत्नां सोहोज्वळां : जाउनि साहित्याचिआ वेळावळा :
भरौनि आणै खोळा : उन्मेषांचिआ : ॥३८२॥
ग्रंथ सुवर्णमुद्रिके : खेवणु भावमाणिके :
मग दरुशना दे कवतिके • श्रीप्रभुरायां ॥३८३॥

असें राजमठप्रवेशाच्या वर्णनाच्या वेळीं रूपक योजिलें आहे त्यावरून दिसून येतें.

प्रस्तुत काव्याचा विषय वर्णनात्मक असल्यामुळे हे काव्य स्वतत्र असें कवीनें राचिले आहे. या काव्यांत कवीचे रचनाचातुर्य आणि त्याची नित्यनूतन कल्पना प्रसविणारी प्रतिभा प्रत्येक ओवीमध्ये दिसून येते. त्यामुळे काव्यामध्ये नितांतरम्य आणि हृदयंगम स्थळे अनेक साधिली आहेत; त्याचे स्वारस्य घ्यावयास समग्र ग्रंथच वाचावयास पाहिजे कोणतेहि पान आपण उघडले तरी त्यांत आपणास कवीचे कौशल्य व प्रतिभा आढळून येईल तथापि प्रसाद, ओज, माधुर्य इत्यादि गुणांचा आश्रय घेऊन कवीने निरनिराळ्या अलकारांची रचना करून रसाचा परिपोष कसा केला याची निदान ४।५ तरी उदाहरणे, केवळ अगुलीनिर्देश म्हणून, नमूद करणे आम्हांस अवश्य वाटतें.

कवीनें ४४ व्या ओवीपासून ५७ व्या ओवीपर्यंत, ऋद्धिपुर क्षेत्राचें दुरून दर्शन झाल्यावर ज्या भावना अतःकरणांत उत्पन्न झाल्या व कवीच्या संसारार्त मनास दर्शनमात्रेकरून जी शांति मिळाली, तिचे वर्णन केलें आहे.

मोळिकारा धांडोळिनां रानें : जेवि मोळिए जोडले बावने :
नातरि दुर्भक्षीं पकवाने : शकु लाहे : ॥४५॥
दारिद्रीं आडुखुळे रिद्धी : अनाचार्याते वरीति सिद्धी
निःकंचना उपाधि : टाकौनि ए : ॥४६॥
रोगिया अमृत पानु : लाहे तान्हैला जीवनु :
स्वामि जालेया प्रसन्नु : जैसें सेवकां होए : ॥४७॥
सासुरवासे शीणली : तिये भेटे जेवि माउली :
असो हे तैसी परि जाली : श्री ऋद्धिपुर देखिलेआं : ॥४८॥

या वर्णनांत आलेले दृष्टांत किती समर्पक आहेत व वाचतांच वर्णनांतील अर्थ सहज लक्षांत येऊन चित्ताची कशी प्रसन्नता होते हे वाचकांस कळून येईल. त्याचप्रमाणें

तें हें कैवल्यबीजाचें क्षेत्र : कीं निघृतांचें परत्र :
कीं परु सुखाचें छत्र : मांडिले आर्तासि : ॥५०॥
की धर्माची उत्तर बेंठ : कीं सिद्धीची ऊळगवट :
ना तो संसृतीसि ताठ : वज्रलेप : ॥५१॥
किंवा समर्थांचें कवण जाणें : उठवावेआ संसाराचें ठाणें :
पाळेगण मीं भणें : देवराआंचे : ॥५२॥
की संसारनगरी : वासिजे द्दी अनाचारी :
तेआ वेगळी ब्रह्मपुरी : केली ब्रह्मण्यदेवें : ॥५३॥
श्रुतीस्मृतींचेनि अर्थे : स्वधर्मे अनुष्ठाते :
जेथें सदाचार नादते : ब्रम्हविदः ॥५४॥

या ओव्यांमध्यें उत्प्रेक्षा साधून संसारतापाचा परिहार करून चित्तास शांति देणारें ऋद्धिपुरक्षेत्र प्रामुख्यानें वर्णिलें आहे. या ओव्यांतहि अर्थ सहज ध्यानांत येऊन चित्तास प्रसन्नता येते, यामुळें प्रसादगुण साधिला आहे व त्या सहजसुंदर वर्णनांत दृष्टांत, उत्प्रेक्षा इत्यादि अलंकारानें शांतरसाचा परिपोष झाला आहे.

प्रस्तुत काव्य विशेषतः स्थूलवर्णनात्मक असल्यामुळें यांत विविध प्रकारचें निसर्गवर्णनहि फार उत्कृष्ट साधलें आहे. हे यांतील बाह्यप्रदेशवर्णन, वृक्षादि महिमा, देउळेवर्णन, सरोवरवर्णन, नगरप्रवेशवर्णन, राजमठ, उंबरवट इत्यादि वर्णनांवरील ओव्या वाचिल्या असतां कळून येईल.

बाह्यप्रदेशांवरील वृक्षांचे वर्णन :—

संवरितु नगराची बरंव : तैसे चातुर्दक्ष आरव :
वरि सुहावे कलरव : पाक्षियांचे : ॥७२॥
भवपाष छेदु : जो ब्रम्हादिकां वंद्यु :
तो पातला संबंधु : देवरायाचा : ॥७३॥
आमुतें संबंधु सोइले : पृथ्वी फुजे बापकोळे :
भणौनि पाताळा गेलीं मुळें : मज पातां : ॥७४॥
परोपकृती लागौनि तेआं : बिनयो आति जेयां :
निवबीती फळपत्रछाया : आंर्तातें : ॥७५॥

निन्द्राकर्ण रसायणें : वरि होति विहंगमांचीं कुंजनें :
तळवटीं भिक्षुकांचीं वीजनें : तेणे डोळे धाती : ॥७६॥

देवळांचें वर्णन करीत असतांना :—

तेथें उंचपणें कळसीं : स्पर्श कजित आकाशी :
देखे चातुर्दक्ष तैसीं : सुराळयें : ॥८३॥
साखाळाचिया उंचिया : पाता दृष्टि टांचिया :
जालिया बुद्धि सौरिचिया : ते रचना पांता : ॥८४॥
कीं प्रासादांचेनि मीषें : आकाशा माच बांधले जैसें :
दृष्टी उळघताति सायासें : जरि अंत लाहातिना : ॥८५॥
कीं प्रासाद मेरू : बरि कळम पूर्ण चंद्रु :
तैं शारदि देवेंद्रु : क्रीडा करी : ॥८६॥
कीं देवतावरि : प्रासाद छत्र धरी :
उळगताती ऋद्धिपुरीं : देवरायाते : ॥८७॥
ऐसीं नगर मंडीते देऊळे : देखे गोक्षीर धाम धवळारें :
ना तिए जालीं उजळे : दृष्टीवेनि : ॥८९॥

तसेंच सरोवराचें वर्णन पाहिल्यास :—

तया देवयतनां जवळिके : सरोवरें देखे सुलक्षणिके :
तेथ टाहुवा करीति चक्रवाके : विरह कातरे : ॥९१॥
निर्दोष निःपाप निर्मळे : वोसडत परिपूर्ण जळे :
सर्वांगे जालीं वाचाळे : कळरवीं पक्षियाचेनि : ॥९२॥
ठाइ ठाइ बरवट : निवृतमंडीत घाट :
जैसे प्रवृत्ति पाथावरी : तपोनिधि : ॥९३॥
मदे मळयानिळे : झगटलें पाणी हाले :
तें मज पा सुखें डोले : परम पुरुषाचेनि : ॥९६॥
असो हे पोखरणी बावी : जेआ श्रीचरणकमळें बरवीं :
देउनि गोसावी : बीजे करीति : ॥९८॥

आतां नगरांतील इमारतींचें वर्णन पाहतां :—

किंबहुना अनुपम्ये : देखे नगरिची हर्म्ये :
जे पांता जाली धर्म्ये : वीतरागांसि : ॥१०९॥
रचना विशेषे विचित्रीं : हाट चौहाटे तोथरी :
मढमडप चौबारी : देखे धमसाळां : ॥११०॥
ते मीलपे निपुणे : कुमरी रचिली जेणें :
तो विश्वकर्मा मी भणे : आज्ञा देवाचिया : ॥११॥
ऐसी अगर्गीनें रचिते : पाया चालेति राजपथें
तव पदे ठेवींतु दृष्टिपूते : देखे संतजनु : ॥१२॥

हीं व याशिवाय अनेक एकाहून एक सरस निसर्ग व सृष्टिवर्णन आपणांस या काव्यांत पहावयास मिळतात. हीं वर्णने अनुप्रास, यमक आणि श्लेष इत्यादि शब्दालकार आणि उपमा, दृष्टांत, उत्प्रेक्षा इत्यादि विविध अर्थालंकाराचा उपयोग करून सजविली आहेत व या अलंकाराच्या साहाय्याने त्या त्या विषयांचीं अनुरूप वर्णनें करून ओजगुण या काव्यांत साधिला आहे. या वर्णनामध्ये अद्भुत रस साधिला असून त्या मधून परमेश्वरविषयक व शांतिदायक भक्तिरसाचा मसाला भरला आहे.

प्रसाद, ओज या गुणांनी युक्त असलेल्या काव्याचे नमुने दाखविल्यानंतर माधुर्य-गुणानें परिप्लुत असे मधुर काव्यखड रसिक वाचकांपुढे ठेवितो.

कवि भक्तावरील प्रेमाचे वर्णन करितो ते असे :-

वाप साधन निरुपम : जे जाणे धुरेचे वर्म :
जेणं वालभैं परब्रम्ह : पाठीं धांवे : ॥१५६॥
जैसी ओरसे धेनु : हुबरुत ये वच्छा लागौनि :
ना तरि बाळाची आर्ति देखौनि : जननी जेवीं : ॥१५७॥
तेवि तया सदैवा सवे : जगदात्मा पाठीं धांवे :
तै श्रुति निर्गुण भणता एणें नावें : लाजतु असे : ॥१५८॥
असो हे भवमोचना : देवरायाचे लाडसपणा :
देखिले राजभुवना : माजि नांदते : ॥१५९॥

तसेंच कवि परमेश्वराची करुणा भाकतो ती :--

बाप समर्था बापा : भणवीसी आपणयातें नृपा :
तरि लेंकरुवा कां पा : दैन्य भोगु : ॥८९॥
जाणितले जेया लागि उदासु : जोजार प्रसवलासि बहुवसु :
भणौनि उबगैलासि पोसु : जीवजातां : ॥९०॥
प्रजापालनि जेंव्हि : काइ आक्रोशे आनि कासुवी :
तिचा भीतरूचि वाढवी : तेया बाळकाते : ॥९१॥
तेंमे सकळ जीवांचे जीवन : जें अतीवस प्रसन्न :
ते माउली कां चोरताहे पान्हा : तुझी कृपादृष्टी ॥९२॥

वरील दोन्ही अवतरणे वत्सलरसाची उदाहरणें म्हणून सांगतां येतील. निरनिराळे दृष्टांत देऊन प्रभूचा भक्तांशीं मातृपुत्रसंबध मोठया प्रेमळपणाने वर्णिला आहे. वाचकांस काव्य वाचतांना कवीच्या उच्च प्रतिभेची क्षणोक्षणीं प्रतीति येईल.

प्रस्तुत काव्यांत स्थळवर्णनाबरोबर व्यक्तिवर्णन म्हणजे श्रीमूर्तिवर्णनहि आलें आहे. त्या वर्णनांतहि कवीची प्रतिभा चांगलीच दिसून येते. प्रभूमूर्तीचे आपादमस्तकवर्णन कवीनें ५५० व्या ओवीपासून ६१० व्या ओवीपर्यंत केले असून फारच अप्रतीम आहे. मूर्तिवर्णनपर ते स्वतंत्र खडकाव्य होईल असें उच्च दर्जाचे आहे. नुसत्या नाभीचेच वर्णन केले आहे ते पहा :—

नाभि सखोल सुदर : ना तो मायापुरीचा भंवरा :
दाटीतुमे भीतुरा : तरतेयाते ॥५६८॥
नाना मार्गी सेवी : नागविलेयाची केली नाभी :
तेथ जीव देवतांचा बोंबी : कवण वांचे : ॥६९॥
उदैजेति पर बिंबां : काळि कोळिगा राहिला कोंभीं :
तेथ प्रभुते भगिजताहे नाभी : अमळ त्रयातें : ॥७०॥
तेआं नाभि मडळा अगाधा : समवेत ब्रम्हे पेलिला दोंदा :
तेथ भीतरि भरलेया आनदा : सामानुक सायासु : ॥७१॥

५७० व्या ओवीचा टीपकारांनी तीन तऱ्हेनें अर्थ केला आहे तो अवश्य पाहाण्याची तसदी घ्यावी.

५०५ व्या ओवीपासून ५४३ व्या ओवीपर्यंत भोजनपक्वान्नवर्णन आलें आहे.

तेराव्या शतकांतहि प्रसिद्ध असलेल्या पक्वानांची यादी आपणास तेथें पहावयास मिळेल. या वर्णनांतहि कवीची प्रतिभा सोज्वळ दृष्टोत्पत्तीस येते.

ताटी तेचि गगनु : वटिका पूर्णचंद्राचे मानु :
भणौनि अमृतफळें तारांगणु : सारिखी दीसेति : ॥५२२॥

असें रूपक ताट, त्यामधील वडा आणि अमृतफळें यांसंबंधानें योजिले आहे. तेंसच सरवळयाच्या खिरीचें

मोकळीं मोतिये जाति पसरी : भणौनि पायसें आळिलीया सरवळिआचीया क्षीरी :
वरिपचधार गौरी : आळगी चोखाळपणे : ॥५१४॥
द्वीजपंक्तिची रचना : हारी हासे रसना :
तुम्हा उभयता लागद्दीलागो देना : सेवितां मी : ॥१६॥

हे वर्णन फार मार्मिक आणि विनोदी आहे.

## २१ काव्यांतील तत्त्वज्ञान.

महानुभावीयांचें तत्वज्ञान संक्षेपरूपानें आरंभींच सांगितलें आहे व तें केशवराजसूरि यांनीं एकत्रित केलेल्या सूत्ररूपपाठांत ग्रथित केल्याचेंहि वर आलेंच आहे. प्रस्तुत कवि नारायण व्यास यांनीं हें काव्य संसाराचा त्याग केल्यानंतर व संन्यासाश्रमाचा स्वीकार केल्यावर लिहिलें आहे, तेव्हां अर्थात् महानुभावीयांच्या सूत्रपाठांतर्गत धर्ममतांचें प्रतिबिंब आपाणस या काव्यांत पहावयास मिळते. हीं धर्ममते अथवा तत्वज्ञान या काव्यांत जागजागी विखुरलेले दृष्टीस पडेल. व्यासंगी आणि जिज्ञासु वाचकास तें एकत्रित करतां येईल. विशेषतः परमार्गमहिमा, स्वात्मनिरोपण, स्तावकात्म निवेदन इत्यादि प्रकरणांमध्ये पहावयास मिळेल. या भवचक्राच्या फेऱ्यांतून सुटावयासबंधीं विवेचन १५ व्या प्रकरणांत स्तावकात्म निवेदनांत केलें आहे.

भणे अनादि अविद्या अवघडी : भव म्लेच्छाचिया बांधौडी :
पाडलेया ही बापुडी : कव्हण गती जाणौचिना : ॥६२॥
तव प्रवृतिचे कांइ साधे : चालावलो फळ श्रुतीचोनि मार्गें :
आम्हीं व्यसनाईतु आवघे : कांही जाणौचिना : ॥१६६॥

तेह्वेळीं चतुर्युग भजणे : वर्णाश्रम साधनें :
सकल देवतांची ज्ञानें : धांडोळिलीं ॥१६६॥
यज्ञोपायने देऊनि करी : भजिनलों नानापरी :
परि आवघी प्रपंचाचीं सोएरी : ते जाणोंचिना : ॥१६९॥
वसवीति आपुलाला लोकीं : देति निजे सारिखी :
जवळीचि दाऊनि नीकीं : मेळवीति आपणेया : ॥१७०॥
हा तवाचि आदर बहु : जव सुकृतांचा सभहु :
मग निगावा चक्रवाहु : भारिवा तो : ॥१७१॥
तैसे स्वर्गादिसुखा : रातलेआं जीवां अशेखा :
परिणामीं भवदु खा : वांचौनि आन नाहीं : ॥१७३॥
कीं बुडतां भवसागरीं : भणौनि देवताचक्रीं :
माया मोही भवडितां ही परी : न जीएतीचि ते : ॥१७६॥
कर्मभूर्मीचिए घानौडि : बांधौनि मिथ्या ज्ञानाची झांपडी :
काळें भवंडिलीं बापुडीं : जीव पशुवे : ॥१७७॥
परि जीव भोगाचा जीनसी : नाहीं देवताही सौरसी :
भणौनि आपुलाला कर्म-लेपेसीं : ऊळखेति तियां :॥१८०॥
असो हे भवबांधौडीचे जे हि सुटिक बोलीजेति जीवाचे
ते मिया उपाय धांडोळिले सृष्टीचे : भणे नारायणु ॥१९१॥

याप्रमाणें वर्णन केल्यावर कवीने भवबंधसुटकेकरतां परमेश्वराची अनन्य भक्ति ह्याच एक उपाय आहे असे प्रकरण १९ मध्ये आणि पुढील वर्णनांत सुचविले आहे.

येथवर काव्यांतील वर्ण्य विषय, साहित्य इत्यादिकांसबधाने सारांशाने विवरण झाले.

## २२ जुने टीपग्रंथ

प्रस्तुत काव्य ज्ञानेश्वरीनंतर सरासरी ७०।७२ वर्षांनीं लिहिलें आहे. त्यामुळें ज्ञानेश्वरीत येणारे जुने शब्द या काव्यांत सांपडतात. या शिवाय आणखी बरेच जुने शब्द आणि शब्दांची रूपे या काव्यात आढळून येतात; तीं हल्ली मराठी भाषेमध्यें लुप्त झाली आहेत. १२ व्या १३ व्या शतकांतील वाङ्मय अद्याप व्हावें तसें प्रसिद्ध झालें नाही. ज्ञानेश्वरीपूर्व एक शतक आणि ज्ञानेश्वरच्या उत्तरकालीन

एक शतक या मधील बराचसा मराठी भाषेंतील ग्रंथसंग्रह अद्याप अप्रकाशीत आहे. पण त्यापैकी बराचसा संग्रह महानुभावीय ग्रथांचा असल्यामुळें आणि महा-नुभावीयांनी या ग्रथांचा अभ्यास परंपरागत असा पथामध्ये अद्यापपर्यंत कायम ठेविला असल्यामुळें या ग्रथांत येणाऱ्या जुन्या शब्दांचा अर्थ समजणे सुकर झालें आहे. यावर महानुभावीयांनी ग्रंथांतील शब्दांचा अर्थ सुगम व्हावा म्हणून टीप-ग्रथहि लिहून ठेविले आहेत. सूत्रपाठाचा जो ग्रंथ आहे त्यावर भाष्य, महाभाष्य इत्यादि प्रचड स्वरूपाचे ग्रथच निर्माण झाले आहेत. या प्रस्तावनेच्या आरंभीं जे प्रसिद्ध सातीग्रथ म्हणून सांगितले आहेत. त्यावर तर अनेकांनी टीपा लिहिल्या आहेत. प्रस्तुत ऋद्धिपूरवर्णन या पुस्तकांत खाली टीप दिली आहे. ती त्या पैकींच एक आहे. तथापि त्या टीपेखाली टीपकाराचें नांव प्रतींत नसल्यामुळे ती कोणाची असे निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. तथापि ज्या प्रतीवरून ती टीप उत-रून घेतली त्या प्रतीच्या हस्ताक्षरावरून आणि टीपेतील भाषेच्या स्वरूपावरून ती निदान १६ व्या शतकांतील असावी असा आमचा अदाज आहे. एकंदर-आम्हास साती ग्रंथाचे दोन टीपग्रथ मिळाले; परतु त्यांत ही बरी वाटल्यावरून येथें दिली आहे. साती ग्रथावर एकंदर सात टीपा असल्याचे आमचे स्नेही प. महंत श्रीगोपीराज बावाकडून कळलें आहे त्यांपैकी विश्वनाथ बीडकर, भीष्मा-चार्य व चाहेव्यास बागडे, विनायक व्यास तळेगांवकराचे शिष्य, यांचे तीन स्वतंत्र टीपग्रथ आहेत व या शिवाय अनतमुनि चोरयाचक यांची साती ग्रंथावर तिसरी शोधनीची टीप आहे. हरिंद्रमुनि पुसदेकर याची ५ वी टीप आहे व दत्तराज मराठे, जे कवीश्वर आडनांवाचे असून जनार्दनाचे शिष्य होते, त्यांची सहावी टीप म्हणून प्रसिद्ध आहे. येथें एकंदर सहा टीपग्रंथ नमूद केले असून सातव्या टीपग्रंथाचें नांव मिळालें नाहीं. प्रथमचे तीन ग्रंथ सोडून बाकीचे टीपग्रंथ हे शोधनी टीपग्रंथ म्हणून गणले जातात. शोधनीचा अर्थ असा की प्रथम एकानें टीप लिहिली त्यानंतर दुसरा टीपकार तीच टीप आधारास घेऊन ती विस्तृत करितो त्यास शोधनीची टीप ह्मणतात. त्यावरहि दुसऱ्या टीपकाराने जरा विस्तृत विवरणासह टीप लिहिली तर ती दुसरी शोधनाची टीप असें म्हणतां येईल. अशा तऱ्हेनें दत्तराज मराठे यांची शेवटची शोधनीटीप म्हणतां येईल. ती बरीच विस्तृत असल्याचें समजतें. पण आम्हास ती पहावयास मिळाली नसल्यामुळें त्या-

विषयीं तूर्त लिहितां येत नाहीं. या ग्रंथांत जी टीप दिली आहे तीमध्यें शब्दार्थ दिला असून शिवाय ओवीचा अर्थहि अवश्य वाटला तेथें दिला आहे त्यामुळें टीपग्रंथ फार उपयुक्त झाला आहे.

## २३ प्रतिलेखन

प्राचीन मराठी वाङ्मयाचें संशोधन व प्रकाशन करावयास अत्यंत अडचणीची कोणती गोष्ट असेल तर ती प्रकाशनाकरितां प्रति लिहावयाची ही होय. आम्हांस प्रथमतः हा भरंवसा वाटत होता कीं महानुभावीय ग्रंथ सांकेतिक लिपीमध्यें असल्यामुळें त्यांत शुद्धाशुद्धाला सवड नसेल व आपणांस शब्द तत्कालीन (ग्रथकारकालीन) शुद्ध आविकृत स्वरूपांत सांपडतील. पण निरनिराळ्या शतकांतील निरनिराळ्या लिपीग्रथांच्या परिशीलनाने आमची खात्री झाली कीं कोणत्याहि दोन प्रति ततोतत जुळणें शक्य नाही. सस्कृताप्रमाणे मराठी भाषेस ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वार इत्यादिकांचा निर्बंध नसल्यामुळे आणि आधुनिक काळापर्यंत सुद्धां तिला ऱ्हस्वदीर्घ अनुस्वारासंबधी अविकल्प अशी नियमबद्धता प्राप्त नसल्यामुळे एक प्रतिलेखकाची प्रत दुसऱ्याच्या प्रतीशी मिळणे अशक्यच आहे. त्यांतून देशविभागपरत्वे मराठी भाषा बोलणारामध्ये ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वार इत्यादिकांसंबंधानें स्वाभाविक फरक पडत असल्यामुळें तर अनियमीतपणामध्यें आणखीच भर पडली आहे. जुन्या प्रतीवरून नक्कल करणाऱ्या लेखकाची स्वाभाविक प्रवृत्ति प्रचलित भाषेशीं जुळती अशी जुन्या ग्रंथाची भाषा शुद्ध करून घ्यावी अशी असते. या पद्धतीस अनुसरूनच आज छापलेले नामदेवाचे, तुकारामाचे अभगच काय पण प्रत्यक्ष जुन्यांत जुनी अशी गाजलेली ज्ञानेश्वरीहि अगदीं प्रचलित भाषेशीं जुळती व शुद्ध करून छापिलेली दृष्टीस पडेल. कै० राजवाडे[१] यांचा कटाक्ष प्रति जशी असेल तशी प्रामाणिकपणें नकलून घेणे हीच पद्धति सर्वोत्कृष्ट. तारतम्य पाहून पूर्वीच्या लेखकाचे हस्तदोष असतील ते दुरुस्त करून घेण्याइतकी पात्रता नक्कल करणारांत नसेल तर त्यानें अगदीं अस्सल बरहुकूम नक्कल केलेली पुरवेल, हें कै० राजवाड्यांचे मत. श्री. बाळकृष्ण अनंत भिडे[२] यांच्या मतानें नक्कल करतांना शब्दांचीं रूपे तर कायमच ठेवायाची, ऱ्हस्व, दीर्घ अनुस्वारादि जे असतील ते कायम ठेवावयाचे परंतु एक शब्द

---

१ साधनें खंड ८ वा. प्रस्तावना पान (footnote) २ विविधज्ञानविस्तार १९२७

जर निरनिराळ्या ठिकाणीं निरानिराळया पद्धतीनें लिहिला तर त्यांपैकीं जो अधिक शुद्ध असेल तोच सर्व ठिकाणीं दुरुस्त करून घ्यावयाचा; अनुस्वार वगैरे कोठें फाजील पडले असतील अथवा कमी दिले असतील तर लिखाणांतील शब्दांचें साम्य सपादन करावयास ते ते दुरुस्त करणे अवश्य आहे. मूळ प्रतिलेखकाचा उघड उघड जर हस्तदोष दिसून येत असेल तर तो दुरुस्त करावयास मुळींच हरकत नाहीं. प्रतीचें मूळ स्वरूप होतां होईल तो कायम ठेवणें हें त्यांस मान्य आहे. या उभय विद्वानांच्या मतांस मान देऊन आम्ही आमचा मार्ग प्रतिलेखनासंबंधानें स्वीकारला आहे. प्राचीन मराठी वाङ्मय या ग्रंथाचे खंड मराठी भाषेच्या अभ्यासाकरितां उपयोगी पडावे हा आमचा ग्रंथप्रकाशनाचा मुख्य हेतु. असल्यामुळें आम्हास ग्रंथकाराच्या वेळचे भाषेचे स्वरूप कायम ठेवितां यावें हें धोरण प्रतिलेखनाकरितां आम्ही पुढें ठेविले आहे. लिपीग्रंथामध्ये शब्द तोडले नसल्यामुळें आम्हास मराठीमध्ये नकल करतांना शब्द तोडून लिहावे लागले. प्रस्तुत काव्याची प्रति करतांना आम्हांस फक्त दोन प्रति मिळाल्या. त्यांत जी प्रत जुनी वाटली तिलाच जास्त प्राधान्य आम्ही दिले आहे. प्रति करितांना ऱ्हस्वदीर्घ आम्ही प्रतींतीलच कायम ठेविले; तथापि अनुस्वार वृथा आहेत असें वाटलें ते गाळले आहेत; तथापि अद्यापहि बरेच अनाठायीं कदाचित् जुन्या प्रतिलेखकाच्या हस्तदोषानें पडले असतील असे काहीं अनुस्वार छापलेल्या पतींत राहिले असतील व पदे पाडतांना दोषस्थळें राहिलीं असतील त्यांची आम्हास जाणीव आहे. १२ व्या शतकांतील शिलालेखावरून सुद्धां त्या काळी अनुस्वारासंबधी नियम होते असे दिसतें. हल्ली अनुस्वारासबधाने मराठी भाषेचे जे सर्वसाधारण नियम आहेत ते त्या वेळीहि प्रचलीत होते असे जुन्या शिलालेखांवरून दिसते व त्यावरून त्या वेळचे नियमहि आपणांस बांधतां येतील. पण त्याच्या चर्चेचें हें स्थळ नसल्यामुळें त्यासंबधी आणखी लिहितां येत नाहीं. फक्त प्रतिलेखनापुरता त्याचा उल्लेख केला आहे. आमच्या मालेंतील पुढील प्राचीन ग्रंथांच्या प्रतिलेखनासंबंधानें महाराष्ट्रांतील तज्ज्ञांच्या सल्ल्यानें शुद्ध प्रतिलेखनाचे नियम ठरविण्याची लवकरच खटपट करू.

## २४ परिशिष्ट अ, स्थानपोथी

ज्या ज्या स्थळाशीं श्रीगोविंदप्रभु, श्रीचक्रधरस्वामी इत्यादि अवतारी पुरुषांचा

संबंध घडला तीं तीं स्थानें पवित्र व वंदनीय म्हणून महानुभावीयांनीं पूजनीय मानिली आहेत. अशा सर्व स्थानांवर कुमराम्नाय कोठी उर्फ मुनि व्यास कुमर यांनीं शके १२७५ च्या सुमारास ओटे बांधविले होते. त्या सर्व स्थानांची आठवण कायम राहावी व कालमाहात्म्यानें ते ओटे नष्ट झाले तरी त्याची जागा कायम करतां यावी म्हणून स्थळवर्णनात्मक एक यादीहि त्यांनीं तयार केली होती. त्या यादीस स्थानपोथी असें म्हणतात. शके १५२१ मध्ये लिहिलेली अशी एक स्थान-पोथी आम्हांस प. श्रीदत्तराजमहंत यांच्या चांदूर येथील संग्रहांत मिळाली त्या-वरून या ग्रंथांत परिशिष्ट अ मध्यें केवळ ऋद्धिपूरमधील सबंधस्थानांचे वर्णन उध्दृत केले आहे. तें तत्कालीन गद्यांत आहे. कुमाराम्नाय कोठी यांनीं स्थानपोथी लिहिली तेव्हां श्रीगोविंदप्रभु आणि श्रीचक्रधरस्वामी यांना प्रत्यक्ष पाहिलेले लोक जिवंत असण्याचा संभव आहे व संबध स्थाने तत्कालीन जनतेच्या स्मृतिपथांत असल्याचा बराच संभव असल्यामुळें स्थानपोथींतील वर्णनें यथातथ्य आलेलीं आहेत याचा प्रत्यय ऋद्धिपूर येथील केशवविहीर जीस हल्ली सासूसुनेची विहीर म्हणतात व जी नुकतीच ५।६ वर्षांत उकरून काढण्यांत आली आहे तिच्या या पोथींतील बिनचुक वर्णनावरून दिसून येईल. परिशिष्ट अ मध्ये ऋद्धिपुर येथील संबंधस्थानांच्या वर्णनावरून तत्काळीं तें शहर केवढें विस्तृत होतें आणि त्यांत देवळे वगैरे कितीतरी होतीं याची कल्पना येईल. या स्थानपोथीवरून सरासरी तीनशे वर्षांपूर्वी काढलेला राजमठाचा एक नकाशा श्रीगोपीराजमहंत यांच्या संग्रहांत मिळाला तो या पुस्तकासोबत जोडला आहे. यांत राजमठांतील सबध-स्थाने दिलीं असून तो नकाशा राजमठाच्या जागीं मशीद झाली त्यापूर्वी काढलेला आहे. हा या नकाशाचा विशेष आहे.

## २९ परिशिष्ट ब, ऋद्धिपुरलीळा.

परिशिष्ट ब मध्यें श्रीगुंडम उर्फ गोविंदप्रभूचे चरित्रांतील महत्वाच्या ३।४ लीला दिल्या आहेत. संपूर्ण ग्रंथ श्रीऋद्धिपुरचरित्र म्हणून प्रसिद्ध आहे. हें चरित्र लीला-चरित्राइतकें विश्वसनीय व पवित्र मानिलें जातें. तें गद्यांत असून भाषा तत्कालीन आहे. आम्हांस तें चरित्र कोणी लिहिलें याचा शोध लागला नाहीं; पण भाषेवरून तत्कालीन म्हणावयास हरकत नाहीं. आम्हांस मिळालेली पोथी श्री दत्तराजमहंत यांच्या संग्रहांतील असून ती शके १५१४ मध्ये लिहिली असल्याचा उल्लेख आहे

संबध चरित्र प्रसिद्ध करावयाच्या योग्यतेचें आहे; परंतु स्थलाभावामुळें फक्त ३-४ लीळांच्या अवतरणांवरच समाधान मानावें लागत आहे.

शेवटीं तिन्ही मठाच्या महाद्वारामध्यें श्रीगोविंदप्रभूची जी मूर्ति बसविली आहे त्या मूर्तीचा महाद्वारासह फोटो दर्शनीय म्हणून या पुस्तकास जोडला आहे. तो फोटो श्री. मोतीराम पेंटर यांनीं काढलेल्या व प. श्रीगोपीराज महंत यांनीं पाठविलेल्या फोटोवरूनच घेतला असल्यामुळे उभयतांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें अवश्य आहे.

अगदीं आवश्यक अशा कठीण शब्दांचा कोश शेवटी जोडणे अवश्य वाटल्यावरून दिला आहे.

## २६ विज्ञप्ति

शेवटी ज्या श्रीगोविंदप्रभु आणि श्रीचक्रधरप्रभु यांनीं आपल्या लीळास्थानात्मक ग्रंथाच्या प्रकाशनाचे अल्प स्वल्प कार्य आमच्याकडून करवून घेतलें त्याच्या पुण्यस्मरणास वंदन करून ही अल्पस्वल्प सेवा प्रभूच्या हजारों अनुयायास आणि महाराष्ट्रभाषेच्या अभिमानी रसिकांस आम्ही सादर करीत आहों. प्रभूंच्या संबधस्थलांच्या वर्णनानें आरंभिलेली ही प्राचीन मराठी वाङ्मय-ग्रंथमाला शारदाश्रमांत निष्काम कर्म करणाऱ्या शारदाभक्तांकरवीं पूर्ण केली जावो अशी आशारूप प्रभूची प्रार्थना करून हा लांबलेला प्रस्तावनालेख संपवितों. इति शम्.

---

प्राचीन मराठी वाङ्मय (खंड १ ला)

## पंडित नारायणव्यास बाहाळिये कृत

# श्री ऋद्धिपुर वर्णन

( ओवीबद्ध )



प्रकरण १ परा वाचा महत्त्व ओव्या ३

॥ श्री परेशायनमः ॥

**जे आर्त वच्छा नंदनी : तापोपशम कादिंबिनी :**
**ते नमस्करूं अमृत संजीवनी : श्रीदेववाणी : ॥१॥**
**जे वेदाचा उगऊ : पूर्णबोधाचा जीऊ :**
**ब्रह्मविद्ये प्रसऊ : जे परा वाचा : ॥२॥**
**विवेकाची जन्मभूमि : परसुखाची उर्मि :**
**असो हे केवळीं परब्रह्मीं : प्रकटली जे : ॥३॥**

---

अथ-

### श्रीऋद्धिपुरवर्णन ग्रंथाचा टीप, संक्षिप्त, प्रारम्भः

जे = देव–वाणि = परावाचा । आर्त्त = उत्कठीत । वच्छानदिनी = वच्छ तल्लक्षणे जे भक्त तया भक्तांते आनदवीति । तापोपशम = संसृती आवागमन दुःखे तातलेयां उपशमन करीति, शांतकरीति । कादिबिनी = मेघमाळा = परावाचा । अमृतसंजीवनी = अमृतस्रावक चद्राची सत्रावी कळा, वल्ली, मत्र, वाचा । तियेतें नमस्करूं ॥१॥

उगऊ = उगवतस्थान, निगात्रा, उगवला = यथा सूर्योदय = सूर्य उगवला जीऊ = जीवनरूप । प्रसऊ = प्रसवतेद्वार ॥२॥

विवेकाची = मारामार विचाराची । पर–सुखाची = पर = परमेश्वर तयाचेया

---

**श्रीऋद्धिपुरवणन या काव्याच्या दोन प्रति मिळाल्या त्यांमध्यें जे विशेष महत्त्वाचे पाठभेद आढळून आले ते खालीं अंकानें दर्शविले आहेत.**

१ वत्सनदनी

प्र. २ कृपा महत्त्व ओव्या ४

**जो अपारू सुस्वादु : निस्तरंगु आगाधु :**
**तिये आखरीं[1] आनंदु : अवलंबिला जिया : ॥४॥**
**घेउनि अज्ञानें उसंगिए : आर्तीं लाह्लाति जियें :**
**तया ऽऽरसें देतुसे पेहें : माउली ते : ॥५॥**
**पडिलेआ भवतमीं निबिडें : जिया प्रति-भवीं उजियेडे :**
**तैसें[2] वाङ्मार्तंडें : नुजडेचि मी : ॥६॥**
**ऐसा जात्यंधु अधस्तु : वरि भवरोगी ग्रस्तु :**
**तया मज तो वाङ्महा पथु : केवि टाके : ॥७॥**

---

स्वानंदरमण स्थान प्राप्तीची । उर्मि = उत्कंठा, सुखाचे अधिकत्व । केवळी = माया युक्त । पर-ब्रह्मी = परमेश्वरावतारी । प्रकटेली = कार्यास आली ॥३॥

**एव परावाचा महत्तत्व ओव्या ३ प्रकरण १.**

अ-पारु = पैल पारु । नेणवे = न जाणवे, थोर । सु-स्वादु = सुष्टुत्वे माधूर्य । निस्तरगु = गुणत्रयांचे तरग गेले आहेति का जया पासाव, तरंगरहीत । आनद= अव्यक्तत्वे सुखानद जो तो व्यक्तमंतावतारीही । अवलबिला = अंगीकरिला ॥४॥

अ-ज्ञाने = ज्ञानरहितें जीवे । उसगिये = उपगाळिये । लाह्लात = तळमळीत, लाहाकत । ऽऽरसे = श्नेहोत्कर्षे । पेहें = दुग्ध = साधनसाध्यपोषक । माउली = माता तल्लक्षणें कृपा ॥५॥

भव = संसार । तम = अज्ञान तल्लक्षणे अंधःकार, स्थानानिर्देश, काळिमा । निबिड = दाट । प्रति-भवी = प्रतिसृष्टी । वाङ्मार्त्तण्ड = वाक् = वाचा तल्लक्षणें मार्त्तंड=सूर्य. एव ईश्वरोक्त श्रुतिज्ञान । नुजडेची = न उगवेची. एवं ज्ञान कार्य जीवीं यथेव आचरणीय न वरते ॥६॥

जात्यंधु = गर्भांधु, अज्ञान । अधस्तु = अधोमुखी । भव-रोगी--ग्रस्तु = ससृति आवागमन रोगे पीडीत । वाग्महापथु = ईश्वरोपदेशीत परज्ञान रूपी थोर पथां = मार्गां । केंवि = काइसनि । टाके = लाहे, प्राप्त होये ॥७॥

**एवं कृपा महत्तत्व ओव्या ४ प्रकरण २**

---

१ आकरी आकरी  २ तेणे ही

प्र. ३ परा वाचा महत्त्व ओव्या ४

**तऱ्ही तें परवाक् चांदिणें : करूं द्विजराज कुळीं पारणें :**
**अंतरीं न वेधिजे पाषाणें : जरि होए तापा हानि : ॥८॥**
**दैवयोगें ब्रह्मवाणि : जरि न लाहाइजेचि श्रवणीं :**
**तरि जीवां होए सिरियाणी : परजाणिवेची : ॥९॥**
**जे आपण अगस्ती होऊनि : आगाधा जाणिवां तें उमानी :**
**पुन हे प्रकटली श्रीचक्रपाणी : तो कळसोद्भऊ : ॥१०॥**
**सकळां ज्ञानाचां सेवटीं : करूनि आगमा ठी :**
**निर्गमा बैसवी पाटीं : परज्ञानाचा : ॥११॥**

---

परवाक् चांदिणं=पर=परमेश्वर तयोपदिष्टीत जे वाक्=ज्ञान तल्लक्षण चांदिगें=प्रकाश, जेवि चकोरा पौर्णिमेचाचद्रावलोकनी संतृप्ती होय तेवि साधकां ज्ञानविमर्षणें सतृप्तता ये । द्विजराज=चकोरपक्षी, तथा गृहस्थाश्रमा त्यजोनि ईश्वरोक्त निवृत्तमार्गा अनुसरला तो द्विजन्मा यतिराज तयांचा । कुळीं=संन्यास दीक्षाश्रीत. एव अच्युत गोत्रियु कुळीचे साधनवत तयांसी श्रीकृष्ण श्रीचक्रधरादि परमेश्वरावतारे स्वयं ज्ञानोपदेश निरोपण करूनी भवससारापासून मुक्त केले । उत्तरार्द्ध ओवी मध्ये स्तावक=नारायण कवि हा–स्वत: आपणास पाषाण उपमेनि न्यूनता दर्शवीत आहे ॥८॥

दैव–योगें=मूळाधिकाराचेनि योगें=कर्मविपाकाचेनि योगें । ब्रह्म–वाणि=व्यक्रमंत परमेश्वरावतारोपदर्शीत ज्ञान वाचे करूनि । सिरियाणि=दुर्मिळत्ता । पर-जाणिवेची=परमेश्वरोक्त विधी निषेध नित्यक नैमित्यकाचार जाणिवेची ॥९॥

परावाचेसी अगस्तीचे सादृश्यत्व उपमोनि मेवटी अगस्तीतें तिरस्करिले कारण परावाणि ते ईश्वर मुखोद्भव आणि अगस्ती तो मार्तण्डवीर्य कलशोद्भव म्हणून तो न्यून । उमानी=रूप करीं ॥१०॥

आगम=वेदमंत्र गद्य विभाग । निगम=वेदमत्र पद्यविभाग । ठी=मर्यादा । पाटी=पट्टी प्रतिष्ठा ॥११॥

**एवं परावाचा महत्त्व ओव्या ४, प्र. ३**

---

१ मग

(प्र. ३ अ श्री नागांबिकामहत्त्व ओव्या ३)

**तीए वाचा सुधाकरी : नियमस्त तत्परी :**
**प्रेमामृत जीवचकोरी : लाधलें तिया : ॥१२॥**
**ते प्रसिद्ध नागांबिका : प्रसन्न होए आइका**
**तरी सिद्ध सारस्वत मूर्खा : प्रकटों लागे : ॥१३॥**
**सृष्टी परौता जिआ : सौरसु होए बोलावेआ :**
**ते नमस्करूं ब्रह्मतनया : श्रीनागांबिका : ॥१४॥**

प्र. ४ श्री नागदेवाचार्य महत्त्व ओव्या १०

**परवाक् रससिद्धि : जो जीव डोंगरातें वेधी :**
**तो आतां सुवर्णकृतबुद्धि : नमीन श्रीनागार्जनू : ॥१५॥**
**जो सोधुनि भवपारदु : अनादिरससिद्ध**

---

सुधाकरी=चंद्राची सत्रावी कळा ती अमृताची खाणि । नियमस्त=नियमाचा ठाई अस्त एवं नियमें निमज्जन जाली । प्रेमामृत-चकोरी=ईश्वरी अक्षयीं प्रेम तल्लक्षणें जे जीव तेच चकोरी आर्त्तिवंत ॥१२॥

प्रसिद्ध=प्रकट । नागांबिका=नागश्रेष्ट अंबिका = माता । सिद्ध=प्राप्त । सारस्वत=प्राज्ञास्फुर्ती, ब्राह्म मुहूर्त । मूर्खा = मतिहीनां । प्रकटोलागे=उमटो लागे असायासे येई ॥ १३ ॥

सृष्टी-परौता=जीव देवता प्रपंच यया तीनि परौता परमेश्वरू । बोलावेआ=परमेश्वरोक्त श्रुतिशास्त्र निर्वचावेआ । सौरसु=सहवास । इये ओविये नागांबिका स्तुती, आणि स्तावक नम्रता. ॥ १४ ॥

पर-वाक्-रस-सिद्धि=पर=परमेश्वरावतार तयाचे वाक्=ज्ञाननिरूपण तेणें ज्ञानयुक्त आचरणें जो साधन संपूर्णत्व रूपी रस तेणे रसें सेवटी क्रमशः सिद्धि=साध्य प्राप्तिलाभे । जो जीव डोंगरातें वेधी जो=नागार्जुनाचार्य. जीव=मानुष्या देहींयुक्त. तयांचेआ अनंतजन्मार्जीत सुखदुःख भोग्यरूपी संचीतें पर्वतराशीवत्. ऐसियांही जीवांतें. वेधी=परमेश्वरोक्त ज्ञानाचरणा योजी । ऐसा जो नागदेवाचार्य-तो नमितु=नमस्करितु ॥ १५ ॥

शोधोनि-भव-पारदु=अखिल भूमंडळ धुंडाळोनि या संसारीक जीवां भव

तो लाधला शब्द वेधु : जेणें धातुर्वादियें : ॥१६॥
जो विघ्नजातां वर्या : उपाॐ भव वैरियां :
जाला दीक्षागुरु आचार्या · सृष्टिचेया : ॥१७॥
अपक्षा पाखवा देउनि : जे जीव[1] जीववी पक्षिणि :
तेवि श्रीचक्रपाणीं पाळिला जो · ॥१८॥
कीं तो आणि कीं तें न साहे : जेणें मोकलीली धाए :
भणौनि ॐरसें त माए : पाठी धांवे : ॥१९॥
कीं लेउनि माया वेषाचें लेणें : तो बापुचि मी जाणें :
दोन्हीं स्नेहें एकवटपणें ॐळला जिया : ॥२०॥
आसुरें सृष्टिचेया : पराभव दाउनि आचार्या :
मग जगजीवनें लोकिया : जेणें सुकाळु केला : ॥२१॥

---

रोगांपासौनि निस्तारावया ज्ञानरूपी पारा तो। रस–सिद्धु = तांम्रादिका धातुते भांगार करितां एसना रस सिद्ध जाला। शब्दवेधु = हा दृष्टांत* दार्ष्टांतीक भागान्वयें ज्ञातेजनीं जाणावा । धातुर्वादियें = धातुक्रिया जाणते ॥१६॥

विघ्नजातां वर्या = साधकपुरुषां विघ्नसपादका जिया देवता तयासी ही श्रेष्ट असा। संसारभ्रमिस्त अरिजना तारकउपायी मंत्रिया असा ॥ १७ ॥

अपक्षा पांखवा देॐनि = ज्या प्रमाणे अंडज शिशु पक्षरहितां ती पक्षिणी आपुलेआं पांखवांचा उबारा देॐनि पिल्याते सपक्षा करी त्या प्रमाणे श्रीचक्रधररायें धांडाळेनि युक्त नागदेवां आपुलें सन्निधाने ज्ञाननिरोपणे योग्य करूनि मार्गहेतु आचार्य केला ॥१८॥

ॐरसें = स्नेह पूर्णत्वे ॥ १९ ॥

मायावेष = मायीक देह । ॐळला = वरुषला ॥ २० ॥

आसुरें = कर्म मार्गीक मंत्रशास्त्रवेत्तें = जारण मारणादि प्रयोग कारकें । पराभव = पारकयाचे खण्डण ॥ २१ ॥

---

१ जेवी २ तया

---

***आलापतः कनकतां नयतेऽष्टलोहं सच्छब्दवेधिसुरसः शतयोजनेऽपि ॥२॥ दृष्टांतस्तोत्र.**

जरि हा श्रवणाचा मीतु : होए जीवाचा हीतु :
न भंगितां अर्थु : जय-वादी : ॥२२॥
आत्मारामाचेनि विरहें : जेयां जीवीतु न साहे :
निर्वाणीं जो लाहे कैवल्यातें : ॥२३॥
बापु कळा वानु कैसी : जो भास्करातें प्रकाशी
जाणिवां पंडितांसि : अधिकरणु होए : ॥२४॥

प्र. ५ परमार्ग महिमा ओव्या ५

आतां अहिंसे[1] नि संगु : नि-वृति भक्ति-योगु :
तो नमस्करूं परमार्गु : दातारांचा : ॥२५॥
वेदांतपरु मुख्या : षट्‌ प्रमाणाची संख्या :
त्यजौनि जिये मार्गीं केली भिक्षा क्रांतदर्शीं : ॥२६॥
तो हा कैवल्य-पदाची निसाणी : सकल सीधांतां तरणी
वेधबोधा मुगुट-मणि सृष्टिचेआ : ॥२७॥
भवाटवीचा सगरा : जीवा करितां येरझारा :

मीतु = मर्यादित जाणलेला अर्थ ॥ जयवादी = विजयशील ॥ २२ ॥

आत्माराम = आत्मनि रमणारा । निर्वाणि = शेवटी ॥२३॥

बापु = धन्यतादर्शक, आश्चर्यद्योतक । कळा=किरण । जो–नागदेवाचार्या तो –भास्करातें–कविभास्कररूपी ज्ञानसूर्याते–। प्रकाशी=आचार विचार क्रियानैष्टत्वेंउजळी । जाणिवा = जनार्द्दनोपाध्यां । पडिता = दामोदर केशवादि गोपाळपडितां । अधिकरणु होय = साधन सपूर्णत्व ज्ञाने साध्य पदप्राप्त्यर्थ निवृत्ताचार शिकविता होय ॥२४॥

**एवं श्रीनागदेवाचार्य महत्तत्व ओव्या १३ प्र० ४**

अहिंस्र = हिंसारहीत । नि सग = सगरहीत । निवृत्त = प्रवृत्त धर्म कर्म रहीत ॥२५॥

क्रान्तदर्शी = क्रमित अत यस्य सः क्रांतदर्शी, त्रिकालज्ञ. ॥२६॥

निसाणी = सीढी, सोपानमार्ग । वेध = आवडी । बोध = जीवेश्वर सेव्य सेवक निश्चय । तरणी = सूर्य, तरुणस्त्री. ॥२७॥

भवाटवी = ससार तल्लक्षण अरण्य । सगर = सावजाचा मार्ग, पायवाट = पाउल-

१ अहिंसु २ पुन

**जरि[1] नेणों कोणें सापें धुरा : राचिला हा : ॥२८॥**
**पथ एकलेआ चालतां : भय नाहीं सर्वथा :**
**आज्ञा कृतांता : वास पाहों नए : ॥२९॥**

प्र. ६ ग्रथकर्ता स्वात्मनिरोपण ओव्या १४

**ऐसिए मार्गी निरुपमी : केवि गति लाहिजे अक्षमी :**
**बरि दाटले भवश्रमी : जीव पंगु हे : ॥३०॥**
**प्रस्तुत नारायणें बाहाळियें : जन्म देउनि राउवाळिए :**
**तो केवि मार्गी इयें : क्षेमी होए : ॥३१॥**
**नाहीं आर्ति निर्वेदु . न संडी विषय संदु[2] :**
**जीवेंसी भवबंधु : धरुनि असे : ॥३२॥**

---

वाट । येरझारा = तिया जन्म मरणाचिया, येणें जाणे, चतुर्विध भूतग्रामी भ्रमणा· चिया सापे = आतां निश्चयें. ॥ २८ ॥

कृतांता = संहारका, माया ॥२९॥

**परमार्ग महिमा ओंव्या ५ प्र० ५**

निरूपम = उपमारहीत । अ-क्षमी = क्षमेस अयोग्य, असमर्थ । भव–श्रमी = संसार कर्मे श्रांत ॥३०॥

प्रस्तुत = सांप्रत्य । नारायण–हा ग्रंथकार–कवि स्तावक स्वात्मवृत्त बीज रूपानें येथून सांगतो । बाहाळी = खानदेश प्रांतस्थ त्या काळचे एका रजपूत राजाचें नगर. नारायणपंडित हे त्या राज्याचे पिढीजात आश्रीत । हे अथर्ववेद विद्ये अति-निपुणत्वें जारण मारणा दम्बधे भावीं अभाव अभावीं भाव जोतीष्यगणीतें सिद्ध असत . । राउवाळिये = तेजस्वी कांति युक्त, राजकारणी दक्ष अशा कुळीचें ब्राह्मण्य कर्मी नियमस्थ असत । असे असतां = प्रवृत्तमार्गी बद्ध असतां तो निवृत्तमार्गी–एकसरां–केवि दक्ष होय । = साधनानुष्ठाना कौसियापरी योग्य होय । येथें स्तावकें रंकवृत्ति भाविली असे ॥३१॥

न सडी = न सोडी । भव–बधु = संसार तल्लक्षणें बध ॥३२॥

---

१ पुन  २ छंदु

न भिये हिंसं वायांचें ग्रह पीसं :
जीणता परत्र आलस्यें : दुरि केलें[1] : ॥३३॥
पडिला चारि देहाचा उपखा : चुकला परमार्थ-सुखा :
वरिपडे जाले दुःखा संशृतिचिआ : ॥३४॥
विचारितां सृष्टी आंतु : तोचि एकु दैवहतु
देखत देखतां आत्म-घातु : घडला जया : ॥ ३५ ॥
नुरिजे आईकितां : नेणों कांई होए भोगितां
कीं तेवढेया निरयांचे आकांता : आगविले : ॥ ३६ ॥
तेआ भवदुःखाचा उन्हाळा : भ्रमतां कर्ममार्गी निह्माला :

---

ग्रहपीसे=गृहस्थाश्रम धर्मे भार्या पुत्र कलत्रादिकाविषयी आत्यंतीक आसक्तता होचि पीसेपण । जीणता=जिकिता,कार्मीक मंत्र शास्त्र इतरां जिकिता तेणे अभिमाने । परत्र=परमेश्वरपद प्राप्तिलाभ तेया । दुरिकेले=दुऱ्हाविले ॥३३॥

उपखा=उपवास । एवं ईश्वर ज्ञानाश्रौताचार धर्मवीण मनुष्य जन्म वायां दवडिलीं ॥३४॥

विचारितां=ज्ञानविवेके पाहतां । दैव-हतु=दैवेन हत इति दैवहतः । देखत देखतां=जाणत जाणता । आत्म-घात=जीवदेहविघातरूप. एथ नारायण पंडितीं आपुलेया पितयाचा पुरोहीत वृत्तीलागीं आणि ज्योतिष सत्य दर्शना लागीं यजुः शाखे पंडितीं जो-कौटाल्य कर्म घात केला होता तेयांचा सूड उगविलेया अनंतरे म्हणजे तेया यजु पंडिताचा सामर्थ्य प्रभावे प्राण विसर्जन केले या अनंतरे महात्म धर्मदीक्षा लाहिलेया पश्चात्ताप पूर्वक आपुलेया आसुर क्रियेचा येथे निर्देश केला आहे ॥३५॥

नुरिजे=न उरीजे । नेणो=न कळे । भोगितां=निरयदुःखानुभविता । आकांत=आसमंतात् कांतः आकांन्तः कांत=असख्य शस्त्रांचे कांतळे=कोचाळे ॥३६॥

भव-दुःख उन्हाळा=संसार कर्माजकत्वाचे दुःख तल्लक्षणे उन्हाळा तेन तप्तायमान । कर्ममार्गा=देवता यजनादि हिंसा कर्ममार्गा, तथा चतुर्विध

---

१ ठेलें २ नर

तंव देखे विषय मृगजला : भरलीआं दीसां: ॥ ३७ ॥
प्राक्तनु चंडांसाचा रश्मी : थोर तातली कर्मभूमि :
झाउवी[1] षडुउर्मि : झळंविला जो : ॥ ३८ ॥
तारुण्याचां माध्याह्नीं : न चलेचि विवेक वाहाणी :
गेलें सुकृतु पां[2] जळौनि : आतां गति कैची : ॥ ३९॥

कर्मफल मार्गा । निम्हाळा=उदक रहीत निर्जलारण्य । विषय-मृग-जला= दशांही इंद्रियाचे दशविषयरूप मृग ते झळाळ उदका पाठिधाऊॅनि अज्ञानत्वें मरों रीगे तन्न्यायें ॥३७॥

प्राक्तन=पूर्वील मानव देही आर्जिलेले । चण्डांश=प्रचण्डतसायमान सूर्य रश्मि=किरणे। तातली=तापली। कर्म्म भूमी=कर्मनिष्पत्तीरूप* भूमी, मनुष्य-देह, ‡। झाउवी=झळवेली। षडुउर्मी=राग द्वेष काम क्रोध मदमच्छरादि। झळबिला=जाळिला ॥३८॥

मध्याह्नीं=मध्य अर्ही=सूर्य अशा वेळी=दिवसा दोन प्रहरा । विवेक= शास्त्रविचार विधी निषेध जन्य । वाहनी=मार्ग, वाट सु कृत=सुष्टु कृतकर्मे, पुण्यरूपी चाली ॥३९॥

१ माउवी २ पाए

*— न खल्वत्र मनुष्याणां भूमौ कर्म विधीयते ॥
योजनानां सहस्त्रं वै द्वीपोऽय दक्षिणोत्तरम् ॥१॥
पूर्वे किराता यस्यान्ते पश्चिमे यवना स्मृताः ॥
दक्षिणो मलयो यस्य हीमवान् नुत्तरे तथा ॥२॥
तदेतद्भारत वर्षं सर्वबीजं द्विजोत्तम ॥
ब्रह्मत्वममरेशत्वं देवत्वे देवत्वमपि दुर्लभम् ॥३॥
मार्कण्डेय पुराणे.

‡— अत्रैव क्रियते कर्म कर्मभूमिरतो मता ॥
यत्रैव भुज्यते तद्धि भोगभूमिस्तु सापरा ॥१॥
बाणभट्ट कादबरी.

**तापीं सर्वांगें तातलीं : पाहे संत साउली :**
**तेही भेण रिगाली : श्रीचरणां तळीं : ॥ ४० ॥**
**अभिलाषु ग्रिष्मीचेनि दुःखें : तृष्णा भीतरूं शोखे :**
**तेवीचि चिंता लाहांके : तोंड पसरी : ॥ ४१ ॥**
**जन्म ऋणाचेनि सीणें : डोंगर केलें ठेंगणें :**
**कर्म मार्गिंचेनि भ्रमणें : ऐसे जालें जीवां : ॥ ४२ ॥**
**ऐसेंआ आपदा अनिर्वाच्या : भोगितां तेआ सोच्या**
**तंव उजरिया केले दैवाचिआ : ते परिसा पां : ॥ ४३ ॥**

प्र. ७ ऋद्धिपुर महात्म्य ओव्या १४

**जें आर्तांसि कारणें : संसार श्रमाचें विसंवणें**
**तें श्री ऋद्धिपुर देखिलें तेणें : दुरौनिया : ॥ ४४ ॥**
**मोळिकारां धांडोळितां रानें जेवि मोळिए जोडलें बावनें :**

---

**तापीं** = तीनि तापीं, आधिदैवत, आधिभौतिक आणि आध्यात्मीक। **तातली** = तप्तायमान जाली। सत साइली = सत क्रियेची विश्रांती, सत = तमहीनें ज्ञानिये तयाचेया ज्ञानामृतोपदेशाची विश्रांती। परि ते मजभेण = माझेया अपार अवगुणा भेणें। चरणांतळीं = दोनि पाहाराचे ऊन पायातळीं आले, अथवा गुरु सुहृदाचा वियोग हाचि ऊन पायातळींवत् तप्तायमान ॥ ४० ॥

अभिलाष हाचि ग्रीश्म ऋतु । तृष्णा = अतृप्तता ॥ ४१ ॥

शीणे = श्रमें । ठेगणे = सानें, लहान । कर्म-मार्ग = देवतोपदेशीत मार्ग = पथ, संतासत कर्मजन्य पथ ॥ ४२ ॥

आपदा = अपत्यकाळा, अस्वातंत्रा । अनिर्वाच्या = वाचें अशक्य, अनिर्वचनीय। शौच्य = जीव देवता शोचावया योग्य। उजरिया = उञभिया। दैवांचिया = भाग्याचिया ॥ ४३ ॥

**एवं ग्रंथकर्त्ता स्वात्मनिवेदन ओव्या १४ प्र० ६.**

आर्त्ता कारणे = आर्त्तवंतपुरुषां चतुर्विध दुःख = निर्वेदानुताप अनुशोच आर्त्ति । विसवणें = विश्रांन्तीस्थान । ऋद्धिपुर = सकलही समृद्धिचे पुर ॥ ४४ ॥

धांडोळितां = धुंडितां । बावन = चंदनकाष्ट। दुर्भिक्ष = दुष्काळ । रांक = रंकाचा।

नातरि दुर्भक्षी पक्वानें : रांकु लाहे : ॥ ४५ ॥
दारिद्रीं आडखुळे रिद्धी : अनाचार्यातें वरीति सिद्धी :
निः कंचना उपाधि : टाकौनि ए · ॥ ४६ ॥
रोगिया अमृत पानु : लाहे ताह्नैला जीवनु :
स्वामि जालेआ प्रसन्नु : जैसें सेवकां होए : ॥ ४७ ॥
सासुरवासें शीणली : तिये भेटे जेवि माउली :
असो हे तैसी परि जाली : श्री ऋद्धिपुर देखिलेआं ॥ ४८ ॥
धांडोळितां तीनि लोकां : मी उपमा न देखे आणिका :
जें जालें जगदेकनायका : क्रीडास्थानु : ॥ ४९ ॥
तें हें कैवल्य बीजाचें क्षेत्र : कीं निवृतांचें परत्र :
कीं परुसुखाचें छत्र : मांडिले आर्तांसि : ॥ ५० ॥
कीं धर्माची उत्तर वेंठ : कीं सिद्धीची ॐळगवट :
ना तो संशृतीसि ताठ : वज्रलेप : ॥ ५१ ॥

---

अतिशय तो रांक ॥ ४५ ॥

ऋद्धि = समृद्धि । अनाचारी = आचारभ्रष्ट । सिद्धी = अष्ट महासिद्धी । निःकंचना = सुवर्ण रहिता, द्रव्यरहिता, अर्थहीना. उपाधी = श्रेष्ठत्व । टाकौनि ये = गिवसौनि येई ॥ ४६ ॥

अ-मृत = मृत विनाशक उदक । पानु = प्राशना लाहे । लाहे = प्राप्त होये । तान्हैला अमृत पानु जीवन म्हणौनि लाहे ॥ ४७ ॥

माउली = माता । ॥ ४८ ॥

तीनि लोका = स्वर्ग, मृत्यु, पाताळां । जगदेकनायका = जगत् एक नायक = जगदेक नायक = श्रीगोविन्दप्रभु काण्वशाखी अवतारधारी । क्रीडा स्थानु = विहरण करावयाचें स्थळ ॥ ४९ ॥

कैवल्य-बीजाचे क्षेत्र = कैवल्य = निर्गुणस्वरूप तल्लक्षणे बीज तेया बीजाचें उत्पादक शेत । निवृत्त = प्रवृत्तधर्मरहीत । परत्र = परलाभ लाहते । सत्र = अन्न-सत्र ॥ ५० ॥

उत्तर वेंठ = उतार पेठ । ॐळगवट = सेवकवर्ग । वज्रलेप = निक्षेपीतभूमि-

किंवा समर्थांचें कवण जाणें : उठवावेआ संसाराचें ठाणें :
पाळेगण उभिले मी भणें : देवराआंचे : ॥ ५२ ॥
कीं संसार नगरी : वसिजे हीं[1] अनाचारी :
तेआ वेगळी ब्रह्मपुरी : केली ब्रह्मण्य देवें : ॥ ५३ ॥
शृतीं स्मृतीचेनि अर्थें : स्वधर्में अनुष्ठाते :
जेथें सदाचार नांदते : ब्रह्मवीद : ॥ ५४ ॥
ते देखौनि देवनगरी : साष्टांगें नमस्करी :
जाली तापासि बोहरी : ते परिएसा पां : ॥ ५५ ॥
उदय भास्कराचेनि वासें : नुरेचि दुर्गंधितम जैसें :
नातरि आर्ती जळद वरुषे : कृषीवळीं : ॥ ५६ ॥
दोनि लक्षाचेनि अंतरें : जेवि ताप फीटाति अमृतकरें :
तैसें केलें श्रीऋद्धिपुरें : दुरौनिया : ॥ ५७ ॥

---

गतद्रव्य ॥ ५१ ॥

पाळेगण = सैन्य समूह ॥५२॥

ब्रह्मण्य–देवें–ब्रह्मकर्म नियामकें ईश्वरें = श्रीगोविंदप्रभुरायें ॥ ५३ ॥

सदाचार–सत् आचार, पवित्राचार । ब्रह्म–विद = ब्रह्म वेत्तीत्ति ब्रह्मवित् एवं ब्रह्मविद्या निपुण ज्ञाता ॥ ५४ ॥

बोहरी = देशा बाहीरा घालविणे, देशवटा ॥५५॥

उदय-भास्कर = सूर्योदय. कापूर भेद, रस भेद दर्शक। नुरे = न उरे एवं उरे ना। गध = पदार्थ विशेषी, नासिकद्वारानुभव। तम = काळिमा, अधःकार। जलद = मेघ कृषीवळी = शेती करणारे ॥ ५६ ॥

दोनि लक्षाचेनि अतंर = भूमी उर्ध्व २ लक्ष योजने उच चद्र मंडळ (पौराण गणना)। तथा दो अक्षांचेनि अंतरें = दोनि अक्ष = नेत्र तयाचेंनि अतंरें = सामर्थ्याचेनि भीतरें । तो चंद्र अमृतकरे = शांतविते किरण ॥ दुरौनि = दोनि कोसाहौनि (हा चरित्रान्वयार्थ) ॥ ५७ ॥

**एवं ऋद्धिपुर माहात्म्य ओंव्या १४ प्र० ७**

---

१ हिंसी.

प्र. ८ बाह्यप्रदेशवर्णन ओव्या १२

**किंबहुना सहसा : पातला बाह्य प्रदेशा :**
**जे कां श्रीहृषीकेशा : चरणांकिता : ॥५८॥**
**हे स्वामिचे अंकिले : भणौनि दंडवतें घातलें :**
**तेवींचि सद्गदा वाचा बोले : तेआं प्रति : ॥५९॥**
**भणे जगीं हुनि जन्ममरणा : मुनी रिगाले जेआ शरणा :**
**तेआ दातारांचेआ श्रीचरणा : पात्र जालेति : ॥६०॥**
**यम नियमाचेनि साधनें : मुकुळी मुनींचीं मनें :**
**तेआं पासाव जगजीवनें : काइ अधिष्ठीलेति : ॥६१॥**
**पां पां देखौनि सरिजे : कां गोसावी करितील वीजें :**
**ना तेही आपुलें विसरीजे : तुझां लागि : ॥६२॥**
**अथवा हें असो : बाप अ्दार्याचा अतिसो :**
**असेख ऋद्धिपुर वसो : भणौनि चरणांकीतें ॥६३॥**
**कीं देखौनि प्रणीत शीरें : श्री टांकीं मनोहरें :**
**लिहुनि ऋद्धिपुरीचेणि आखरें : चरणु लिपी : ॥६४॥**

---

कि बहुना = अति बोलणे त ना । सहसा = सर्वप्रकारे । हृषीकेश = इंद्रिय नियामक जो श्रीप्रभु । अकीत = चिह्नीत ॥५८॥

सद्गदितवाचा = बाष्पसयुतवाणि, कंठाचेनि दाटलेपणे भाषण ॥५९॥

मुनी = मननशील, मौन्यशील। श्रीचरणां पात्र-जाले = श्रीप्रभुचेयाचरणसबंधा-अर्हजाले, पवित्र जाले ॥ ६० ॥

यम = अंतर्निग्रह । नियम = बाह्यनिग्रह । मुकुली = आकळीलि, मृदु. अधि-ष्ठिलेति = प्रतिष्ठिलेति ॥६१॥

पां पां = पहा पहा । सरजे = रजेसह वर्तमान अर्जिलीदुःखे, आवडीसह वर्तमान ॥६२॥

असो = बोलणे राहो । अशेष = पूर्ण ॥ ६३ ॥

प्रणीत-शिरे = नम्रीभूत शिर । श्रीटांकी = श्रीटंकासहवर्तमान श्रीचरण ॥६४॥

---

कीं जाति वेव्हारा परांता : जया परिकर्म संकळितां :
तो धडा असे घालितां : जीवोद्धरणा . ॥६५॥
कीं सिद्ध ब्रह्मविद्येचा : जो आचार्या काळाक्षरांचा .
तो देतुसे परा वाचा आतांसि : ॥६६॥
वर्णावेआ स्वामिचे गुण मज नाहीं शास्त्रश्रवण :
अंतर श्रधाहीन वरि बुद्धि टांचीं ॥६७॥
तऱ्ही उन्मेखाचिये पेंठे : गुणा अवंकणी भरीन बुद्धीचि साटें :
सुळ जन्ममरण कुंठ : ते धरीन मी ॥६८॥
तेणे स्वामिये वीण : जळो हें माणुसपण :
कांई गेलेआ प्राण देह अमंगळ नव्हे ॥६९॥
चंद्र सूर्येवीण जैसीं : तमे दाटति आकाशीं :
ईश्वरेवीण तैशी : जीव स्वरूपें : ॥७०॥

प्र ९ बाह्य प्रदेश वृक्षादि महिमा ओव्या १३

ऐसी आठवीत देवाची थोरी तवीचि [1]जीव-रास विचारी
तंव देखे आखरीं : रुखराए सासीनले : ॥७१॥

---

जाति व्यवहारा = नीतिमंत व्यवहार करणारा । परांता = पर । अथवा—जाति व्यवहारा परांता = जीव देवता साधन साध्य सजातीय व्यवहार तेया होनि थोर जो परमेश्वर । सकळित = आकलित ॥६५॥

काळाक्षराचा = काळ ग्यावया येता त्या पासौनि सोडविता ॥६६॥

श्रद्धाहीन = आवडीहीन । टाचीं = तोकडी ॥६७॥

उन्मेष = उल्लेख, । अवकणी = धान्य बुद्धि । सुळ = कुंठ ( खानदेशीचे माहित्य ) ॥६८॥

मानुषपण = मनुष्यत्वाचे गुणधर्म । अ-मंगल = मगलरूप नव्हे ॥६९॥७०॥

एवं बाह्यप्रदेशवर्णन ओव्या १३ प्र० ८.

आखरीं = त्या प्रदेशी परि ग्रामा निकटवर्तील शेत । रुख-राय=थोरवृक्ष, अश्वत्थ सासीनले = पत्रा फळा पुष्पा पडिसाराते पावले ॥७१॥

---

[1] जीव दोष

संवरितु नगराची बरव तैसे चातुर्दक्ष आरव :
वरि सुहावे कलरव : पक्षियांचे ॥७२॥
भवपाप छेदु : जो ब्रह्मादिकां वंद्यु :
तो पातला संबंधु : देवरायाचा : ॥७३॥
आमुते संबंधु मोहळे : पृथ्वी फुंजे वाएकोळे :
भणौनि पाताळा गेली मुळे : मज पातां ॥७४॥
परोपकृती लागौनि तेआं : विनयो आति जेआं :
निववीती फळ पत्र छाया : श्रांतांते : ॥७५॥
निऱ्हाकर्ण रसायणे : वरि होति विहंगमाचीं कुंजनें :
तळवटी भिक्षुकांचीं वीजनें तेणे डोळे धाती ॥७६॥
ते निःकंच निरोपाधी : करूनि विशुद्धा बुधी :
मग बैसले समाधी : तापसु ते : ॥७७॥
की सत्वाचेनि उन्ले : स्मरण पीकासि आले :
ते ध्यान दीसे लागले : चरण एक वंकी : ॥७८॥

---

संवरीतु = आटोपितु । बरवृ = शोभा । चातुर्दक्ष = चहू बाजू, च्यान्हीदिशांचा ठाईं । आरव = वृक्ष । सुहावे = बरवे । कलरव = कलायुक्तशब्द ॥७२॥ ॥ ७३॥

फुंजे = फुरकटे । वायकोळे = वृथाचि ॥ ७४॥

परोपकृती = परोपकाराचे करण । विनयो = नम्रता, । श्रांन्ताते = कममार्गी श्रमलेयांते ॥७५॥

निऱ्हा = आत्यनीक । रस = नवरस, षड्रस । अयन = स्थान । विहगम = पक्षी = विहगच्छतीति विहगम । कुंजन = टाहो फोडणे । धाती = सतोषती, नावेति ॥७६॥

निरोपाधी = बाह्य उपाधि रहीत । वि-शुद्धा = विशेषण शुद्धा । समाधि = ध्यानस्थ, सम्यक् प्रकार साधि-समाधि । तापस = तपस्याप्रधानयतीवर्य ॥ ७७॥

सत्त्व तल्लक्षणे उन्ल । स्मरण तल्लक्षणे पीक । वाकीच ध्यान तल्लक्षणे एक-वंकी । उपमा उपमेय दृष्टांते दार्ष्टांतीक बुझावणे वाच्यार्थे शेतीचे पीक व्यंगार्थे साधन संपूर्णत्वे साम्य पूरकार्थ ॥ ७८ ॥

करुनि काम क्रोधाची डाही : नवल पीक आवडीचां वाहीं :
ब्रह्म सुकाळु लाधला ते ही : जे रानीं रिगालें : ॥७९॥
ईश्वर विरहें तातलें आनंद पय उतलें :
तैसे डोळे दीसति झळंबेले . अश्रुपानीं : ॥८०॥
ऐसे परमार्थु संचकु : जे नव्हेति आत्मवंचकु :
ते देखिले भिक्षुकु : वृक्षां तळीं ॥८१॥
हे देवांचे संतु : भणौनि केलें दंडवतु
तेवींचि रचना विशेष पांतु : साउमा चाले : ॥८२॥
तेथें उंचपणें कळसी : स्पर्शी[1] कीजेत आकाशी
देखे चातुर्दक्ष तैसीं सुरालयें . ॥८३॥

प्र. १० देउळे वर्णन ओव्या ७.

साखाळाचिया[2] उंचिया पांता दृष्टी टांचिया
जालिया बुद्धि सौचिया : ते रचना पातां .[3] ॥८४॥
कीं प्रासादांचेनि मीषें : आकाशा मांच बांधले जैसें

---

कामक्रोधादिकांशी डाहिये जिंकोनी । नवल = अपूर्व । वाही = प्रवाही, सर्व । ब्रम्ह–सुकाळ = ब्रम्ह जो परमेश्वर तो लाधलेया दृष्टादृष्टीं सुष्टु काळ होय रानी रिगाले = आरण्ये सेविले ॥ ७९ ॥

तातले = तप्तायमान जाले । पय = दुग्ध । ऊतले = उचबाळिले, झळंबेले, भरिले ॥ ८० ॥

परमार्थ = पर जो परमेश्वर तेयांचे सानिध्यास साधनार्थ, थोर अर्थ । सचक = संचीत कर्ते । आत्मवचक = स्वात्मकार्यविनाशीक ॥ ८१ ॥

सते = रजस्तमरहिते । रचना = उभारणी । साउमा = पुढारा ॥ ८२ ॥

ऊचपणे = दीर्घपणे । स्पर्धा = मात्सर्य्य । सुरालय = देवतांचे देवालय ॥८३ ॥

बाह्य प्रदेश वृक्षादि महिमा ओव्या १३ प्र० ९

सांखाळा = पाळिया, पढतिया शाळा । टांचिया = ठेंगाणिया । शौचिया = सानिया ॥ ८४ ॥

---

१ स्पर्धा २ सळाखाचिया ३ पाहतां

दृष्टी ॲळघताति सायासें : जरि अंत लाहातिना : ॥८५॥
कीं प्रासाद मेरू वरि कळस पूर्ण चंद्रु
तैं शारदि देवेंद्रु : क्रीडा करी ॥८६॥
कीं देवता वरि · प्रासाद छत्र धरी :
ॲळगताती ऋद्धिपुरीं · देवरायाते : ॥८७॥
ना ते प्रासादा जैसी : खातीं इंद्रियें आंगेंसीं
भणौनि विषयसुख नासी गमलें मज : ॥८८॥
ऐसीं नगर मंडीतें देउळें देखे गोक्षीर धाम धवळारें[1] :
ना तिए जालीं उजळें : दृष्टीवेनि[2] ॥८९॥
जीयें समीगें भोगस्थानें : रचमचीत जनें[3] ·
भणौनि निस्पृहीं केलीं वीजनें · मनन शीळीं · ॥९०॥

प्र. ११ सरोवर वर्णन ओव्या ११

तया देव-यतनां जवळिके : सरोवरें देखे सुलक्षणिकें :

---

प्रासाद=देऊळ । मिसे=निमित्ते । माच=सोपान, सेतु । ॲळघतां = पाहतां ॥८५॥

प्रासाद तल्लक्षणे मेरू । कळस तल्लक्षणे चंद्र । शारदी = शरदृतु पौर्णिमासीची रात्री ॥ ८६ ॥

देवता = दैवतप्रतिमा, लेप ॥ ८७ ॥

प्रासादा–खाती = देउळा वरीला आंत बाहीरी लहान देउळिया तल्लक्षणें देहरूपी प्रासादा खाती = इद्रियरूपां देउळिया । म्हणौनि योगेश्वरु विषयसुख मासी = मासिलें, । नासी = देउळाचा माथा। गमले = भाषले ॥ ८८ ॥

मडिते = शोभिते । गोक्षीर धाम–धवळारें = गौ दुग्धवत् शुभ्रवर्णाचीं गृहें । दृष्टीवेंनि = दृष्टीं अवलोकणेंनी ॥ ८९ ॥

भोगस्छाने = भोगातें = नवसातें पुरविते स्थानें एव देवतालय । निष्पृही = स्पृहारहित ते पुरुष ॥ ९० ॥

**एव देउळे वर्णन ओव्या ७, प्र० १०**

देव–यतन = देवतालय । सुलक्षणिके=लक्षणयुक्त । टाहुआ = आलाप ।

---

१ धवलें २ दृष्टीपें देवाचेनि ३ जाणे

तेथ टाहुवा करीति चक्रवाके : विरह कातरें . ॥९१॥
निर्दोष नि:पाप निर्मळें : वोसंडत परिपूर्ण जळें :
सर्वांगें जालीं वाचाळें : कळरवीं पक्षियांचेनी : ॥९२॥
ठाइं ठाइं बरवट : निवृत मंडीत घाट :
जैसे प्रवृत्ति पांथावरि तांबट : तपोनिधि . ॥९३॥
आपुलेनि प्रसन्नपणें : दृष्टीसि मांडीति धरणें :
अमृता आणीति उणें : गोडिया आंगीचिया . ॥९४॥
जेआंचेनि चरणे पुनैतु : जगीं वाणिजेति तीर्थू :
तो देवराउ जेथू : क्रीडा करी : ॥९५॥
मंदें मळयानिळें : झगटलें पाणी हालें
तें मज पां सुखें डोले : परम पुरुषाचेंनि : ॥९६॥
सकळ शास्त्रां विचारू : करितां नोहेचि निर्धारू :
तो तियें आपेंपरू लाहातीं जालीं : ॥९७॥
असो हे पोखरणी बावी : जेआ श्रीचरण-कमळें बरवीं .

---

विरह--कातरें = विरहव्याकुळे ॥ ९१ ॥

निर्दोष = क्षारादिदोषरहित । निःपाप = शेवाळादि पापरहित । **निर्मळ** = गंधादि मलरहीत एव स्वच्छोदक । वोसडित = उचबळत । सर्वांगें जालीं वाचाळें = उदकी पडिसाद उमटेति । कलरवीं = पाक्षियांचेनि शब्दीं ॥९२॥

बरवट = उत्तमत्व । प्रवृत्ति-पांथ = प्रवृत्तमार्ग, वैदीकाचारपथ. । तांबट = भगवे वस्त्रान्वित, तथा पाटीं लाल पाषाण ॥९३॥

प्रसन्न-पण = प्रशस्त-पण, संतोषीतपण ॥९४॥

पुनैत = पवित्र । क्रीडा = विहार ॥९५॥

मंद-मळयानीळु = मलयगिरीचा स्थीर वायु । झगटिले = स्पर्शिले । परम-पुरुष = थोर पुरुषार्थिला जो श्रीगोविंद प्रभु ॥९६॥

निर्धोर = निष्टा ॥९७॥

पोखरणी = पुष्करणी, पाषाण बद्ध लहान तळवी । बावी = बारव, पाषाणें

देऊनि गोसावी : बीजे करीति ॥९८॥
कव्हणीं सुक्षेत्र नाहीं ऐसें : जेथ फीटे भव[1]-पाशें :
गुणिये आधिष्ठीले हृषीकेशें : ते वांचौनिया ॥९९॥
ऐसीं पवित्रें परिकरें : जियें क्रीडा-स्थानें केलीं दातारें :
तें तीर्थें पांतां न स्मरे : आपण पें : ॥१००॥
नाना तापीं तपलें हृदय असे जळत :
तें होए शांत जें देखिलेआ ॥१॥

प्र. १२ नगरप्रवेशवर्णन ओंव्या १९

तेणें आनंदु सौरसें : नगरामाजि प्रवेशे :
तंव देखे देवरायें परेशें · पुनीतजन : ॥२॥
मरणा भेणें कव्हणी : टाकी अमृताची तवनि ·
ना तरि तमा भिआला तरणी : समीप वसें : ॥३॥
थोरां तापांचिया शंकां · जेवि झांबौनि राहिजे मयंका :
ना तरि पाठि पुरविजेति पारिकां घरीं रीगिजे समर्थाचें ॥४॥
पापा भेणें जैसी · लोकीं टाकिजे काशी :
कीं लोटले या विवसी · देखे निधानु जेवि : ॥५॥

बांधीव पायऱ्यासह जलाशय ॥९८॥

सु-क्षेत्र = सुष्टत्वे देवतानिर्मीत पुनेत स्थल । गुणिये = मांत्रीक ॥९९॥

पवित्रें = शुद्धें । परिकरें = सुंदरें ( प्राकारें )॥ दातारें = दानशीलें ॥१००॥

नाना ताप = अतिशयें बहुता परिचे क्लेश ॥१०१॥

**एवं सरोवरवर्णन ओंव्या ११ प्र० ११**

सौरस = सुरसाचा अतिशय ॥१०२॥

तवनी = पेज । तमा = अंधःकारा, अथवा तम=अज्ञान, अन्यथाज्ञान ॥१०३॥
मयंका = चद्रा । थोर ताप = महान्ताप = अविद्या. । पारिका = पराबा, अन्य । समर्थ=सामर्थ्ययुक्त ॥१०४॥

टाकिजे = गिवसिजे । विवशी = दरिद्रता । निधानें = द्रव्य, भूमिगत अमर्याद

[1] भव पिशे

कीं ग्रीष्में दगधु : जेवि टाके गंगेचा न्हदु :
तेवि नगर प्रवेसीं आनंदु : कांइ सांघों . ॥६॥
अष्ट धातु[1] सायासें जेवि वेधिजेति स्पर्शें[2] :
तरि नोहे ऋद्धिपुर ऐसें : तें अवधातुते वेधी : ॥७॥
अंतरीं दोषू अप्रमीतु ऐसें सर्व धर्म वहीष्कृतु :
बापु नगरीचें सामर्थ्यू : कीं तें हि वेधिलें : ॥८॥
कीं बहुना अनुपम्यें : देखे नगरिचीं हर्म्यें :
जें पांता जालीं धर्म्यें : वित्त रागांसि : ॥९॥
रचना विशेषें विचित्रीं : हाट चौहोटे तीथरी :
मढ मंडप चौवारी देखे धर्म-साळा : ॥१०॥
ते सीलपें निपुणें : कुसरी रचिली जेणें :
तो विश्वकर्मा मी भणे : आज्ञा देवांचिया : ॥११॥

---

द्रष्य ॥१०५॥

ग्रीष्म = ऋतुविशेष । टाके = पावे । न्हद = जलडोह ॥१०६॥

अष्ट-धातु = सोनें, रुपें, तांबे कथील, पितळ, शिशे, लोखंड, पारा. अवधातु = पुन:, अष्टधा = लोह हाच आठा प्रकारचा । अव-धातु = धातुरहीत ॥१०७॥

( या ओंवीच्या अर्थात सांप्रदार्यीक भिन्नभिन्नार्थांची स्पष्टता टीपकारानीं दिलेली आहे. ) अ-प्रमितु = अगणितु । बहिष्कृत = भिन्न केलेला ॥१०८॥

अनुपम्य = उपमारहीत । हर्म्यें = गृहें । धर्म्यें = वध ॥१०९॥

रचना = उभारणी, मांडणी । विशेष = अपूर्व । वि-चित्री = भिन्नभिन्न परीची, विशेषेंसी चित्रीव । ती-थरी = तीनि खण युक्त । हाट = दुकानें । चौ हाट = चौकाकृति दुकानें, चौकांतील चतुर्वाही दुकानें । मढ = पाषाणी देउळ, । मंडप = धावे, माळवद । चौबारी = चौखांबी चौफाळा ॥ धर्म-शाळा = धर्म शिकविण्याची भूमी, पांथस्थ विश्राम ठाय, धर्मार्थ- शाळा-धर्मशाळा ॥११०॥

शिल्पी = गृहरचनाशास्त्री प्रवीण । कुसरी = कुशलतायुक्तत्वी । विश्वकर्मा = ब्रह्मा, देवलोकीचा सुतार ॥१११॥

---

१ लोहें २ परीसें

ऐसीं अगणितें रचिनें : पांता चालति राजपथें
तंव पदें ठवीतु दृष्टि पूतें : देखे संत जनूं : ॥११२॥
तीयें अटन विशेषें हालि चालि करिते भिक्षुके :
जैसी नरदेहें लाधलीं पीयुषें : धाटेति डोळेयांसि : ॥११३॥
कीं बाह्याभ्यंतरें अनुरागें रातेलीं : तैसीं काषायें पांगुरेलीं :
कीं तियें माधवें उल्हासलीं : पालाश कुशमें : ॥११४॥
कीं संध्यारागें गवसलें : निवविते पूर्णचंद्र प्रकटलें
तेहि उणें एकें बोलें : न होति नि कलंका : ॥११५॥
डांडोळितां तीनि लोकीं : उपमा न देखे आणिकी :
तिहीं निवतुसे भिक्षुकी बाह्याभ्यांतरीं ॥११६॥
प्रवृत्ति जगदेक नायका जेथ खालविजे सीबिका :
तंव माहाद्वारीं देखा : पातला तो : ॥११७॥

---

अ–गणित = गणती रहीत । राजपथ = सार्वत्रीक मार्ग, सुशोभीत रस्ता, थोरला पथ, परमेश्वर प्राप्त्यर्थ शुद्धाचरणीय ज्ञानपथ । दृष्टी–पूत = दृष्टी पवित्रे = एक ज्ञानदृष्टी शुद्धे, दुसरे देहदृष्टी करून हिंसा रहितत्वे पवित्रें ॥११२॥

अटण = अट–गतौ– गमन । पियूष = अमृत ॥ ११३॥

बाह्याभ्यंतर = अतर बाहिर। रातेली = रंगेली । काषाय = गव्हली । माधवी = वसंतऋतुसमयीं। पालाश–कुसुम = पळसाची पुष्पं, एव काषाय वस्त्रे पालाश पुष्पा-सारिखी मुनिजन पांगुरेली ( शामवस्त्र नव्हते नां ? ) ॥११४॥

सध्याराग = साय मधिप्रकाशारक्तता, सेंदुरवर्णी, सायकाळीची आरक्तता, एवं लाल वर्णी वस्त्रे । गवसिले = आच्छादिलें, एवं हुरमुजी रंगीत वस्त्र पागरोनि मुनि-महात्मे स्मरणी बैसिले. ॥११५॥ ॥११६॥

( या वरील ओंव्यावरून पाहतां पंडित नारायण = ग्रथकारावेळीं महात्म मुनिजनांची वस्त्रे काषाय–पालाश कुसुमवत तथा सध्याराग एवं हुरमुजीवत लाल-रंगाची होती असे सिद्ध होतें. पण त्या नंतर श्यामवर्णी कशी जाली ? )

खालविजे = भूमिवरी ठेविजे, उतारिजे । सिबिका = सुखासन । दांडी = दांडेनी युक्त अशी पालखी ॥११७॥

---

१ पाहात

**जगा तळौटी तंवचि वे-हीं : भणों हे भूत धात्री :**
**पदस्थ तंव भवारी : कीजेचिना ॥१८॥**
**बीजें करूनि गोसावी : श्रीचरणकमळीं जेवि**
**अद्यापि वेधली पृथ्वि : न संडी गंधु हे : ॥१९॥**
**कीं कळीकिल्मिषा अमयें : पृथ्वी दाटली शेखी राहे :**
**तें उपचारावेया रसु पाहे देतु वैद्यनाथू ॥२०॥**

प्र. १३ तीनि मठांचे स्तवन ओव्या ७

**तो कैवल्य नाथु चरण चारिया : पदें ठेवी जेआं वरियां :**
**तिआं नमस्करौनि पाइरिआं : देखे माहाद्वारू ॥२१॥**
**तें धर्म सुवर्ण-काराचें यंत्रु : कीं मोक्ष- सिद्धीचें विवरू :**
**तें नमस्करूनि महाद्वारू पाहे मढत्रय ॥२२॥**
**विस्तारली लोक--त्रइं कीर्ति : जो अवतरला असे देव-पती**
**भणौनि वोळगों आली त्रि-जगति : मिषें मढाचेनि : ॥२३॥**

---

तळौटी = तळवटी, तळी । भूत-धात्री = चराचर प्राणिमात्रांते धारणकर्ती एकं पृथिवी। पदस्थ=चरणाकीत।भवारी=समारापासून मुक्तकरिता, संसारशत्रु ॥११८॥ जेवि जैसे—वस्त्रावरी कमळें ठेवीलियां वस्त्रीं स-गंधता राहे तेवि ईश्वरें श्रीचरणु भूमी स्पर्शलिया भूमिये पवित्रता निक्षपोनि गधवत अक्षयीं राहे ॥११९॥

कलि--किल्मिषा = कलियुगधर्मदोषा । आमय = आमांशरोग । शेखीं = सेवटी-निःशेष । उपचारावेया = रोगप्रतिबंध करावेया । रसु = सिद्धपारद तल्लक्षणें स्वमुखे ज्ञानामृत सन्निधान, ईश्वरविहार संबध। वैद्य--नाथू = वैद्य तल्लक्षणें सामान्य देवता तयाचा नाथ = स्वामी एवं श्रीगोविंदप्रभु ॥१२०॥

**एवं नगरप्रवेश वर्णन ओव्या १९ प्र० १२**

चरण-चारिया = पादचारी विहार करणारा ॥१२१॥

धर्म—सु-वर्णकाराचे जंत्रु = धर्म तल्लक्षणे सुवर्णकार तयाचें उजळितें यत्र तद्वत् । मोक्ष—सिद्धिचे = ईश्वर सानिध्यता साधावेयांचे । विवर = कपाट। मढत्रयें = तीनि मढें ॥१२२॥

विस्तार = प्रसर । कीर्त्ती = प्रताप । त्री- जगती = तीनि जगीं ॥१२३॥

कीं भवार्णवीं सापें : प्रकटलीं कैवल्य रत्नांचीं द्वीपें
ना तरि देव-राजधानींची जुपें : उघडलीं मज पांतां ॥२४॥
कैलास सत्यलोक वैकुंठ : हीं काज तिन्ही मठ :
कां हे उपमा प्रकट सांधिजैल्तु : ॥२५॥
हरीहर ब्रह्मादिकु तिन्ही देव होउनि एकु :
जें स्थान सेविती त्रीपुरुखु : अद्यापि भणिजताति ॥२६॥
भणौनि इए सृष्टीं धांडोळितां उपमा न जोडे सुटी :
कां परदैवु अधिष्ठी : जेआं स्थानां : ॥२७॥

प्र. १४ सतमहिमा ओव्या ३२

तेथ ठाइं ठाइं निवृतांचिआ सभा : फाकत शांती तेजाची प्रभा:
ते देखत खेऊं जळैतुसे उभा वर्गु अविद्येचा ॥२८॥
तेथ निरूपणांचनि सुधाकरें दोंदिलें जाली आर्त चकोरें :
जैंही क्षेपिलें आंधारें : अन्यथा ज्ञानाचें ॥२९॥
आक्षेप परिहारीं निर्धारू करितां परशास्त्र विचारू :
तेणें श्रवणें संसारू : विरळतु दीसे : ॥३०॥

---

भवार्णव = ससार समुद्र । सांपे = प्रस्तूत । कैवल्य तल्लक्षणे रत्नांची द्वीपे = व्यवहारी स्थाने । राजधानी = राजाची नगरी । जुंप = कोठारे, भांडार गृहें ॥१२४॥

हो काज = मज पांता ॥१२५॥

त्रि--पुरुष = हरि हर ब्रह्मा ॥१२६॥

सुटी = मोकळी, तथा सारिखी, बरवी ॥१२७॥

**एवं तीनि मठाचें स्तवन ओव्या ७प्र० १३**

फांकत = स्फारत । वर्गु = थोवा । अ--विद्येचा = अविधीचा ॥१२८॥
सुधाकर = चंद्रामृत ॥ दोंदिलें = सुख उन्नत जालीं । आर्त्त तल्लक्षणे चकोरवत् भक्त । क्षेपिले = क्रामिले । अन्यथाज्ञान तल्लक्षण आंधार ॥१२९॥

आक्षेप = शका । निर्धार = निश्चितार्थ, सिद्धान्तार्थ । पर- शास्त्र = परमेश्वरोक्त ब्रह्मविद्याशास्त्र । विरळतु = पातळ होतु ॥१३०॥

जेथची नांव नरि मऱ्हाटी : परि षड-दर्शनातें दळवटी :
प्रमेय धांडोळितां सृष्टी आर्थीचिना ॥३१॥
कीं संसारसागरीं वागजाळु पांगीलें द्वीवर्गी
जरि एकुहि न पडन्चि बाहीरि जीव मीनु हा ॥३२॥
तैसे कृष्णसारा लागौनि : जे हिंडतां रानीं वनीं :
ते पारधी पाहुनि एरू नकां ॥३३॥
ते वाक् समुद्रिचे पाणिबुडे : कीं सारासार सीमेचे गुंडे :
कीं मोक्षनिधी धांडोळिते उघडे खनवादी जे : ॥३४॥
असों हे सोमकांत उपळीं : जेवि द्रविजे चंद्र-कळीं :
तेवि तयां संतांचां मेळीं : जालें जीवां : ॥३५॥
भयानका इआ : एके न भिये एति भव-भया :
दास्यावरि जेआ : आनि चाडू ॥३६॥
तया ब्रह्म स्वरूपाचा गुणीं : भणौनि सुवेंझु भरले मुक्तामणीः
जयांचें दुसुरेंपणें उरौनि : भंगेचिना : ॥३७॥
जे विरहें झुरति : प्रेमें मुरती :

---

षड्दर्शने = षड्शास्त्रे । दळवटी = दाटीति । प्रमेयें = अष्टादश पुराणें । आर्थीचिना = सरी पवतीचिना ॥१३१॥

वाग्जाळ- पांगिले = नाना मतमतांतराचे वाक् तेंचि जाळ पसरिले ॥१३२॥

कृष्ण--सार = हरिणनाभीजकस्तुरी, तथा परमेश्वर अनुभूती ॥१३३॥

सारासार = निर्णयात्मक ज्ञान। सिमेचे गुडे = सिमादर्शक पाषाण। निधी = भूमि निक्षेपीत द्रव्य । खनवादी = मत्रवादी॥१३४॥

उपळी = पाषाणी ॥१३५॥

भव-भया = संसार भय। चाढ = आर्त्ती ॥१३६॥

ब्रम्हस्वरूपाचा = ईश्वरस्वरूपाचा। स-वेंझु-भरिले = सुछु प्रकारचे वेंझानियुक्त असें ओंविलें। दुसरेंपण = जीवत्व नुरऔनि। भगेचिना = पालटेचिना, तथा जीवेश्वरेंकत्व भंगेचिना, तथा दृष्टांति दोनि सरे ओंविलीं परी मौक्तिक हे नाम भगेचिना ॥१३७॥

झुरति = ईश्वरवियोगें झुरणी लागेती । प्रेमे = आवडीं । मरती = मुर्छीत होती।

आर्ती उरती निर्वाणीही। ॥३८॥
अलौकिकें जयाचियें राकडें · सर्व विषइं देउंचि आवडे :
उत्कंठे पुढां रोकडें : मोक्ष सुख ॥३९॥
एसीं परीकरें पवित्रें : राउळांचीं लिळा चरित्रें :
तें वांचौनि श्रोत्रें : आनु सर्वातिना : ॥४०॥
वाक् त्रयाचिये खाणी : लागली शब्दरत्नांची वीणी :
जरि एक हि खरें नव्हेचि भणौनि : सांडिएली : ॥४१॥
निमीषोन्मिषांचेनि मीषें : विरहें चडफडीत जैसे :
आर्तैल डोळे तीए दीशे धांव घेती : ॥४२॥
देवेंविणु दृष्टी : रिती देखे सृष्टि ·
जैसी कां अनावृष्टि : जाति चातकांसी : ॥४३॥
स्फुरण स्फुंदनाचेनि मिषें : प्राण एरझारा करीतु जसे :
सौरभ्यें गिवसावेआ दोषें · गर्भ सुमनाचा : ॥४४॥
श्रीचरणकमळिचा वासु : वांचौनि प्राणा न करी सौरसुः
कां जें देउ हृषीकेशु : भणौनिया : ॥४५॥

---

उरती = ईश्वरनामस्मरण करावेंगा उरवीति । निर्वाणी = देहांतापासौनि साध्यस्थ प्राप्तिपर्यंत ॥१३८॥

अ-लौकीक = लौकीकरहीत । राकडें = रकाचा अतिशय, क्षुल्लक । मोक्ष-सुख = प्रेमीभक्त तो मोक्षसुखाचीही जीव्री इच्छा न धरी ॥१३९॥

लीला = लीलयतीति लीला । श्रोत्रें = कान ॥१४०॥

वाक्त्रय = तीनि वाचा । शब्द-रत्नांची वीणि = शब्द तल्लक्षणें रत्न तयाची वीणि = प्रसवतेद्वार ॥१४१॥

निमिषोन्मिष = नेत्र बद करणे आणि उघडणे ॥१४२॥

अनावृष्टी = अ-वर्षण ॥१४३॥

स्फुरण = बोलणे, स्फुर्ति, आंगस्फुरणे । स्फुदन = फुदणे, भावे स्वासाकर्षिणें, आणि बाहीरी सोडणें । मिषें = निमित्यें । प्राण = प्राणवायु । सौरभ्य = परिमळ । गिवसावेआं = घेआवेआं । दोषें = कारणें । गर्भ-सुमनांचा = ईश्वरश्रीमूर्तींची पदकमळें तल्लक्षणें पुष्पाचा ॥ १४४॥

वास = सुगंध । सौरसु = सहवासु ॥१४५

सांडौनि अन्यरस सेवा : नामाची गोडी लागली जिह्वा :
जैसी चाखत रसु जीवा : देति आसी हे : ॥४६॥
कीं सर्वज्ञ नामु पूर्णशशी : जीव कुमुदांतें विकाशी :
भणौनि वियोगु पाविजे सारसीं : तटीं रसनेचा : ॥४७॥
ओळगावेआ परेशु : नाहीं ब्रह्मादिकां सौरसु :
तीए श्रीचरणींचा स्परीसु त्वचा भावी : ॥४८॥
देहो सप्त धातुंचा मैळावा : चरण स्पर्शें होए जेआ सदैवा :
तीए सुवर्ण जातिंचा ठेवा : न मोडे कल्पांतीं ही : ॥४९॥
जरी पाए श्रीचरणां वेधले : हात दास्यासि दीह्नले :
वाणी गुण लाधले : अमृतोपमा : ॥५०॥
स्मरण मनातें लुसी : बोध बुद्धीतें मुसी :
अहंकार दास्यत्वेंसी : एकवटला : ॥५१॥
ऐसी सर्व भावीं : जेही सोइरीकु बांधली देवींः
जन्माचा तोडुनि जीवीं : भवबंध : ॥५२॥
जे जगजीवनें परीपूर्ण घट : कीं संसार रंगिचे नट :

---

अन्यरस = ईश्वरधर्मास अन्य तयांचा रस, षड्रस, नवरस । चाखत–रसजीवा = इंद्रिया रसास्वादु घेति आणि भोक्तव्यरस तो जीवां ॥१४६॥

सर्वज्ञ = सर्वजाण । कुमुद = श्वेतकमल। सारसी = चक्रवाकपक्षी । तटीं = तीरी ॥१४७॥

ओळगावेया = अर्पण करावया, सेवा करावया । परेशु = परा = प्रकृति माया तियेचा जो ईश तो परेशु। सौरसु = पवाड, रिगावा । त्वचाभावी = असंशी ॥१४८॥

मेळावा = एकवटा । कल्पांती = सृष्टिसहाराचा अंती ॥ १४९ ॥

अमृतोपम = अमृतसादृश्य ॥ १५० ॥

लुसी = आकर्षी, लुटी । मुसी = आटी, मुर्क्षीत करी । दास्यत्वेसी = दासोऽहं भावनेसी ॥ १५१ ॥

सर्व–भावी = मनसा, वाचा, क्रिया । जन्मौनि मरणें पुनति उपजणे ऐसा जो संसृति भ्रमण तो तोडिला ॥ १५२ ॥

नाते साटवण मठ : ब्रह्मविद्येचे : ॥५३॥
कीं ते ईश्वर सेवेच मोदकु : कीं आर्ति जातिस्तबकु :
कीं प्रेम पीयूष मयंकु : परीपूर्ण जे : ॥५४॥
कीं ते ज्ञानवैराग्य पक्षी : भक्त परमहंस मी लेखीं :
रमती श्रीचरणकमलीं सुखी : मानसीं आपुलांचि : ॥५५॥
बाप साधन निरुपम : जें जाणे धुरेचें वर्मः
जेणें वालभैलें परब्रह्म : पाठीं धांवे : ॥५६॥
जैसी ऊरसें धनु : हुंबरुत ये वच्छा लागौनि :
ना तरि बाळाची आर्ति देखौनि : जननी जैंवी ॥५७॥
तेवि तया सदैवा सवें : जगदात्मा पाठीं धावे
तै श्रुति निर्गुण भणतां एणें नावें : लाजतु असे : ॥५८॥
असों हें भव मोचना : देवरायाचे लाडसपणा :
देखिले राज भुवना : माजि नांदते : ॥५९॥

---

जगज्जीवन = जगातें जीववितां एव परमेश्वर । घट = कुंभ, घागर । नट = वेष एव अज्ञानातें मोहवितें । मठ = स्थान ॥ १५३ ॥

मोदक = लाडु । जाति = जाई । स्तबकु = पुष्पगुच्छ, जाइचे फुलांचा झेला । मयक = चद्र ॥ १५४ ॥

ज्ञान वैराग्य तल्लक्षणं दोनि पाख । मध्ये भक्ति तल्लक्षण परमहस । लेखी = स्तावक म्हणे, मी-मानीं । श्रीचरण तल्लक्षण उदक । मानसी = मान सरोवरीं ॥१५५

धुरेचें वर्म = ईश्वराचें महत्तत्व, खावनी, मनोधर्म तथा-जेणें प्राप्त होये ऐसें निदान जाणे । वालभैले = भक्त आवडी परमेश्वरां पाठीं धावे कां प्रेमातिशये परमेश्वर भक्तां पाठीं धावें, अन्योन्ये अत्यंतावडी ॥ १५६ ॥

ऊरसे = श्रेहोत्कर्षें । जननी = माता ॥१५७॥

सदैव = दैवाथिले । जगदात्मा = जगताचा आत्मा ॥ १५८॥

भव-मोचने = ससारा पासौनि मुंचविते, । लाडस-पण = लडिवाळपण । राज-भुवनां = श्रीगोविंदप्रभुरायाचे गृहां, एव राजमठां ॥१५९॥

**एवं सतमहिमा ओंव्या ३२ प्र० १४**

प्र. १५ स्तावकात्म निवेदन ओव्या २२

आदरेंसी नमस्करिलें · सोपानमार्गु लंघिलें :
मग साष्टांग दंडवतु केलें रायांगणीं : ॥६०॥
संभ्रमें जाला हृदय स्फोट : न संवरे करुणा जळाचालोट :
प्रेमें सदगदीतु कंठ : तेणें बोलवेना : ॥६१॥
भणे अनादि अविद्या अवघडी : भव म्लेंच्छाचिए बांधौडी :
पडिलेया ही बापुडी : कव्हणातें जाणांचिना : ॥६२॥
भणौनि आह्मां कवण आहे : कवणातें पुसो बापु माए :
कवणा बंध सोडीयाचे पाए : धरुनि राहो : ॥६३॥
अवलोकुनि दाहि दीशा : कवणी ठाइं ठेऊआशा :
कव्हणाची पाहों वाश : अनाथ आम्ही : ॥६४॥
ऐसा कव्हणी नाहीं सोएरा : जो ने कृपावंताचिआ द्वारा :
आम्हां वांधिलिया मोकारा : कवण घाली · ॥६५॥
तंव प्रवृतिचे कांइ सांघे: चालविलों फळ श्रुतीचेनि मार्गें :
आम्हीं व्यसनाइतु आवघे कांहीं जाणौंचिना : ॥६६॥
एकाधें अक्षम आंधळें: जेवि कुहा लोटिजे बळें

---

आदरेसी = सन्मान्यतेसी । सोपानमार्गु = महाद्वाराआतुल पायरियां, सीडीया लंघिले = क्रमिले ॥१६०॥

सभ्रम = भ्रांति, भूललेपण । स्फोट = फोड, फुटणें, विभागत्व । करुणा = हृदयद्रवलेनिपणें याचना । सदगदीत = गदगद वाचा ॥१६१॥

अनादि-अ-विद्या = आदिरहित अ -विद्या । अवघडी = कठीण । भवतक्षणें म्लेच्छ । बांदौडी = कारागृह । बापुडी = सौच्य ॥१६२॥

बंध सोडिया = बंधमुक्तकरिता ॥१६३॥

अ-नाथ = नाथरहीत ॥१६४॥

सोयरा = सोयकरिता । मोकारा = मोकळिया करिता ॥१६५॥

चाळाविले = झकविले । व्यसणाइतु = व्यसनाइतु, अभिलाषी ॥ १६६॥

अ-क्षम = क्षमे अयोग्य, पगु, अध । कुहा = कूप, विहीर, आड ॥१६७॥

तैसें प्रवृत्ति दाऊनि फळें : आम्हां केलें : ॥६७॥
तेह् वेळीं चतुर्युग भजणें : वर्णाश्रम साधनें :
सकल देवतांचीं ज्ञानें : धांडोळिलीं :॥६८॥
यज्ञोपायनें देऊँनि करी : भजिनलो नाना परी[1] :}
परि आवघीं प्रपंचाचीं सोएरीं : तें जाणोंविना : ॥६९॥
वसवीती आपुलांला लोकीं : देति[2] निजे सारिखी :
जवळीचि दाऊनि नीकीं : मेळवीति आपणे या ॥७०॥
हा तंवचि आदर बहु : जंव सुकृतांचा संभहु :
मग निगावा चक्रवीहु : भारिवा तो[3] : ॥७१॥
दाऊनि साकुरेची गोडी : मानी भरीति तोंडीं :
जैसीं लाघवीयें वेडीं : चाळविलीं : ॥७२॥
तैसें स्वर्गादि सुखा : रातलेआं जीवां अशेखा :

चतुर्युग-भजन = कृत्त, त्रेत, द्वापार आणि कली या च्यारि युगधर्माधिकाराभिन्न मनुष्य देहां साधीति। वर्णाश्रम = ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र, गृहस्थ, वानप्रस्थ, सन्यस्त आणि सर्वांचा मूलभूत जो ब्रम्हचर्याश्रम ( जो मृत जाला म्हणून भारताचा विनाश होत आहे ) चतुर्युगाचे चान्हि परमरूप धर्म ॥१६७॥

यज्ञोपायने = वेदोक्तक्रियाचरणे, तथा समिधादि यज्ञोपयोगी पदार्थ ऐसेनि मेळेसी। करी = हस्तकरून आहुत्यादि कर्म करी। प्रपंचाची = प्रपञ्चरूपपदार्थांची ॥१६९॥

आपुलांला-लोकीं = यथा स्थानीं। निज सारिखी = आपणेया सादृश्य सौख्य संपादीति। नीकी = बरवी। मेळविती = सारूप्यते मर्त्तिमध्ये मेळवीति ॥१७०॥

सुकृत = पुण्य एव लेप सरे तंव। चक्रविहु = तेयांतोनि नीगतां दुःख भारी ॥१७१॥

लाघविये = दृष्टीबंद खेळताये ॥१७२॥

रातलेया = वेचलेया। परिणामीं = सेवटीं ॥१७३॥

१ सर्वाही परी २ दावीति ३ भारि होए

परिणामीं भवदुःखा : वांचौनि आन नाहीं : ॥७३॥
कीं वळघौनि झाडा : एरझारा करी माकोडा :
तैसा भवरासि[1] बापुडा : संचरतुसें : ॥७४॥
संसार कुपाचां पोटीं : कर्म माळिका[2] घटीं :
वाया[3] यंत्रारूढ जीव सृष्टी : भ्रमतुसेः ॥७५॥
कीं बुडतां भवसागरीं : भणौनि देवता चक्रीं[4] :
माया मोही भवंडितां ही परी : न जीएतीचि ने : ॥७६॥
कर्म भूमीचिए घानौडे : बांधौनि मिथ्या ज्ञानाची झांपडी :
काळें भवंडिलीं बापुडीं : जीव पशुवें ॥७७॥
मेरु पासाव घनवटें : जीं हिंसीं जालीं तुकमटें :
तेव्हडीं दुःखें भोगितां जरि न विटे जीव रासि हा . ॥७८॥
विपायें प्रर्जन्याचिया धारा : वरि गणवती गगनिचिया तारा :

---

वळघौनि = वेघोनि । भव–राशी = जन्ममृत्युचिया अमर्यादश्रेणी ॥१७४॥

ससार तल्लक्षणे आड तेयांतु । कर्म–मालिका–घटीं = चतुर्विध कर्माजेकाचिया परवडी घटियंत्रवत्, एवं जीवायुष्यसख्या जेवि घटीं भरे रिचवे तेवि जीव संतासंत भोगितूचि असे । यत्र = माया तल्लक्षण राहाटि । तयावरी आरूढ = आरोहण करूनी एव माया चक्री जीव भ्रमीतूचि असें ॥१७५॥

भव–सागरीं = संसारसमुद्रीं । बुडालेया जीवा–देवता चक्री = कुल्लाळ चक्रीं फिरऔनि देहांतौनि उदका वमिती तैसेचि देवतांचक्रीं भ्रमवीति । भवंडितां फिरवितां । परि न जीयेंति = मोक्ष न होयेची ॥१७६॥

कर्मभूमि = मनुष्यदेह । घानौडी = भारतांतर्गत हीमासेतु पर्यंत भूमी । मिथ्या ज्ञानाची = अन्यथा ज्ञानाची । काळ = माया, तथा देहाभिमानीनि देवता तल्लक्षण तेली जीव तल्लक्षण बैल ॥१७७॥

मेरुपासाव = सुवर्णाचलापासून। घन वट = भारी । तुकमठ = तूकितां साने, हळवट । न विटे = कांटाळेना' ॥१७८॥

विपाये = क्वचित । तारां = नक्षेत्रे । पर्वे = बोटे, आंगुलियाचेंनि चवरे ब्रम्हांडा

---

१ जीव २ कर्म माळ काळ घरीं ३ माया ४ चक्रासी नरी

नां तरि पवैं घालितां वारा : उमानैल कीरू : ॥७९॥
परि जीव भोगाचा जीणसी : नाहीं देवताही सौरसीं :
भणौनि आपुलाला कर्म-लेपैंसीं : ञ्ळखेति तियां : ॥८०॥
असो हे भवबांधौडीचे[1] : जे हि सुटिक बोलीजेति जीवाचे :
ते मिया उपाए धांडोळिले सृष्टीचे : भणे नारायणु : ॥८१॥

प्र १६ ईश्वरगुणानुमोदन ओव्या १९

बोलावेया जयाचें पद : मुके जाले वेद :
तयातें उपायें कवि जात्यंध : देखों पांती : ॥८२॥
जेही निरासीं जीवीं : सांगौनि[2] उपायाची धांवा धांवी :
तेआ अनाथाकारणें गोसावी : बीजें केलें : ॥८३॥
बापु जीवाचिए कणवें : जे अज्ञाना मायेची सवे :
भणौनि तोचि वेषु देवें : अंगिकारिला : ॥८४॥
जो अगाधु अक्षोभु : अव्यक्त अनादि स्वयंभु :

---

तूल वायु । घालिता = दवडितां । उमानैल = गणवैल । कीरू = निर्धारेसी ॥१७९॥

जीणशी = भिन्नाभिन्न भाग । सौरस = सहवास, कर्मलेपेसी = कर्तृत्व कर्मलेपयुक्तेसी तिया = विश्वादि सकल देवतां ॥१८०॥

सुटीक = मोक्षोपाय बोलेति । एव गोबद्ध दृष्टांते ॥१८१॥

स्तावकात्मनिवेदन ओव्या २२ प्र० १५

पद = महत्व । जात्यध तल्लक्षण अज्ञान जीव ॥१८२॥

निराशी जीवी = असशारहीत । धांवा धांवी = पळापळी तल्लक्षण देवतांचे अंतर्याग बहिर्याग रूप उपाये ते ईश्वर धर्मिये सांडिले, धांवाधांवी तल्लक्षणें भूत भजन पुरभजन सांडौनि देवतांचे बाह्याभ्यंतरयागाचरणें, अनुसरलेया अनंतरें प्रेमाधिकाराचे उपाय जोडावेया धावेति ॥१८३॥

अज्ञानां-मायेची सवे = जीवां । अज्ञानां तत्स्थानाची = मायाधिनाची सर्वें म्हणून जीवोद्धारक मायावेषी अवतरिला 'सभवाम्यात्ममायया' ॥१८४॥

अगाध = गाधरहीत । अक्षोभ = क्षोभरहीत, गहन एवं खोली न जाणवे,

---

१ बदीखानीचे २ साडुनि

तो मायावेषें श्रीप्रभु : अवतरिला : ॥८५॥
निःकामा निराभिमाना : निजानंदें परिपूर्णा :
केवळ[1] सुखा कीं व्यसना : जीवोद्धरणाचें : ॥८६॥
आहोजी आइका : तुमतें नाहीं कृपेचा आवांका :
तरि येथें धीजें करानी कां : मान चुकविलें : ॥८७॥
भले तैसें दुष्ट लेंकरूं : परि माउलिए नए अव्हेरूं :
देवा कृपेचा सागरू : आणि मी तृषा फुटे : ॥८८॥
बाप समर्था बापा : भणवीसी आपणयाते नृपा :
तरि लेंकरूवा कां पा : दैन्य-भोगु : ॥८९॥
जाणितलें जेआं-लागि उदासु : जोंजार प्रसवलासि बहुवसु :
भणौनि उबगैलासि पोसु : जीव[2] जातां : ॥९०॥
प्रजापालनि जेवि : कांइ आक्रोशें आति कासुवी :
तीचा भीतरुचि वाढवी : तेया बाळकांते ॥९१॥
तैसें सकल जीवांचें जीवन : जें अतीवस[3] प्रसन्न :
ते माउली कां चोरिताहे पान्हा तुझी कृपा दृष्टी : ॥९२॥

---

आत्म श्रद्धे वरौनि कदापिही ढळेना । अव्यक्त = न व्यक्तिर्विद्यते यस्मिन् स अव्यक्त = इंद्रियास अ-गोचर । अनादि = आदिरहीत । स्वयं-भू = स्वतः अवतरणारा, स्वेच्छे प्रकटणारा, ब्रम्ह, स्वसामर्थ्यसपन्न ॥१८५॥

निष्काम = कामरहीत ' कामोऽभिलाष ' एव अभिलाषरहीत । निराभिमान = अभिमानरहीत । निजानद = स्वानद ॥१८६॥

आवांका = मर्यादा, दानी पात्रापात्र पाहणे नाहीं (ईश्वर तर सर्वज्ञ नां ?)॥१८६॥

दुष्ट = सदोष, अधम, अन्यायी । तृषा-फुटे = तृषेकरूनि कंठ शोषे ॥१८७॥

बापा ! = ताता ! ' नृपा' = मनुज पालक' राजा । दैन्य = दारिद्र्य ॥१८८॥

उदास = तटस्थ, अप्रसन्न । जोंजार = जजाल । उबगलासा = त्रासलासी ॥१८९॥

प्रजा = अपत्ये, बालक । आक्रोश = क्लेश. आसमतात् क्रोश आक्रोशः ॥१९०॥

जीवन = जीवविता । अतिवस = बहुवस ॥१९१॥

---

१ केवळापरसुखा २ बालकाते ३ अतित्वभावे

भव-मुक्ताचें वेंझें : तुझेनि कृपाकटाक्षें सुजे :
तूं द्रष्टा भणौनि तुझे : तो गुण ञ्वी : ॥९३॥
तापानळें कवळलें : भूतजात वनवलें :
कर्मजाळीं व्यापिलें : ब्रह्मांड पै : ॥९४॥
काळानळ जोहरी : जीवां होतसे बोहरी :
राखतां नाहीं भवारी : तुज वांचौनिया : ॥९५॥
सांचि पा यासि कवण आहे तूंचि एकु बापु माए :
तरि वहिला धावें जंव आहे कंठीं प्राणु ॥९६॥
भणवीसी मी उदास पर-ब्रम्ह निसंगु आत्माराम :
जीव सृष्टी सकल कर्मा : अधीन असें । ॥२९७॥
परशास्त्र संमत : मियां आइकीलें देवकें चरीत्र

---

भव-मुक्ताचे वेझ = संसारीक मोती तयांसी वेझ = छिद्र एव तीक्ष्णद्रष्टा कुशल तो मोतिया छिद्र पाडी, भव = संसार, मुक्ताचे ससारा त्रसौनि जे मुक्त जाले तयांसी ही ईश्वरेकदृष्टी वेझ = छिद्र एवं ज्ञान प्रेमाचे सक्रमण कर्त्ता. तोचि क्रम शाब्दी = साधनी ज्ञान प्रेमाचे अधिकार अनुलक्षौनि संक्रमीति पुनति (पुनरपि) अपरोक्षी सामान्य, विशेषी मलकर्मादि । गुण = तल्लक्षणे तंतु शक्तिसामर्थ्ये । कृपा कटाक्ष = कृपा दृष्टि करोनि । सूजे = दिसे । तथा तो गुण ञ्वी = ज्ञान प्रेमाचे संक्रमणु करी ॥१९३॥

तापानल = तीनि तापाग्नि । कवळिले = व्यापिले । वनवले = करपले । कर्म-जाळी = शुभाशुभ कर्मलेपाचा समुदायीं, चतुर्विध कर्मफलांचा निष्पत्ति । पै = निर्धारेसी ॥१९४॥

बोहरी = काळ = कृतांत, आयुष्यमर्यादा तल्लक्षणे अग्नी । जोहरी = दग्धकरी, राखवंडी करी, नाश करी । भव तल्लक्षण ससार तेयांचा शत्रु एव भव-हंता ॥१९५॥

साच = सत्य । वहिला = लवकरी ॥१९६॥

निःसग = संगरहीत । आत्मरमण = स्वात्मरमण । सृष्टि = चराचर सृज-लेली ॥१९७॥

पर-शास्त्र = परमेश्वरोपदेशीत शास्त्र = ज्ञान । संमत = सम्यक्प्रकारेसी मत =

जे राउळें काढिलें सीनत[1] : अनंत आपुलें : ॥९८॥
तेथ आम्ही चि कांइ केलें : जरि मिगों राउळाचेनि बोलें :
तरि वापपण आपुलें : कां दाविजेना : ॥९९॥
भव दु:खाचा वणवा : वरि साहावैल गा देवा :
जरि तुमीर विरहाग्नि जीवां : जीणें नाहीं : ॥२००॥

प्र. १७ रायांगण स्तव ओव्या ५

बापु सदैवु धरणी : जे स्पर्शीली श्रीचरणीं :
कीं जाणतुसि खावनी : वल्लभाची : ॥१॥
साधनामाजि निरुपमा : होसि परोपद्रवी क्षमा :
भणौनि आवडलीसि परब्रह्मा : श्री चरण ठेउं: ॥२॥
तें नव्हे हें रायांगणा : जें पात्र जालें श्रीचरणा :
बीजें करितां जीवोधरणा : लिळावशें : ॥३॥
वामदक्षीण विभागें : खोलति भक्ति जन आघवें :
वृत्ति जाणौनि उलींगें : वोळगवीतिः ॥४॥

---

सिद्धात । देवके = देवाचे । राऊळ = राजे, सद्गुरू, राजमंदिर । चरित्र = वर्त्तन, सद्व्यवहार करणे ॥१९८॥

बोले = बोधे, तथा ज्ञानोपदेशकरी । बाप-पण = समर्थपण, पितेपण ॥१९९॥

भवदु:ख = समृति आवागमनजन्य क्लेश । साहावैल = सोसवैल । विरहाग्नी = वियोग तल्लक्षण अग्नि ॥२००॥

**एवं ईश्वर गुणानुमोदन ओव्या १९ प्र. १६**

सदैव = दैवेसह वर्त्तमान । खावनी = मनोधर्म । वल्लभ = प्रिय, अध्यक्ष, पती ॥२०१॥

साधनामाजी = सकल पावन साधनामध्यें। क्षमा = अपराध सहन करणें, धैर्य धरणे, पृथिवी । परोपद्रवी = परकियांते वधिता ॥२०२॥२०३॥

वाम-दक्षिण = डावे उजवे । खोलति = ओळगेति, मिरवेती । उलिंग = नियमित व्यापार = जेयांसी जो नेमलेला विधी तो तेणे स्वयं करणे ॥२०४॥

---

1 शरणांगत

ऐसीं सुरंगें सुहावीं : राउळिचीं चरणकमळें बरवीं :
जेआं हृदए उपानहौ सदैवीं : मैळविजति : ॥५॥

प्र. १८ देव स्तव ओव्या १५.

सर्वज्ञां करितां बीजें : तरि देशाचि आनंदें फुजे :
तेथ जयजयशद्वीं स्तविजे : देवतागणीं : ॥६॥
भणति जयजय परम पुरुखा : जय महाकाळा निःशंका :
जय निर्मळा निर्दोखा : जीवां सुखनिधी : ॥७॥
जय निरामया निर्ममा : जय उदासा परब्रह्मा :
जय परदेवा उत्तमा : मायावेषा : ॥ ॥
जय अद्वैता अपारा : जय निर्गुणा निराकारा :
जय प्रभु दातारा : देखिलासि : ॥९॥
सातुमुगुटाचें भूषणः जळे: जळो हें देवपण :
कां नाहीं अधिकारेंविण : दास्य तुझें ॥१०॥
नव्हे पीयूष गोड : पांतां स्वर्गादि सुख थोबड :

---

सुरंगें = नुष्ठुत्तर । सुहावीं = सुष्ठु हावावीं. उपानहौ=पादत्राण, पायतन॥२०५॥

**एवं रायांगण स्तव ओंव्या ५ प्र० १७**

सर्वज्ञां = श्रीगोविंददेवां, सर्वजाणतेयां । बीजे = गमन । फुजे = फुगे । जयजय = ग्रंथामध्ये मंगलाचरण ॥२०६॥

परम-पुरुषा = श्रेष्ठत्वे पुरुषार्थिया[1] । महाकाळा-निःशंका = महा = थोर जी माया तियेविषयीं निःशंका = भय रहिता ! । निर्मेला = मलरहिता । निर्दोषा = दोष-रहिता । निधी प्रसवकारक ॥२०७॥

निरामय = आमयरहित, कल्याणकारक । निर्मम = ममतारहीत ॥२०८॥

अद्वैता = द्वैतरहिता । अ-पारा = पाररहिता । निर्गुणा = त्रिगुणातीता । निराकारा = आकार रहिता ॥२०९॥

मुकुट-भूषण = मुकुटावरील किरीट । ॥२१०॥

पीयूष = अ-मृत । थोबडे = धोगडे । अपवर्ग = माये पासौनि अरुता जो

---

१ जय

होए अपवर्गु बापुडा : तुझेनि सन्निधानें वीण : ॥११॥
श्रीमूर्ति देखौनि राउळिची : फिटली अवदशा डोळेआंची :
अहो द्वापर आम्हां आजीचि : आठवलें : ॥१२॥
जडें पाठीं धावेति वेधें · आनंदें डुलति चतुष्पदें :
परसुखाचेनि·अहलादें : नांदति गोवळरुवें ॥१३॥
तुझेनि अंगीकारें : ह्मणे स्वर्गसुखातें पुरे
कैसेंनि वाइले उतरे : हें मुगुटभोजा : ॥१४॥
अंतराळौनि विमानस्थीता : ऐसें स्तवीति देवता :
तंव कृपा उपनली जगन्नाथा : तें परिएसा पा : ॥१५॥
परम मंगळें जिएचां उसंगीं : जे काळासि वरि वज्रांगी :
ते कृपादृष्टि गगनमार्गीं : संचरली : ॥१६॥
सहज सरळ सुहावा बापु दाताराचा[1] दृष्टिवा :
जोवारि घडौनि देवा : देत परमानंदा : ॥१७॥
चाखेति स्वामिकृपेची गोडी : ह्मणति स्वर्गसुखें रांकडीं :
आनंदें डोलति कोडी : विमानाचिया : ॥१८॥
अवलोकितां श्रीमूर्ति : न लगति नेत्रांचीं पातीं :

देवतावर्ग, तीनि दानाचे फळिये, वेधा पासौनि प्राप्तिपर्यंत एवं आरंभा पासौनि सेवटपर्यंत । बापुडा = केवीलवाणा ॥२११॥

अवदशा = निकृष्ट स्थिती, दारिद्य ॥२१२॥

जडें = बालके । गोवळरुवें = गोपाळें ॥२१३॥

मुगुट-भोज = श्रीमुकुटीची भूषणें ॥२१४॥

अंतराळ = अंतरिक्ष । विमानस्थिता = विमानारूढा ॥२१५॥

परम मंगल = श्रेष्ठतर कल्याण । उसंगी = ओंटी । वज्रांगी = वज्राचे शरीर संरक्षित कवच ॥२१६॥

सहज = स्वेच्छे । दृष्टिवा = अवलोकन ॥२१७॥

चाखेति = अनुभवीति । रांकडी = रंकातिशयें, कठिणे । डोलेति = डुलती॥२१८॥

१ देवाचा

ते जे जे डोळे वाट दाखवीति : पर सुखाची : ॥१९॥
इत्यादि बहुती लिळा : तूं क्रीडसी स्वामि सळा :
तो मी न ल्हायेचि[1] सोहळा : तुझेया संनिधानाचा : ॥२०॥

प्र- १९ स्तावकरंकवृत्ति ओव्या ६

वज्रापासाव कठीणु : मज दैवहताचें अंतःकरणु :
एऱ्हवी तुझनि वीरहें प्राणु : जावे कीं : ॥२१॥
भणे आहोजी जगजीवना : मी फुटतु असे ताऱ्हा[2] :
तूं मायावेषु तरि मज अज्ञाना : कां विसंबलासि : ॥२२॥
तूं परब्रह्म मज क्षुधा : तूं सुखराशि मी दुखिया सदा :
तूं मोचकु मी भवबंधा : वश जाला : ॥२३॥
तूं कृपाळु मी अनाथु : तूं जगदात्मा मी भूतु :
तूं तारकु मी बुडतु : भवार्णवीं : ॥२४॥
मायाविरहीत जैसें : फुंजतु बाळकु आपैसें
धांवां फोकरीतु बोले तैसें : दीशांप्रति : ॥२५॥
तेवींचि संभ्रमें बेंबिळे चाले : प्रेमें सद्‌गदीतु बोले :
तीया आशा टाकौनि आले : राजभुवना : ॥२६॥

---

अवलोकितां = पाहतां। पाति = नेत्रपाति । परसुख = परमेश्वरीसौख्य ॥२१९॥
क्रीडा = विहार । सळा = साभिमानिया । सन्निधानाचा = समागमाचा ॥२२०॥

**एवं देवस्तव ओव्या १५ प्र० १८**

कठीण = निबर । दैव = भाग्य । हत = हनन केलें ॥ २२१
फुटतसे = भंगतसे । विसंबिलासी = विसरलासी ॥ २२२ ॥
मोचक = मोकळेकरिता, भवदुःखापासौनि सोडविता । भवबंध = अविद्यादोषें बद्ध ॥ २२३ ॥
दयाळु = दयामय । अनाथ = नाथरहीत । जगदात्मा = चराचर सृष्टयांतर वृत्ते आत्मकधर्में ईश्वर । भूत = एकदेशी । भवार्णव = संसार तल्लक्षण समुद्र ॥ २२४ ॥
धांवा फोकरीतु = शरण्य शब्दी आव्हाणितु ॥२२५॥

---

१ लाहेचि २ ताहाना

प्र. २० केवळ राजमठ स्तव ओव्या १९

सुरनर पन्नकां : जें वंद्य तीहीं लोकां
तें क्रीडास्थान कैवल्यनाएका : शणौनि या : ॥२७॥
तें योगियांचें मानस : कीं कैवल्य रत्नाची मांदुस :
मज पातां भानवस : परब्रह्माचें : ॥२८॥
तें मोक्षनिधीचे भांडार : कीं विश्वबीजाचें कोठार :
ना तें होंका जे सेजार : पर सुखाचें ॥२९॥
तें श्रीमूर्तिचें देउळ : कीं देवरायाचें राउळः
कीं भवार्णवीचें वेलाउळः मुक्तांचें तें : ॥३०॥
कीं ब्रह्मविद्येचा घरठा : अन्य चोराचा कुरठा :
कीं परमपुरुषाचा वसैठा राजमठु तो : ॥३१॥
सकल सुरादि वरिष्ठु : जो परादि वैकुंठु :
तो परमात्मा होउनि प्रकटु : जेथ सुलभु जाला : ॥३२॥
भणौनि ते वाणितां कवतिकें : वाचे सौरसु न देखें
जऱ्ही मागिजेति मुखें : शेषादिकां . ॥३३॥
सकल शास्त्रां चाळीतां कोडें : ढांडोळितां उपमेचें दळवाडें

---

बेंबिळे चाले = बेभळत चाले । सद्गदीतु = दाटलेनि कठे ॥ २२६ ॥

एवं स्तावकरंकवृत्ति ओंव्या ६ प्र० १९

सुर = देवता समूह । नर = मानवसमूह । पन्नग = नागवशसमूह ॥२२७॥
मानस = हृदय । मांदुस = पेटी । भानवस = पाकनिर्मातिगृह ॥२२८॥
मोक्ष निधी = मोक्षाचा समृद्धि । भांडार = द्रव्य साटविते स्थल । कोठार = धान्य साटवितें स्थल । सेजार = निद्रागृह ॥२२९॥ ॥२३०॥
घरठा = घरटा,ठाय। कुरठा= गिरिकधरा, लपतेठाय। वसैठा=वसता ठाउ॥२३१॥
परादि वैकुंठु = पारकेआ जीवां साध्याचा ठाई वयास कुंठविते, परादि वाचे मर्यादा कुंठविते ॥२३२॥
कवतिके = कौतुके, हरुषे । सौरसे = सुरसा शब्दाचा अतिशय ॥२३३॥
कोड = कौतुक, लळा । दळवाडे = समुदाये । उजियेरी = सादृश्यत्व ॥२३४॥

**जरि पाहतां[1] उजियेरी न जोडे : ते व्हेळि मांडिएली : ।।३४।।**
**ताजुआ निवृतिचा : धडा बांधौनि तीर्थांचा :**
**जरि कांटा कलनाए दैवांचा : जेउता राजमठु : ।।३५।।**
**ते व्हेळि यज्ञव्रत दानें : जप तप अनुष्ठानें :**
**तुका न पुरनीचि पुण्यें : सृष्टीचींही : ।।३६।।**
**थोरिया[2] घनवट : देवाचा क्रीडा मठ :**
**जो भवार्णवाचा सेवट : मुमुक्षुसी : ।।३७।।**
**भवपाश छेदु : जेथें क्रीडे राओ गोविंदु :**
**भणौनि सर्व तीर्थास्पदु : जाला तो : ।।३८।।**
**कीं पंचाननाचा किंसौरु : भणों मार्गपरु :**
**वरि आधिष्ठिला जगद्गुरु · तें परिएसा पा : ।।३९।।**

निवृत्त = कार्मीक वैराग्ये सर्वसग परित्यजौनि समवर्ते तल्लक्षणे ताजवा = तराजू। तीर्थे = कार्मीक शताष्टौ तल्लक्षणे धडा पासागा बांधोनि तरि देवपकीचा काटा कलताए = लवताए ।।२३५।।

यज्ञ = याग। व्रत = तीर्थक्षेत्रोद्देशे उपवास। जप = आत्मोपास्ति। तप = भक्ति। अनुष्ठाने = आगमादि क्रिया। नानापुण्ये तरि ते सरी न पवतीची।।२३६।।

घनवट = जडपण। सेवट = पैलपार। मुमुक्षु = मोक्षेच्छकू ।।२३७।।

भव–पाश = संसार तल्लक्षणे फास = बंधन राओगोविंदु राणे पणे श्रीगोविंद प्रभु, 'गो इदतीति गोविंद'। तीर्थास्पद· तीर्थां आधारभूत, प्रतिष्ठाकारक ।।२३८।।

पंचानन = पाचमुख आहेति जेआं तो। किशोरु = बाल एवं बालनरसिंह। अधिष्ठिला = प्रतिष्ठिला। द्वितीयार्थे–पंचानन = पंचवक्त्र[1] श्री दत्तात्रयप्रभु तेयांचा–किशोरू = शिष्यत्त्वभावे श्रीचक्रपाणि। मग तेणे श्रीचक्रपाणिये। मार्गपरू = श्रीगोविंदप्रभु देवांस ओपिलें। पुनः श्रीप्रभवे–अधिष्ठिला = प्रतिष्ठिला· तो जगद्गुरू = चराचर सृष्टी समूहांचा उपदेष्टा श्रीचक्रधर राओ· ऐसेया श्रीप्रभूचा मठ ।।२३९।।

१ पातां उजिरीआं  २ तो नि-हया

**१–श्रीमान्दत्तो मार्गमूलो मुनीनां तच्छिष्य: श्रीचक्रपाणिर्मुनीद्रः ।।**
**शिष्यस्तस्य श्रीप्रभुराजयोगी श्रीमच्चक्रधरो घ्रतस्य शिष्यः ।। १० ।।**
—आम्नायसार.

**जीए मटीं ब्रह्मगिरे : नांदणूक गौतमीए[1] परे :**
**वरि आत्मारामाचेनि वरें : जीवोद्धरी : ॥४०॥**
**भवावरी पवित्रता : जेथची तीर्थ भूतता :**
**भणौनि तीर्थासि जालें तीर्थ : सेवावया : ॥४१॥**
**शिलामया मूर्ती : जडा उदकांचा तीर्थी :**
**जग झांकौनि प्रवृत्ती : दुरि नेले : ॥४२॥**
**आपेनि प्रतिष्टितें : जियें लोकीं बोलिजेति देवता तीर्थें :**

ब्रह्मगिरेब्रह्मगिरीनामे पर्वत । गौतमियेपरे = त्र्यंबकाहोनिगंगानिगाली । आत्मारामाचेनि वरं = आत्माराम जो महेश तेणे वरू दीधला = महेश जटां त्राहाटौनि गंगा काढाटिली। तेणें ते–जीवोद्धरी = मानवांची पातकें फेडी ॥ २–तेवि मढ तल्लक्षणें ब्रह्मगिरी । नरसिंह तल्लक्षणें गंगा । आत्माराम तल्लक्षणे श्रीगोविंदप्रभु। तेणे–वरू दीह्लला = तेयां मढां संबंधु दीधला तेणे संबध सामर्थ्ये–जीवोद्धरी = अनेकपरी साह्यकारी ॥ ३–ब्रह्मगिरी तल्लक्षणे श्रीप्रभु । गौतमी तल्लक्षणे ब्रह्मविद्या। आत्माराम = श्रीचक्रपाणी राऊळ । तेयाचेनि वर जीवोद्धरी = श्रीप्रभु जीवांतें उद्धरीति " ४– ब्रह्म = परब्रह्म एव श्रीदत्तात्रयप्रभु। तेणे गिरी = ब्रह्मगिरी नामें पर्वती । गौतमी = ब्रह्मविद्या–श्रीचक्रपाणि अवतारां ओपिली । मग श्रीचक्रपाणि राउळे । पर परावाचें । आत्मारामु = श्रीप्रभु अवतारा शक्ती ओपिली । मग तेंही–वरू दीह्लला = श्रीचक्रधरराया शक्ती स्त्रीकाराचा सक्रमणु केला । तेणे जीवोद्धरी = कर्मभूमीस्थित अधिकारी जीवां साधन सपूर्णत्वे उद्धरी ॥२४०॥

भव = भूतसृष्टी । वर = श्रेष्टत्व । पवित्रता = भूतसृष्टीसी पूज्य जाला जो नरसिंह । मग जेथचि = श्रीप्रभुसबंधे करौनि । तीर्थ भूतता = पवित्रता प्राप्त जाला जो नरसिंह. तेणे इतर तीर्थांसि सेवावेया, तीर्थ जाला = पूज्यमान जाला एव श्री प्रभु संबंधे करौनि नरसिंह जो तो इतराचिया तीर्थांसीही वंद्य जाला ॥२४१॥

शिलामया-मूर्ती = पाषाणांचिया, मूर्ती = प्रतिमा । जग = जीवमात्र, मानव । झकऊंनि = झांकऊंनि । प्रवृत्ति = प्रवृत्तमार्गे । दूरि नेले = निवृत्तमार्गा पासौनि परावृत्त करौनि-नरका नेले ॥२४२॥

आपण = जीव देवता ऋषी । पाठ भेदे-आप = उदक तियेस्थानीं जीवें प्रतिष्टिलीं

१ गोमटीए पुरे

**पुनें तें जीयें स्थानें सेवित पुण्यातें : जरि शास्त्र बोलें : ॥४३॥**
**तरि साक्षात्परात्परु : जो सकळ प्रमाणां अगोचरु :**
**तो जगदात्मा सर्वेश्वरूः जेथें राज्य करी : ॥४४॥**
**तीए स्थानिची महिमा : केवि वर्णवे प्राकृता आह्मां :**
**जें आवडलें परब्रह्मा : क्रीडास्थान[1] : ॥४५॥**

प्र. २१ ईश्वराचे विरुद्धाचरण ओव्या १२

**पाहापां आश्चर्य एक : ज वस्तु अगाध अलेख :**
**ते कळि युगीं होउनि मानुख : सुलभु जाला : ॥४६॥**
**पाहापां असमसाहास : जेथ कुंठले निर्देश :**
**तें ब्रम्ह स्वयंप्रकाश : लोकामाजि खेळें : ॥४७॥**
**लिंगत्रयांची विवंचना : विचारितां जीए सर्वस्वीं[2] ना :**

---

जिए तीर्थे । तेणे–पुण्य होय ऐसे इतर शास्त्रे जरी बोलिलेति ॥२४३॥

तरि, साक्षात् = प्रत्यक्षाकार । परात्परू = देवता समूहात पर जी माया तिये पासावही जो पर तो परात्परु = श्रीप्रभू। सकळ-प्रमाणां = शाब्द,प्रत्यक्ष,अनुमान, उपमानादि प्रमाणा, तथा वेदागमादि षड्प्रमाणा । अ–गोचरू = दिसेना, जाणवेना। सर्वात्मा = सकळसृष्टीच। आत्मक धर्म आत्मा । सर्वेश्वर = जीव देवतादि सर्वांचा ईश्वर = नियामक श्रीप्रभु ॥२४४॥

महिमा = स्तुती, महिम्न । प्राकृत = पूर्वकृत प्रकर्षेसी आकळीत मति एवं अज्ञान मतिमंद बलवत् ॥ २४५ ॥

**एवं केवळ राजमठ स्तव ओव्या १९ प्र० २०**

अगाध = गाध रहीत,अत न कळे । अलेख = लक्षितांही लक्षा न ये । सुलभ = सुष्टु लाभरूप ॥२४६॥

अ–सम = जेयां समान दुसरे नाही । साहास = सहस्रावधी लक्षा कोडी परिमितां जयाचेया साहसा उपमा नाहीं । निर्देश निर्धार ।कुंठले = थबकले, राहिले। स्वय प्रकाश = आपणेयां आपण प्रकाशी ॥२४७॥

लिंग-त्रय = स्त्री, पुं, नपुंसक । विवंचना = विचारणा । निरंजनी अनेकें

---

१ क्रीडा करूं २ स्वरूपी

**तेआ निरामया निरंजना : कीं पुरुषाकृति : ॥४८॥**
**विश्व उपजे संहारे : जरि जो निर्विक्षेपु नवी करेः**
**तो दाउनि माया वेषाचें मोहिरें : जेथ चरित्रें करी : ॥४९॥**
**दुर्लभु ब्रह्मादिकां : जें निर्भय असेखां :**
**पाउलें भवमोचका : जोडलें जीए स्थानीं : ॥५०॥**
**जेथ पर सुख साकारपणें : परब्रह्मा परगुणें :**
**परदैवा कें नांदणें : आपुलेनि आंगेः ॥५१॥**
**तें व्यापकु हालें : कूटस्थ चालें :**
**अनिर्वाच्य बोलें : अमृतोपम : ॥५२॥**
**जेथ निरंतरासि रवण : अकर्तेआंसि करण :**
**निर्गुणासि गुणः अलौकीकु : ॥५३॥**
**निराकारासि अवएव : निरुपाधीसि बरवः**
**जेथ निःप्रपंचका सेव्य : निज किंकरीं : ॥५४॥**

---

अजने प्रकाशी ना, श्यामता असेना, अज्ञानत्व असेना, अदर्शन असेना ॥२४८॥

निर्विक्षेप = विक्षेपरहित । मोहिरें = मोहविता ॥२४९॥

पाउलें = श्रीचरण । स्थानीं = राजमढी ॥२५०॥

पर-गुणे = परमेश्वराचे सेवादास्य भजन, श्रेष्ठगुण । आंग-नांदणे = उद्धरण व्यापारा प्रवर्तणे ॥ २५१ ॥

व्यापकु हाले = जो व्यापक ईश्वर तो अवतरावेआ त्रिभागे । कूटस्थ-चाले = जो कूटस्थ ईश्वर तो अवतरौनि मही विचरे । अनिर्वाच्य--बोले = अनिर्वाच्य असौनि तो व्यक्रमंत झाले-या भक्तां ज्ञानोपदेश करी ॥ २५२ ॥

निरंतराशी = सनातनासी ॥ रवण = भूमि = पैसार, एवं राजमढ, । राजमढाचा एकदेशित्वें माचा तेथ शयन । अकर्तेआं--करण = जीवोद्धरणनिर्गुणासी-गुण = मनुष्यवेषे तोष खंती । अलौकिकु = लौकीक मर्यादे अतिरिक्त ॥ २५३ ॥

निरूपाधीसी–बरंव = बाह्योपाधीचा स्वीकार । निःप्रपचका–सेव्य = निःप्रपंच असोंनि पण भक्तीजनांचिए सेवेचा अगिकार ॥ २५४ ॥

परमाणुचेनि पाडें : रोमें लपाली ब्रह्मांडें :
तें परब्रह्म क्रीडे : जिए मठीं : ॥५५॥
असो हें अनादि अविष्ट : जो वाक् चातुष्ट्या अनुच्छिष्ट :
तेणें ब्रह्मरसें राजमठ : देखों सदोदीत ॥५६॥
भणे माझेआं स्वामीचें : क्रीडास्थान श्रीप्रभूचें :
भणौनि दंडवतें निच-नवे : केलें आंगें : ॥५७॥

प्र २२ जीव प्रपंच विवादे ईश्वराची करुणा ओव्या २३

भीतरि अवस्था व्यापिलें : उरके वागिंद्रिय कोंदलें :
दृष्टि आड राहिलें : आनंद जळें : ॥५८॥
गाहळेंलेनि अंतःकरणें : उन्मादवत बोलणें :
जैसा कां गांजिला दे गार्‍हाणें : समर्थासि : ॥५९॥
भीतरि भरलिया उर्मी : भणे आहोजी स्वामी :
कां संसारें गांजिलों आह्मी : तें पुसाना : ॥६०॥
नव्हे आमचा दायदु : जरि भणे तुम्हा मीचि वंधु :
हा वेव्हार कृपासिंधु : आनें तुटेना : ॥६१॥

पाडे = मानें ॥ २५५ ॥

अनादि = आदिरहीत । अविष्ट अविक्रय, आणिका अनावडी उपजवीना । वाग्चतुष्टय–चारीवाचे । अनुच्छिष्ट = वर्णवेना । सदोदीत = सदा + उदीत = जीवा दान द्यावया उतावेळ ॥ २५६ ॥

निचनव = नित्य नूतन ॥ २५७ ॥

एवं ईश्वराचे विरुद्धाचरण ओव्या १२ प्र० २१

उरके = उत्कर्ष । वागिंद्रिय = कंठ, मुख । कोंदले = कंठ दाटले ॥ २५८ ॥

गहाळ = असावध ॥ २५९ ॥

उर्मी = दुःखाचा उमाळा । गांजिले = पीडिले ॥ २६० ॥

दायदु = दा वडिलोपार्जीत धन तयातें अयदु = ग्रहण करिते ।आनें = अन्यें ॥२६१ ॥

१ नवचे २ उन्मत्तवत्

वाढविला आमुचिया माया : हेंचि नातें जी देवराया :
वायांचि बहुता ठाया : भवंडीलों एणें : ॥६२॥
मी तंव अनाथ एकलें : विश्व तंव एयांसि वीकलें[1] :
कव्हणी परत्र पाहौनि न बोले निःप्रपंचु : ॥६३॥
न मनी चौघांचीं उत्तरें : उपवासें नावरे
रिगालों बहुतांचीं घरें : परि न सोडी हा : ॥६४॥
नेणों कवणें लागला कर्में : मेलों वायांचेनि श्रमें :
तुज सर्वज्ञा विचारितां धर्में : कांइ संसारा आति. ॥६५॥
आहाजी भीतरें वीणु : माझें वायांचें माणुसपणु :
लटकें बोले तरि मज आणु सर्वज्ञांची : ॥६६॥
भणाल लवे लागणिचा : तरि मध्यें लटिका वायांचा :
सर्वज्ञ तंव जाणताति आमुचा पूर्वापरु ॥६७॥
अन्योपदेशें सीकवी : नानां मार्गें दाखवी :
आपणचि प्रमाणें आंगवी : बोलिलीं जीयें ॥६८॥

---

माया = प्रकृती । बहुता ठाया = चतुर्विधा कर्मफळः ॥ २६२ ॥

विश्व = चराचर रचना । परत्र = परमार्थ । निःप्रपच = प्रपच रहीत ॥२६३॥

न मनी = मानी ना । चौघांची = चाऱ्ही वेदांची । उपवासे = एकादशादि उपवासे । नावरे = हे मन आवरेना । बहुतांची = सकळां देवतांची ॥ २६४ ॥

नेणों = न जाणो । कर्म = जे केली सता असते, तया मूळसृष्टी कांई कर्में केलीं ते न जाणो । आति = आर्हाति ॥ २६५ ॥

भीतरे वीणु = अंतर आवडी रहीतु । वायाची = वृथार्चा ॥ २६६ ॥

लवे–लागणी = प्रवृत्ति आणि माया, लवे = ईश्वर आणि माया. लागणी = विश्व लवे = पडवी. लागणी = सेजारीची गृह । मध्ये = अष्ट भैरवांचाठाई । लटिका = नाशीवत प्रपंच । पूर्व = मूळसृष्टी । अपरु = सृष्टिरचने पासौनि ॥ २६७ ॥

अन्योपदेश = मत्रतंत्रादि अभिचारक । नाना मार्गे = अनेका देवता यजन बहिर्यागादिक्रिया । प्रमाणे = कर्मवादादि, तथा षड्शास्त्रादि ॥ २६८ ॥ २६९ ॥

---

१ वीटलें

भणतां बहुती परी : न एचि राउळीचा ठाओ वेन्हीं :
आतां कांइ करणें या वरि : तरि सर्वज्ञ सांगतु : ॥६९॥
परि हे लटकी विनवणी : जाणते देवाची खावणि :
कां ह्मणाल मेलेति गुणी : आपुलांचि : ॥७०॥
एकादे[1] आमुचे : जरि आदरें सी तुझ्ना रुचे :
तरि प्रतिभव वायांचे : कां देखाल एवढे : ॥७१॥
परी करणीया अकरणीया न देखा : आपेंपरु नोळखा :
वायांचे विषय लोकां : होत आहां : ॥७२॥
आह्मी ह्मणतां ही पुडुती : न संडींचि हे प्रकृति :
परस्परें द्वेशें अधःपातीं : पडलेति जियां : ॥७३॥
तेथ हांजी भणौनि प्रतिभवीं : आह्मी सर्व अपराधी जीवीं
तुज सारिखा गोसावी : वंचिला[2] : ॥७४॥
सकल समृधिवंतु बापु : असतां उदार सकृपु
कीं मी जीतुसें पापरूपू : नांवें आणिकांचेनी : ॥७५॥
आहोजी परिसा[3] पां पाइकु : जरि हाये स्वामि वंचकु :
ऐसा गोसावी कवण आणिकु : जो आपुला भणे : ॥७६॥
तूं कृपाळु माउलीः न भणासि परावीं आपुलीं :
तुवां जन्मौनि पोसिलीं : भूत जातें : ॥७७॥

खावनी = मनोधर्म ॥ २७० ॥

प्रतिभव = वारंवार सृष्टी येणे जाणे ॥२७१॥

करणीय = विधिवाक्य, आज्ञापक । अकराणेयें = निषेधवाक्यें । आपे-परू = जीवा, परमेश्वरा । विषय = देवतासाधनें आभिरत ॥ २७२ ॥

प्रकृती = देह संबंधीक रजस्तमे । अधःपात = खालीं पडिलेती ॥ २७३॥ २७४

सकृपु = कृपेसह वर्तमान ॥ २७५ ॥ २७६ ॥

कृपाळु = कृपेचा आलय । जन्मौनि = सृष्टी ज्ञान देऊनि । भूतजातें = जीव मात्रें ॥ २७७ ॥

१ म्हणतीले  २ दुरावीला  ३ जेवण खाउनि

आधीनु प्राक्तनां . अनेगी जन्मजाचना :
मज भोगितां भव यातना : कीं सलतीति जे : ॥७८॥
स्वर्ग निरय वसवीतु : के मी सोच्य प्राकृतु :
तेआ माझेनि तूं व्यसन भूतू : स्वात्मारामु : ॥७९॥
लेंकरूंवाचेनि दुःखें : जेवि माउली उभी सुकेः
तेवि तूं जगदंबिके : मज लागौनि : ॥८०॥

प्र. २३ जीवेश्वर भिन्नत्व दर्शक ओव्या १२

आहोजी आइका : केउता संबंधु रायां रंका :
ना तरि कृपाळुवांचिया सोइरिका : निमित्येंवीण : ॥८१॥
देॐ आत्मरमणु : मी कामबाणीं विच्छिन्नु
देॐ सकुळ सुरशरण्यु : मी हीनु बहुतें पाडें : ॥८२॥
देॐ निजानंदें तृप्त : मी क्षुत्पिपासीं ग्रस्तु :
देॐ अगाधु अलेखु अनंतु : मी अती सोच्य : ॥८३॥
देॐ परावर नायकु : मी अनादि प्रणीतु रंकु :

---

यातना = निरय दुःख–या–प्रापने, तन–विस्तारे । सलती = सलताती ॥२७८॥

सोच्य = शोकावया अर्ह ॥२७९॥

माउली = माता । सुके = वाळे । जगदंबिके = जगत् + अंबिके = जगन्माते ।२८०॥

**एवं जीव प्रपंच विवादें ईश्वराची करूणा ओं० २३ प्र० २२**

केउता = कोण्हीकडे । राया रंका = परमेश्वरा जीवा ॥ २८१ ॥

काम बाणी = मदन शरीं । विच्छिन्नु = विशेषेसी छेदिला । देव = परमेश्वर सुर = देवता । शरण्य = शरणागताते रक्षिता ॥२८२॥

क्षुत्पिपासी = क्षुधा तृषी । अगाध = आद्यन्तमध्य कळेना । अलक्ष = लक्षवेना ॥ २८३ ॥

परावर = पर + अवर । नायक = नियंता एवं परदृश्य, अवरदृश्य, उभय - दृश्य परमेश्वरावतारें । प्रणीत रंक = प्रकर्षेसी रंक = दीन । चैतन्या–पर = माये

देवो मायापर एकु : मी नाना वस्य तीए : ॥८४॥
देउ परात्परु तरु : मीं अधोगामिया निरंतरु :
देउ पूर्ण सुखसागरू : मी दुःखग्रस्त : ॥८५॥
देउ अप्रमेयू अनिर्वाच्यु : मी अल्प जीव शोच्यू :
ऐसाही दीनु वंच्यू : कहीं नव्हेंचि तुज : ॥८६॥
असमाना अद्वैता : केवळा घनीभूता :
तुज प्रभु पाहुनि केउता : मीं जीवु : ॥८७॥
उच्छळिंध्र आणि पूर्णचंद्र वच्छपद के समूद्र :
पंचानन आणि दर्दुर : जेणें पाडें : ॥८८॥
शरभा आणि सुपर्णा : का रासभा आणि ऐरावना :
पाड कां जैसा हरिचंदना : पुष्करेसीं : ॥८९॥
परमाणु के सुवर्णाचळु : चिंतामणिसी हरळु :
दैत्य गुरु पाहुनि उजाळु : कांइ शुक्तिखंडे : ॥९०॥
चक्रवाहा कां देवेंसी : केंवि कुलाळा करूं सरिसी :

---

परोता । नाना--वश्य = नाना कर्मफळी, देवता भोक्तृत्वस्थानीं ॥ २८४ ॥

परात्पर = पर + आत + पर. पर = माया. तियेचा आत् = ब्रह्म. ब्रह्माचाही पर = अव्यक्त-स्वरूप । अधोगामिया = अध = निरय. तेयांकडे असत्कर्मे गमन करिता ॥ २८५ ॥

अप्रमेयु = प्रमेयरहीत । अनिर्वाच्यु = वाचे अर्ह नव्हे । अल्प = साना । वंच्यु = कृपणु । एवं तुझिआं विधी आचरणीं अर्ह नव्हेची ॥ २८६ ॥ ॥ २८७ ।

उच्छाळिंध्र = भूमिछत्र । वच्छ-पद = वासरुवांचा पदोदक. एव वासरुवें पद खळग्यांतील साभावलेले पाणी । पचानन = सिंह । दुर्दर = बेडुक ॥ २८८ ॥

शरभ = टोळ । सुपर्ण = गरुड । रासभ = गर्दभ । ऐरावत = स्वर्गातील हस्ती । हरिचदन आणि पुष्कर = एरडा कांई-पाड = कांई साम्य असे ॥ २८९ ॥

के = कोठें । हरळु = गारेचा खडा । दैत्यगुरू = शुक्र । उजाळु = प्रकाश । शुक्ति-खडा = सिपीचे खांड ॥ २९० ॥

चक्र-वाहा = विष्णु तो सुदर्शन-चक्र-धारक आणि कुलाल = कुभार तोही

तेवि तूं जगदात्मा हृषीकेशी : पाहुनि मी जीवु कांई : ॥९१॥
ऐसा अपाडेंसी हीणु : भवपाशबंध दीनु
निर्दयो निष्ठुरु कृतघ्नु[1] : सर्व दोषिया : ॥९२॥

प्र. २४ आत्मनिर्वेद संवाद भूत ओव्या ५८

तापासि सांटवणें : जाला दुःखासि विसंवणें :
आहो अमंगळा आंगवणें : होउनि असे : ॥९३॥
इंद्रियांचें खेळवणें : रजस्तमाचें नांदणें
जगीं पापेंसी साजणें : मजचि एका : ॥९४॥
विषयांसी परम प्रीति : कामक्रोधां स्थीति :
सावएव अविद्येची मूर्ति : जन्म माझें ॥९५॥
ऐसा कृतघ्न अनादि : पापिया सर्व अपराधी :
जे कणव करुणानिधी : उरवीचिना : ॥९६॥
जैसें अंतेजाचिए गृहीचें : श्रोत्रियां उपयोगा नवचे :
तेवि मज अधमाचें : जीणें तुज लागौनि : ॥९७॥
कीं आव्हाटी म्हैसवा थरु : नव्हतां दृष्टी गोचरु :
तो जेवि भूमिभारू : होउनि असे : ॥९८॥
तेवि मी पाषाणु न शुद्धा : न घडे न मंडे विण श्रद्धा :

---

चक्र-वाहक = चाकावरी भांडी निर्मिता पण नामसादृश्यत्वें साम्य असें कां ॥२९१॥
अपाड = असमान । निर्दय = दयारहीत । निष्ठुर = कठीण । कृतघ्न = उपकार हता ॥ २९२ ॥

एवं जीवेश्वर भिन्नत्व दर्शक ओ० १२ प्र० २३.

सांटवण = साटवितें स्थल । विसवने = विश्रांति घेणे ॥२९३॥
इंद्रियांचे खेळवणे = इंद्रियां अधीन होणे । साजणे = सजनत्वे महवास ॥२९४॥
स्थीति = वसती । अविद्या = ममता तथा आविधी ॥२९५॥ ॥२९६॥
अंत्यज = अंति जिआला जो एवं मातंग । श्रोत्री = अग्निहोत्री ब्राह्मण ॥२९७॥
आव्हाटी = आडमार्गी । म्हैसवा = पाषाण जातिचा ॥२९८॥

---

१ न्यूनु

**उपयोगा नवचेचि प्रसादा : तुमचेया[1] : ॥९९॥**
**अंधकारा घनीभूता : सुभर हृदय गर्ता :**
**अंतष्करणें देखे जेवि आतां : श्रीचरण श्रेणि : ॥३००॥**
**तुझेनि स्नेहवशें : वीण माझिए दशे :**
**ज्ञानदीप न प्रकाशे : कव्हणीं काळीं ॥१॥**
**जी तूं भवतम शत्रु : उदयो करिसी जगन्मित्रु :**
**कीं मीं जात्यंधु विचित्रु : जो करस्पर्शीहि नेणें : ॥२॥**
**तूं सुखपूर्ण मयंकू : मीं विरहिया विशेषु :**
**तूं जीवपति मीं वंचकू : व्यभिचार्या : ॥३॥**
**तूं राओ मीं योगिया : तूं तापसु मीं भोगिया :**
**तूं अन्नदाता मीं रोगिया : सदा अरुचि : ॥४॥**

---

न घडे = घडवितांही घडेचिना । नमडे = पूजेलागि प्रतिमा करून माडण्यास योग्य नव्हे । श्रद्धा = आवडी । प्रसादा = प्रसन्न दान घेआवेया योग्य नव्हेची ॥२९९॥

घनी भूता = निबड होतसाता । गर्त = गार, थोर खळगा ॥३००॥

स्नेह = तेल । दशे = वात ॥३०१॥

भव = तम, अधकार । शतृ = विनाशकरिता । उदयो = अवतार धारणे, ज्ञान दातृत्व । जगमित्र = सूर्य । जात्यध = जन्मांध । करस्पर्शीहि नेणें = गजस्पर्श दृष्टांत[1] इव ॥३०२॥

मयक = चंद्र । व्यभिचार्या = क्षणभंगिन, आज्ञाभगिता ॥३०३ ॥ ३०४॥

---

१ राउळांचिआ

---

१ एक स्तंभसरूपमाह करिणं कूलाकृतिं चापरः सूर्प्याकारमितीह बद्धय करिणोप्येकैकमंशं तदा ॥ जात्यंधेषु विवादभाजिषु यथा नेषां च चक्षुः स्थितिं कृत्वैकैक गजांशतः समवद् त्तस्य स्वरूपं परम् ॥५०॥ ईशस्यामितशक्ति संयुत तनो रेकैक शक्ति तदा जानंतः प्रवदन्ति तां परतया सिद्धान्तभेदास्पदां । विश्वात्मा विषयप्रदान चतुरः कृत्वाखिलस्य स्थितिं विश्वातीतमनन्य गोचर तया सं प्राह त सश्रये॥५१॥ श्रीकेशवराजसूरी कृत दृष्टान्तस्तोत्र.

**अवेंचु अमोघ सिद्धो : तूं प्रकट कृपानिधी :**
**कीं मज दैवहता बुद्धि : विषइं[1] अंधु : ॥५॥**
**तूं पांथ तापस छाया घनु : होसि पर मार्गीचा संतानु :**
**कीं मीं पथ चुकौनि अज्ञानु : पडे अन्यमार्गी : ॥६॥**
**तुवां परम पुरुषें : याचिजे शरिराचे चोळाखे :**
**कीं मीं कृपिणें प्राङ्मुखें : होउनि वंचिजे तुज : ॥७॥**
**झाडे वेधेति वरवे पणें : सौंदर्यें नटसी मज कारणें :**
**कीं परश्री संतापाचेनि सा दूषणें : मीं अधिकाचि जळे : ॥८॥**
**कृपावशें दोन्हीं : होसी जनकु जननी :**
**कीं आपठौळ आज्ञा पाळनीं : मीं स्थीर नव्हें : ॥९॥**
**बीजें करितां चुकवी : न व्हायें दृष्टीचिए अळवी :**
**आतां कवण एक आठवी : अपराधु आपुले : ॥१०॥**
**गोसावी तरि ऐसे : पाठी धांवति आपैसे :**
**धेनु जेवि वोरसें : वच्छा लागौनिया : ॥११॥**

---

अवेच = वेचरहीत । अमोघ = फलप्रद, एव निर्फल न वचे। प्रकट = प्रसिद्ध। निधी = इच्छितवस्तु प्रसवकारक ॥३०५॥

पांथ = पांतस्थ । ताप = तातले । छाया घनु = निबिड साइली । संतानु = वटवृक्ष । अन्यमार्गी = अन्यदेवतामार्गी ॥३०६॥

चोखाडे(?)=आंगरखे, स्त्रियांस--चोळखण। प्राङ्मुख=पूर्वेस मुख, विन्मुख ॥३०७॥

नटसी = अग्रगणी घेसी, मा‌ग घेसी । परश्री = परावयाची लक्ष्मी, उत्कर्ष । सा दूखण = पेटवण, चेतवण ॥३०८॥

आपठौळ = मार्गाचा चाहटळ गुडा, एव आज्ञा भंगिता, अठवर घोडा, अपगंड एव विधी अविधी नेणता ॥३०९॥

बीजे करितां = गमन करितां । अळवी = सन्मुख न राहे ॥३१०॥

ओरसे = उत्साह ॥३११॥

---

१ विषया कडे.

आनंद तरुचे आरव : सुखफळीं फळति सदैवा :
संसार ताप तप्तां जीवां : विसंवणें जें ॥१२॥
तैसे जी धरौनि अवतार सैरा : पाठीं लागौनि उद्धरा :
केला परसुखाचा मोकारा : जीव पशुवा : ॥१३॥
बाप कणवेची व्याप्ति : दाऊनि सुंदरा श्रीमूर्ति :
कीं जडा वेधु उपजेती : देखिलेआं ॥१४॥
नवल लावण्याची थोरी : कांई भणों नरनारी :
नपुंसका प्रमाचा विकारी : राउळहि भुले : ॥१५॥
जरि अमृत घालुं आंधणा : कापुरु मेळउ इंधना :
ऐसें कांइ बोलौंए परिवाणा : जवितेया : ॥१६॥
चक्रवर्तिचा संभोग चिन्हा : पात्र नव्हति राजकन्या :
तो सेन पुंजीचिया मना : कांइ भाऊ ये : ॥१७॥
चंद्र आपुलेनि उन्मेषे[1] : जो पदार्थ न तर्कें :
तो जाति अंधाचेनि मिषें : कांइ देखिजा होए : ॥१८॥

---

आनद = तल्लक्षणे अव्यक्त । तरु = तल्लक्षणं व्यक्तावतार । ताप तप्तां = त्रितापीं तप्तां जीवां । विसवणे = विश्रांतिस्थल ॥३१२॥

सैरा = स्वेच्छावशे । मोकारा = मोगरसूल ॥३१३॥

जडा = मानवेतरांसीही श्री मूर्ती देखावयाची आवडी उपजे हें आश्चर्य ॥३१४॥

नवल = आश्चर्यकारक । नपुसक प्रेमाचा = प्रेम हा शब्द नपुसक तयाचा अधिकार असे जयाचा ठाई ॥३१५॥

इंधनां = सर्पणा, जळवना । परिवाणा = षड्रसान्नां । जवितेआ = भोजन करितेया ॥३१६॥

इये ओविये वाच्यार्थाहून भिन्न ईश्वरप्राप्तिभेददर्शक सांप्रदायार्थ जाणावे--अष्टविध सभोग कळायुक्त । सेनपुंजी = सेन जमा करणारी । भाऊय = कल्पोये ॥३१७॥

उन्मेषे = प्रकाश समृद्धि करूनि । जो पदार्थु न तर्के = चदणआंचेन झांवळत्वें पदार्थत्व न दिसे । येथे जात्यंध, चद्र, पदार्थ वाच्यार्था भिन्न असे ॥३१८॥

---

१ उन्मीषे

**जेयाचि वाहाणा : चिंतामणि खेवणा :**
**तेथ बोरे आंचिया गुणा : रूप कैचें : ॥१९॥**
**उपेणें करितां कुसुमाकरां : झाडे वेधेति श्रृंगारा :**
**तेथ कोकिळांची पांति दर्दुरा . केवि लाभे : ॥२०॥**
**चंद्र चकोरा चोखटीं : वोळे अमृतधारीं आतुटी :**
**तें गोडपणें पाणकुकुटीं : लाहिजे कैसा : ॥२१॥**
**तेवि तुह्मा जी स्वामी प्रकटलेया कर्म भूमी**
**परसुखा लाहो कांइ आह्मी : जे दैव हता : ॥२२॥**
**देॐ वितरण जीमुती · पृथ्वी करी अनार्ती :**
**कीं माझिए क्षेत्र वृत्तीः नोडवेचि निकीं ॥२३॥**
**पाहालिया सृष्टीचिया पाहाटा : प्रमादु नए चि सेवटा :**
**जो मज विषय लंपटा : जोडतु आहे : ॥ २४ ॥**
**स्नेह प्रतिभवीं : दीधलें ज्ञान तुवां मीं हारवी :**
**जरि तूं करुणाळा गोसावी : भणौनि विटसी ना : ॥२५॥**

---

वाहाणा = पादत्राणा । खेवणा = रत्नजडिता । बोरा = सामान्यखडा ॥३१९॥

उपेणे = जाणे । कुसुमाकरा = पुष्पखाणि, एव वसतऋतुवत् । कोकिळा = कोकिळ पक्षी पचमालाप करी । तया पुढे- दुर्दरा = बेडकाचे ओरडणे ते कोठे ॥३२०॥

चोखटी = निर्मळ । आतुटी = अखंड । पाणकुकुटी = पाणकोबडी । तद्वत् एवं ईश्वर प्राप्तिह्लाहते ते चकोरवत्, अमृताखंड तो अखडानंद तशा प्रेमी सत्पुरुषा देखून, मी स्तावक पाणकुकुटवत् कोठे लागे ॥३२१ ॥

प्रकटलिया = अवतरलेया ॥३२२॥

देव वितरण = देव अवतरलेयाही । जीमुती = मेघ । नोडवेचि = न + ओडवेचि = न प्राप्ति होयेची । एव देवसृष्टीमध्ये मानववेषें प्रकटिला परि माझा अधिकार फळा न येची ॥३२३॥

प्रातिसृष्टी निर्माण जालिया आणि ईश्वरे पुन्हः पुनः ज्ञान दीधलेयाही, सेवटा = प्रमादखंडेचिना कां मी विषयलंपट म्हणून ॥३२४॥

स्नेहे = ममते । प्रति-भवी = प्रतिसृष्टी ॥ विटसी ना = अव्हेरिसीना ॥३२५॥

कैवल्यकें कर्मभूमि : आकारें होजी स्वामी :
बीज करितां तुह्मीं : कां उबगाना : ॥२६॥
ऐसें या अमंगळा कारणें : कांजी संसारी केलें पेणें :
तुज परसुखाचेनि सीणें : कें रिगिन आतां : ॥२७॥
सर्व निरइं सर्वदा : पचीता न्हविजे शुद्धा :
स्वामी जें पाप प्रमादा : तंव जोडिलें मिया : ॥२८॥
केवी आंगवण दुखा नाहीं आपणपें अंतका :
एन्हवी स्वामि दुन्हा जनिका मीं केवि उरे : ॥२९॥
कीं ना स्वामि वंचक : हे कुणप त्री-धातुक :
अपवित्र भणोनि आइकें : काळही नातळे : ॥३०॥
कीं आगाधा परसुखा जीवु होउनि विमुख निदैवु :
कीं सेवीतुसे विपयलवु : गोड भणोनि : ॥३१॥
कांई अवेंचु सुहावा देवा पाहोनि विपयो वरवा :
जो अनादिया जीवां : आवडतुसे ॥३२॥
जैसी अनरूढा रूपवंती देखोनि वेधे चक्रवर्ति :
जरि ते वरूजाए पति : पामरु जगि : ॥३३॥

---

केवल्य स्वरूप आणि कर्मभूमी येता जाता त्रसमानाचि ना ते का ॥३२६॥

पेणें = येणं । सीणें — श्रम ॥३२७॥

सर्व—निरयीं = सकल नरकाचा ठाई । सदा = सर्वकाळ । पचिता = पाकवरदुःखें भोगितां । पाप = कार्मिक अमत प्रमाद = ज्ञानोत्तर न अनुसरणे, अथवा अनुसरूनही अनुज्ञा भंगोनि विषयां टेकणे ॥३२८॥

अंतका = यमराजा ॥३२९॥

कुणव = देह । त्री--धातकू = वातपित्त कफादि, रजस्तमसत्वें । नातळे = आतळेना. न + आतळे = नातळे ॥३३०॥

लव = अल्प ॥३३१॥

अवेंचु = वेंचरहीतु । सुहावा = सुष्टु हावाव रूप । सुखावा = सुखकारक । अनादिया = आद्यकाळापासून ॥३३२॥

अनरूढा = कुमारिका स्त्री । पामर = मूर्ख ॥३३३॥

नातरि उद्यानिचेआ फळां च्यूत द्राक्षादि रसाळा :
वरि बैसोनि काउळा : पाहे मांस्माहारु । ॥३४॥
रत्नप्रभेचेनि कोडें : मेढिया शृंगारीति भारुडें
राजवल्लभें पांगुरविलें वेडें : नेणे सुख विशेषु : ॥३५॥
तेवि मिआ सगुणें लाधलीं नरदेहाची पांगुरणें :
जरि एकहि गाउळीं पाए पुसणें : भणौनि नेदीचि तुज ॥३६॥
नवां ठाइं तडुकलें हे पांच पुडें आंगुलें ।
माया मज कोडें दीधलें । बहुतां दीसां : ॥३७॥
तेही आपुलिए चाडे । इंद्रिए ओढीति विषयाकडें :
सेवटीं होए तापा वरिपडें : दुःखाग्नि माजि ॥३८॥
जें हि मारिला शब्दें । एकाचेनि आंगलगेंचि वेधें ।
रसाचेनि मीषें न सुखें । विषयें सृति ॥३९॥
कैसी रूपसें का मानें : जीवा घालीति देखणें

---

उद्यान = लावणीचें बन । च्यूत = आंबा ॥३३४॥

प्रभा = दिसा । कोडें = कौतुक । भारुडें = धनगर । राजवल्लभ = रायायोग्य वस्त्र ॥३३५॥

सगुणें = गुणसह वर्तमान, तथा गुण तच्छणें तंतु तेन विणिलें = आर्जिलें॥३३६॥

नवाठाइं तडकलें = नवाइंद्रियांची छिद्रें । पाच पुडें = पचभूत, पचवर्ण । आगुलें-माया = चैतन्य ते मूळसृष्टी आणि प्रवाहिकी सृष्टी जो देहाभिमानीनि तेचि माय तेणें आंगडें = हा देह। कोडें = कवतिकें। बहुता दिसा = मनुष्यदेह हा केतुलेनि एकेकाळे दिला ॥ ३३७ ॥

तेही = इंद्रियेंही । चाडें = स्वार्थे । विषयाकडे = जड चेतन पदार्थाभिलाषा येउतें । तेणें-दुःखाग्निमाजी = दुःख + अग्नि दुःखाग्नि निरयभोगामाजी पडे ॥३३८॥

जेही = करण इंद्रिये । शब्दें = रजस्तमरूप श्रवणें विंधिला । रसाचेनि मिखें = जिह्वेंद्रिये षट्रसाचेनि निमित्यें । विषयें सृति = विषयें अर्पितां ॥ ३३९ ॥

कैसी = दृष्टी। रूपसें = नेत्रेंद्रियें रूप विषयातें। का मानें = केवळ देखणेंमात्रेंचि ।

---

१ आपुला आहारु २ विषचि

**परिमळा भीतरि देउनि घ्राणे   नागविला : ॥४०॥**
**ऐसीं पाचवटें जवळिक   करूनि वाहावीति अभिलाषें**
**मनहि चंचळ वादुकें   नव्हेचि आपु   ॥४१॥**
**माझेनि आंगलगे मासी : वैर चाळीति अहर्निशी :**
**मीं माणुसचि नव्हे या थरासि · कांइ नाणीतीचि इयें · ॥४२॥**
**कैसी अनादि इंद्रियें   प्रकटली चोरिए :**
**मज निद्रिस्थातें खाणोरियें · लुसौनि नेति   ॥४३॥**
**राहुनि तारुण्याचां घाटी : मार्गु लुसीजति इंद्रियें तुटीं :**
**मग जीवा वरिए सेवटीं : व्यसन यांचें   ॥४४॥**
**ऐसा अज्ञानु अनाथु बापुडा : पडिला भवखुडा ·**

घालिती = निरयामार्जा लोटिती । घ्राण = नासिकेंद्रिय । परिमळा भीतरी = भीतरी परिमळ घेऊनि जीवा । नागविले = सुकृता पासोनि दुरावविले ॥ ३४० ॥

पांच वटे = पाचेही इंद्रिये एकवटे होऊनि तथा पाचवट = पाच मुख्यतस्कर एकवटोनि । मन--तल्लक्षण भूपाल । इंद्रिय तल्लक्षण तयाचे भृत्य । वाहवती = सैरा धांवती । मनहि चंचल = चपल । वादक = वादी, दर्दी । नव्हेचि आपु = आपुलेनिपणे स्थीर नोहेची ॥ ३४१ ॥

माझेनि अंग लगे = माझे आंगि राहोनि । मासि = मजसी । रात्रदिवस वैर करितांति । मानुखचि नोहे = मनुष्यदेही असोनि परि मनुष्यत्व ज्ञानेवीण व्यर्थ घालवीति । थरासी = सेवटांसी आणिती ॥ ३४२ ॥

अनादी = आपुला आदि न विचारिती अनीति अशी । मज निद्रिस्थाते = अज्ञान व्यवस्थिताते । खाणोरी = दरवडा घालोनि । लुसोनि नेति = लुटोनि नेति एवं वैराग्यादि सुकृताते हिरोनि नेति ॥ ३४३ ॥

मनासह इंद्रिय तस्कर-तारुण्याचा घाटी = योवनावस्था अत्यंत कठीण घाट तिये घाटी-लुसिजेति = सर्वच लूटिले जातांति । तुटी = दांगट । परंतु सेवटी निरयभोग ते । जीवा वरिये = जैसे सदर्थीचिए ग्रामे चोरि होय ते तेथील अधिकार्यावरी ये तेसे जीवां भोग जाणावे ॥ ३४४ ॥

भव--खुडा = भव--संसार तल्लक्षण खुडा = गारी, खंदक । मागीला-सुडा =

**तया मागिला सुडा झोंबेनु आतां ॥४५॥**
**रीगौनि वैराग्य वळनी मळोनि विवेक सांगुणी :**
**मग अवचीर्ता घालूं घालणी इंद्रिए ग्रामीं : ॥४६॥**
**इंद्रियां माराची सर्वे एकें घालु पांति रातिवें :**
**तेथ ब्रह्मचर्याचिए सौरियें केंवि पुरवति ये ॥४७॥**
**शमदमाचा स्वर्ग घातु : कवण साहोसके तयांतु :**
**जें आपें आपें सांडुनि मन्मथु : वस्य नोहे ॥४८॥**
**सरळ स्वासांचा वारा अनुतापु वैश्वानरा**
**उद्धवतु इंद्रिए जोहरा : आंतु कवण वांचे : ॥४९॥**
**ऐसेआं मनोरथ सृष्टी : करूनि दंडवतें उठी :**
**तंव रचना देखे गोमटी : राजद्वारीं : ॥५०॥**

---

पूर्वार्जिकत्वाचेया सुडा फेडावेया । झौंबेनु = प्रवर्तेनु ॥ ३४५ ॥

रीगौनि वैराग्य वळनी = वैराग्यतल्लक्षण ओहळां रीगोनी । मिळोनि विवेक सांगुणी = विवेकतल्लक्षणे-सांगुणी-अनेका शस्त्रांत मेळऊनि । मग इद्रियग्रामी अकस्मातु घालिनी घालू ॥ ३४६ ॥

माराची = मदनाची । रातिवे = अज्ञाने तल्लक्षणे निशाचा टाइ । ब्रह्मचर्याचिये शौरिये = ब्रम्हचर्य तल्लक्षणे शूरत्वे-इंद्रिये । केवि पुरती ॥ ३४७ ॥

शम = अतर निग्रह । दम = बाह्याविग्रह तल्लक्षणे-स्वर्गघातु = असिधाररूपी व्रताचेआ आघातांते । कवण साहो सके तयांतु = तेयां इद्रियसमुहांतु । मग मन्मथ = मदन आपसेयाचि वश्य नोहे कां ना वश्य होयेची ॥३४८॥

सरळ स्वासांचा वारा—एवं निर्वेदे स्वास घालितां तो संतप्त होये । मग अनुतापु वैस्वानराग्निवत् । उद्धवति = प्रज्वलति । जोहरा = लाखाजोहरवत् जळतां मग कवण इद्रियें वाचे एवं ईश्वरविषयैक निर्वेदानुताप स्मरणे सकळैही वशीभूता होती ॥ ३४९ ॥

ऐसिया परीचेआ--मनोरथ सृष्टी = अतःकरण विवेक समूहेसि उठी । तंव-रचना = उभारणी । गोमटी = पवित्र देखे ॥ ३५० ॥

**एवं आत्मनिर्वेद संवाद भूत ओं० ५८ प्र० २४**

प्र. २४ राजमठ पटिशाळेचे खांब वर्णन ओव्या ५

**कृपा कटाक्षाचेनि उ्ले : पाषाणां कोंभ फुटले**
**तैसे स्तंभु मीरवैले : पटिसाळेचे : ॥५१॥**
**कीं देवांचा प्रासाद गहनु[1] : भणौनि माथां वाहाति स्थानु :**
**अंगीकृत तमोगुणु : निरसावेआ : ॥५२॥**
**कीं आत्मजाची थोरी : देखौनि सौरस भीतरि :**
**आपण तटस्थ द्वारीं : पातले ते : ॥५३॥**
**नातरि आर्ता परिहारें : दावीति पाषाणाचीं शरीरें :**
**जे सांडिलेया ईश्वरें : पडतीचिना : ॥५४॥**
**संबंधु दीधला देवें भणौनि लागती वाणावें :**
**ते खांब नमस्करूनि आघवे : देखे भीति भंगा : ॥५५॥**

---

कृपाकटाक्षाचेनि उ्ले = एव श्रीप्रभु सर्वज्ञाचेया कृपादृष्टि वा तल्लक्षणे ओले करूनि । स्तंभ = खांब ॥ ३५१ ॥

प्रासाद = राजमठ । गहन = अतरहीत । माथां = मस्तकीं । वाहाति = धारिला । स्थानु = खांब, दाहात्रा रुद्र । आंगिकृत तमगुण--तेणे जडत्वी भोगाचें कर्म-लेप ते । निरसावया = नासावया, महेश आपुला क्रोध नासावेया दोनिरूप = स्त्री-पुरुष ऐसी धरिली ॥ ३५२ ॥ आत्मज = नृसिह तो खाबांतून उद्भवला यदर्थीं आत्मज । थोरी = प्रतिष्ठा । सौरसु = अष्टभावी पूजन देखौनि तेणे साश्चर्यत्वें तटस्थ होउ्नि उभे ठेले अथवा ते खांब होउ्नि श्री-प्रभुचा सहवास घडावेया मढाभीतरीं आले ॥ ३५३ ॥

अथवा = अथ पूर्वे, वा = नूतनार्थे । आर्त पुरुषा कारणें परिहारु करावेया लागी आपुलाली पाषाणरूपे दाउ्नि ऐसे जाणवीति जे ईश्वर वियोगेंही परि आम्ही मरोंचिना ॥ ३५४ ॥

स्तावक म्हणतो कीं या खांबास ईश्वरावतारें प्रसन्नता मनोधर्में संबंध दीधला म्हणून याचें वर्णन करो लाभे आणि तेया स्तंभा नमस्कार करुनी पुढती भीतभंगा वाणौं ॥ ३५५ ॥

---

१ ग्रहणु.

प्र. २६ भीत भंग वर्णन ओव्या ६

**ते उचतरि ऐसे : मांडिले दैववशें**
**कीं देवाचेनि श्रीकरस्पर्शें : थेरावले : ॥५६॥**
**कीं सकळ सीधांता गूढ : ते परावस्तु[1] कोंवि उघड :**
**भणौनि आपण राहिले आड : तदा काळीं : ॥५७॥**
**पापभारें चांचल्यें पूर्वी : ते येथ येउनि उर्वी :**
**कृपा दृष्टी निहाळुनि : गोसावी स्थीर केली : ॥५८॥**
**भूत भविष्य वर्तमानीं : अभय दीधलें मेदिनी :**
**श्री करस्पर्श मीं मानी : पाठि थापटिली : ॥५९॥**
**कीं स्वसंवेद्याची खुणे : आंतु कवणु जाणें :**
**जे अगणीते गणने : रूप कीजे : ॥६०॥**

---

**एवं राजमढ पठिशाळेचे खांब वर्णन ओं० ५ प्र० २५**

मांडिले = जेणे रायें नृसिहा कारणे मढ उभारिला तेणे मांडिले । ते पाषाणाचे असतांही--श्रीप्रभुचेन करस्पर्श संबंधे साधना वंदावया श्रेष्ट असे जाले ॥ ३५६ ॥

गूढ = गौप्य । तदाकाळी = सन्निधान-समई ॥ ३५७ ॥

चांचल्यें = चपलत्वें । पूर्वी = श्रीप्रभु अवतार क्रीडा आधीं । उर्वी = पृथिवी । ते आपुले गाऱ्हाणे सांधौं आली म्हणून श्रीप्रभवे येउनि कृपादृष्टी देखौनि उर्वी शातउनि स्थीर केली ॥ एवं राजमढ तळवट भूमिचें वर्णन केले ॥३५८॥

गत भविष्य वर्तमान तिहिं काळी तुझा स्पर्श करोनि मी जगा वंदनायोग्य करीन ऐसें ईश्वरे वदौनि भूमीची पाठी थापटीलि ऐसा स्तावक । मीं-मानी = म्हणतो ॥३५९॥

संवेद्याची खूण = स्वयंजाणता जो श्रीप्रभु तयाची प्रवृत्तीसी कवण मानव केउता-जाणे । अगणिते गणने = अगणिते असौनि परिगणने = एव अनता जीवांची अविद्या छेद करीति ऐसें असतांही परिगणने = नित्यप्रति साठीं जीवांची अविद्या नाशिती । रूपकीजे = ईश्वर मुखवाक्ये १०।२०।३० ऐसें गणनेया रूप—निश्च-येसी बोलेति ॥३६०॥

---

१ परब्रह्म

**श्री मुखें अनुवादु : संख्या करीति गोविंदु :**
**तो नमस्करूनि संबंधु . विसेखांचा : ॥६१॥**

प्र. २७ राजमढ द्वार वर्णन ओव्या ८

**असो हें भीतभंग नमस्कारिलें : तंव राजद्वार देखिलें :**
**जैसें भांडार उघडलें : परमुखाचें . ॥६२॥**
**कीं धर्मगिरीचे कपाटा : कीं विवेक सींहाचा दरकुटा :**
**कीं मोक्षगडाचा[1] दारवटा : उघडला तो : ॥६३॥**
**ना तें द्वाराचेंनि मीषें : मुख पसरिलें जैसें :**
**राजमठु दावीतुसे[2] : बाह्याभ्यांतरीं : ॥६४॥**
**म्हणे सर्वस्व नागावला : भीतरू रिता ठेला :**
**न पाति या बोला : भणौनि दावितुसे : ॥६५॥**
**कीं भीतरू भरला आकाशा : तारका स्वयं प्रकाशा :**
**नांदतां राजमठु जैसा : ब्रह्म गोळकु : ॥६६॥**
**कीं भीतरिलां जीवां : ईश्वरें देखिला निगावा :**

---

वेढे करितां नित्यही श्रीगोविंदप्रभु श्रीमुखे दश विंश त्रिंश ऐसें स्वयं अनुवादु करिती येणे ६० जीवां उर्द्धगतीतें पाववितीं नित्यप्रती ॥३६१॥

**एवं भीतभंग वर्णन ओव्या ६. प्र० २६**

भांडार = द्रव्यसाटविते ठाय । परसुख = परमेश्वरीय सुख ॥३६२॥

धर्मगिरी = नित्यक नैमित्यक धर्म तल्लक्षणे—गिरी = पर्वतशिखर । कपाटा = विवरा । विवेक = विचार तल्लक्षणे—सिह । दरकुटा = दडून बैसावयाचा ठाउ ॥३६३॥

मिखे = निमित्ये । बाह्यांभ्यतरी = अतरबाह्ये आपणपे दावीतसे ॥३६४॥

सर्वस्व = चतुः पुरुषार्थरूपद्रव्ये । न पाति या बोला = रिता ठेला या बोला सत्य मानतीना यदर्थी दावीतुसे ॥३६५॥

स्वय प्रकाश = चद्र तल्लक्षणे श्रीप्रभु । राजमढ तल्लक्षणें ब्रह्माण्डगोल ॥३६६॥

भीतरीला जीवा = संसारामधील योग्य जीवा । हावा = आवेशौनि । धर्मखांडी.

---

१ मोक्षगुंडाचा २ झाडा देतुसे

राजद्वार नव्हे हावा धर्म खिडी[१] : ॥६७॥
जेणें द्वारें बीजें : कीजे श्रीप्रभुराजें ·
तेथ एकलेया कां जाइजे : निलूजें मिया : ॥६८॥
आपुला श्रीकरु देउनि मुगुते केलें जनीं :
तें राजद्वार नमस्करौनि देखे उंबर वटु ॥६९॥

प्र २८ उंबरवट ओव्या ६

भणे कवण दैव केलें उपळी : जो सरागी चरणतळीं :
बीजें करितां देहळी : पवित्र कीज : ॥७०॥
नो साजात्या निजनामा : भणौनि जी परब्रह्मा :
लिळा पदें देउनि अस्मा : उद्धरिला : ॥७१॥
कीं बाह्याभ्यांतरा : योजे दृष्टांता पुरा :
भणौनि आवडला दातारा : पदें देओं : ॥७२॥
कीं संसाराचेनि त्रसें : जे करौनि होते उसीसें :
तेआंचे आड पडौनि जैसें : वीनवीत कां : ॥७३॥

---

धर्म प्रवर्त्तविती खिड पाडिली = धर्मा मानवा योग्य केली ॥३६७॥

एकलेया कां जाइजे-म्हणौनि आठ सात्विकांचा मेळावा केला आन गेलो ॥३६८॥

मुगुते केलें = मुक्त केलें । जना = विशेषज्ञानियादिका हाती धरौनि शतवाउली करीत असतां तया जना ॥३६९॥

**एवं राजमढ--द्वार वर्णन ओं० ८ प्र० २७**

उपळी = पाखाणी । देहली = उबरवट ॥३७०॥

अश्मा = पाषाण तो श्रीचरण स्पर्शे उद्धरिला = पवित्र केला ॥३७१॥

बाह्याभ्यांतर देखनया योजे म्हणून दृष्टान्तीं[१] वाणिला ॥३७२॥३७३॥

---

१ धर्म खांडी

---

**१ देवो बुधन् मनुजतां परदृक् क्वचित्स्यादंतःस्छ वत्व परदृक् च बहिस्छवत्स्यात्॥ धत्ते परापरदृशं करूणानिकेतो वास्तुस्छितोंतर बहिर्दाशिवत्परेशः ॥१॥**

संमार्जनाचि योग्यता : वास पाहाति देवता :
भणौनि पुजावेया पात्रता : बहुतां आति : ॥७४॥
परि कांई दैव वाखाणी : संबंधु जाला श्रीचरणीं :
जो आब्रह्म सांडुनि : नमस्करिजे : ॥७५॥

प्र. २७ राजमठ प्रवेश ओव्या ४७

आतां शांत आणि सुरसु : भणिजैल मठ प्रदेशु :
जेथ नांदिनिला हृषीकेशु : भणौनिया : ॥७६॥
जेआचेनि आज्ञा तरणी : लोपले राजशिरोमणि :
प्रभुत्वें सांसिणले कव्हणी : नुधवीति टांगे : ॥७७॥
यया समर्थाचेया एकांता : केवि सौरसु होए प्राकृता :
कीं देओ कृपाळु भणौनि अनाथा : आडकाठी नाहीं : ॥७८॥
वेउलीं त्रशिलें बच्छ : कीं पाश मुकत कडस :
पक्षीं झडपिलेआ बाळहंस गीवसी जननिएतें : ॥७९॥
तैसा भरला उ‌ऽरसु : करितां मठ प्रवेशु :
तेथ प्रमेय बोलावेयां सौरसु : वाचे नाहीं : ॥८०॥

---

संमार्जन = सारवण । योग्यता = पात्रता । वासु पाती = सारविलेया उबरेया-वरील पूजा ग्रहण करावेया देवता वाट पाहाती ॥३७४॥

जो श्रीप्रभु चरण स्पर्शे पवित्र जाला उबरवट तो आब्रह्मसापेक्षफलां सांडौनि निरपेक्षतया अखंड नमस्करिजे ॥३७५॥

**एवं उंबरवट ओव्या ६. प्र० २८**

शांत आणि सुरस एवं श्रृंगाररसे वाणिजेल ॥३७६॥

तरणी = सूर्य । नुधवीत = न उचलीत । टांग = माथा ॥३७७॥

सौरस = सहवास । प्राकृत = असंस्कृत एवं अज्ञान ॥३७८॥

वेउली = पचव्यउली, गाडगे । पाश-मुक्त - बंधनापासूनि मोकळा । कडस = पाडस ॥३७९॥

उ‌ऽरसु = उत्साहाचा उत्कर्ष ॥३८०॥

तर्‍हीं आळंकारें वीण : न मिरवे काव्य लक्षण ·
रत्नें नव्हति कां पाषाण · पुन राज्या योग्य कीं ॥८१॥
भणौनि शब्द-रत्नां सोहोज्वळा · जाउनि साहीत्याचिआ वेलाउळा:
भरौनि आणै खोळा : उन्मेषांचेआ : ॥८२॥
ग्रंथु सुवर्ण मुद्रिकें खवणु भाव माणिकें
मग दरुशना देऊं कवतिकें : श्रीप्रभुरायां : ॥८३॥
काइ काज एणें : मठु प्रवेशिजे बोलणें :
ते अवधारा नारायणु भणे · श्रोतेयांतें ॥८४॥
व्याधा पासौनि सुटलें आतु पक्षिणीचें पीलें :
जेवि निर्डा गिर्वासु आलें जननिएतें ॥८५॥
जेवीं असंभवियांचें लेकरूं : घे पयां पानीं हावरू
तै देवदत्त क्षीरसागरू जेवि लाहे : ॥८६॥
साधनांचा चरीतार्थी · जेसी साध्याची प्राप्ती
ना तरि व्याधिग्रस्ता अमृतीं · संरसु लाहे · ॥८७॥
जगा बाहीरीं अवचिता : मीन पडे चडफडीता

---

अलकार वीणु = साहित्य, शृंगार, अलकार, उपमावली याचिया युक्तेन वीण। न मिरवे = न शोभे ॥३८१॥

शब्द-रत्ना सोहोज्वला = शब्द तत्क्षणे रत्न उज्वलतेसहवर्तमान ते सोहोज्वल। वेलाउळा = जुग स्थीरावित स्थल, बदर । खोळा = शिरोभागील गवसणी, गिलगिर्ती ॥३८२॥

ग्रंथ तत्क्षणे सुवर्ण मुद्रिका। त्यामध्ये भाव तत्क्षणे माणिक जडविलेला। आशि रत्नजडितमुद्रिका श्री प्रभुचेया दर्शना ओळगो. स्तावकभाव ॥३८३॥३८४॥

व्याधा–पासौनि = वधकाचेआ जाल पाशातौनि। निडे = समीप।३८५॥

अ–संभावियाचे लेकरू = दारिद्र्यग्रस्त ब्राह्मणाची बालके। ते दुग्धाकारण—हावरू = उतावेळ। तेयाचेया पूर्वसुकृतसचित तया–क्षीरसागरु जेविलाभे ॥३८६॥

साधना चरितार्थिया जेवि साध्यप्राप्ति लाभे अथवा रोगिया अमृत लाभे ॥३८७॥३८८॥

तो दैववशें मागौता : जळेंचि लाहे : ॥८८॥
तेवि तिए राजभुवनीं : जो आनंद भरला मनीं :
तो कांइ एकी वाचा वाणी : प्राकृत मीं : ॥८९॥
संभ्रमाचेनि पुरें : झांपैलीं बुद्धिचीं तीरें :
तो उत्साहो न संवरे : इंद्रिय ओघां : ॥९०॥
मना चांचल्यता न स्फुरे : बुद्धि बोधत्व विसरे :
अहंकारु अहंत्वोसि मुरे : आपणपेंची : ॥९१॥
इंद्रियें चित्रस्थें : जालीं गात्रें स्तिमितें :
हालि चालि कुंठिली[1] जेथें : बाह्याभ्यांतरीं : ॥९२॥
कीं आत्मजावेनि सळें[2] : स्तंभेंचि अवतरला बळें :
कीं नीज प्रसादा राउळें : प्रतिस्टीला : ॥९३॥
सर्वांगीं उद्‌ैला स्वेदु : ढळमळीतु घर्मबिंदु :
ना तो सोमकांतु पूर्ण इंदु : द्रवतु जैसा : ॥९४॥
कीं तो विरहाग्निचा उबारा : सर्वांगीं स्वेदु अवधारा :
कीं हो काज भवज्वरा : शांति जैसी : ॥९५॥
ना ते वनमाळि ये लावर्णी : पेलिलें भवतरुंसी पाणी :

तेवि राजभुवनी = श्रीप्रभुचा राजमढी जो मज = स्तावक आनद लाभ झाला तेयातें मीं स्तावक एकीवाचे केवि वाणौ शको एव मज वर्णवेना ॥३८९॥

सं-भ्रम = आनंदातिरेक जालेया भ्रम । झांपैली = लोपली । उत्साह = उदकाचा उल्लाळ । ओघ-ववळ (नदीचे साहित्य) ॥३९०॥

चांचल्य = चपलता । न स्फुरे = संकल्पविकल्पाची स्फुर्ती होयेचिना । बोधत्वें बोधेकरूनि । अहंतत्व = अह याचा भाव तें अहतत्व। मुरे = मूर्छीत होये ॥३९१॥

स्तिमितें = शीतलें जालीं । कुंठिली = राहिली ॥३९२॥

आत्मज = नृसिंह, पुत्र । सळें = अभिमाने । राउळें = श्रीप्रभुराये ॥३९३॥३९४॥

हो काज = मज पांतां ॥३९५॥

वन-माळी = वनांतेपाळिता, वन-तल्लक्षणें जीव तेयांतें पाळी = तेयांचा उद्धार

[1] पारखर्ली [2] संगे

ते वाहाताए रोमांचे सारणीं : मज पाहातां : ॥९६॥
कीं तें प्रेमप्रावृषीं : शरीर क्षेत्रु मीं लखी :
भणौनि कोंभैलीं पुलकीं : रोमत्रीजें : ॥९७॥
कीं भव शत्रु भेण . लेइला रोमांचि भूषणें :
ना तो पुनर्भव दर्शनें : कांटाळैला : ॥२८॥
जें अज्ञान अनाथु बापुडें : कृपा देखौनि उघडें :
रोमाचें कंचुकी कोडें : लेवविलें : ॥९९॥
हृदइं भावाचा दाटी : सुखें उरके सृष्टी :
बाष्पु सदगदीतु कंठीं . तेणें बोलवेना : ॥४००॥
कीं अनुभवाचां माथां : वाउणि सुखाचिया लोथा :
तेणें पाएमळें दाटतां : सादु कांपे : ॥१॥
कीं जाणौं नेदीति इंद्रियां जीव आनंदु चोरिया :
भोगितां देखौनि वैरियां : बोलों भीइजे : ॥२॥
वातहतें कर्दळी पत्रें : तैसीं वेपथें सर्व गात्रें :
कीं गुणिआ देवाचेनि मंत्रें : थरारिलीं : ॥३॥
तें श्रीरंगाचें राहाणें : जग प्रसीध अवतरणें :

---

करी तो वनमाळी । पेलिले = प्रेरिले । सारणी = पाट ॥३९६॥

प्रावृट् = वर्षाव । लखी = भावी । पुलकीं = अंकुरी ॥३९७॥३९८॥

कंचुकी = चोळी । कोंडे = कवतिके ॥३९९॥

बाष्प = कफ ॥४००॥

अनुभवाचा = सुखदुःखानुभवद्वाराचा । पायमळे = बेंभिल चालणें । साद = शब्द ॥४०१॥

जाणौं नेदि इंद्रिया = जीव आनंदभोगी तो इंद्रियांस कळौं नेदी । वैरियां = इंद्रियांसी । बोलो भीईजे ॥४०२॥

वात-हते = वायु करीतां हाणीतिलें कदलीपत्र = केळीचीं पानें । वेपथें गात्रें चलचळां कांपति । गुणिआ = मंत्रवादी [एथ कुमारीचें साहित्य] ॥४०३॥

श्री रंग = श्रीमाया तियेचा पती । राहाणें = देवताधिष्टीत ठाय । प्रत्ययो-आति =

ॐथें भूत बाधा सांडणें : प्रत्यवो आति : ॥४॥
भणौनि तिए देव्हारा : दैव प्रकृति अवधारा :
कंपु नोहे आंगीं वारा : जगदंबेचा : ॥५॥
कीं जीव देहाचें धरणें : मज पातां सुटे क्षणें :
भणौनि भेणें विवर्णें : सर्व गात्रें : ॥६॥
कैसा लंपटु प्रपंचु : न सके जीवां मोचु :
कीं उबडला[१] देखौनि सोच्यु : काळवंडैला : ॥७॥
दैव भोगितां अंतरें : कर्म छाया सांडीति गात्रें :
कीं गुणियां देवाचेनि मंत्रें : वर्णनासु : ॥८॥
तें जीवीत सल्ल मीं मानी : पळपत विरहाग्नी :
तो भाओ उमटतसे लोचनीं : मीशें आश्रुचेनि : ॥९॥
कीं हृदइं श्रीचरण तळें : तें परिपूर्ण प्रेमजळें :
बोसंडतां तुंब डोळे : वाहाति जैसें : ॥१०॥

= प्रतीति असे ॥४०४॥

हृदय तल्लक्षणे देव्हारा । देवीप्रकृति तल्लक्षणें देवी । अवधारा = आइका । जगदंबिका = जगन्माता तल्लक्षणे श्रीप्रभु ॥ ४०५ ॥

जीवां देहे धरिले ते देह क्षण जाईल म्हणून सर्वगात्रें कृष्णवर्णे जालीं ॥ ४०६॥

लंपट = लागट । जीवाते मुंचावया सोडूं न सके । उबडला = प्रपंचा वरौनि मनीं जीवु विरमिला--तंव देह अमगळ ॥ ४०७ ॥

दैव = पूर्व-कृतकर्म । कर्मछाया = कर्में करौणि सुकृतभोगितां आह्लादे । कीं = अथवा । गुणियां = मंत्रवादि तयाचेनि मंत्रें भूतबाधा नासे ॥ ४०८ ॥

जीवीत सल्ल मी मानी = जीवीत असें तव सल्ल = बाण खंड आंगीं उरे, भीरडाचा वृक्ष, गाइचा उदरीं लोह निफजे जे । पळपत = कर्पेत । उमटतसे = प्रकट होतसे ॥ ४०९ ॥

हृदइं श्रीचरण आठवण तल्लक्षण तळें । प्रेम = आवडी तल्लक्षणे जल = उदक । बोसांडत = उचंबळत असे तल्लक्षणें नेत्रद्वारां प्रेमाश्रु वाहात असती ॥ ४१० ॥

१ उजडला

अंतःकरणा अनन्य भावें : डोळां देखिलें न न्हावें :
कीं तेणें वंचिलें स्वभावें : भणौनि सिणती[1] ते : ॥११॥
आतां प्रळयो आठवा : हृदइं अवतरे जया सदेवां :
जें निजनाथें कणवा : अवलोकिलें : ॥१२॥
मना बुधीते क्रमौनि : आवडि जीवीं राहे भरौनि :
तेचि आयुष्याची बुडे डोणि : वियोगार्णवीं : ॥१३॥
पढियंते याचा वियोगु : नुरवी आयुष्याचा भोगु :
जेवी[2] अस्तविता पतंगु : नुरे दिनु शेषु : ॥१४॥
एकें विरह कातरें : कैसीं माणुसें पवित्रें :
जयां न साहाति उत्तरें : वियोगाचीं : ॥१५॥
असों हे आठइ : भाव राउळींचे दळवइ :
जे वृतीक जाले हृदइं : अनुरागाचा : ॥१६॥

अनन्यभावे ईश्वर स्मरण घडे तेणे डोळां श्रीमूर्ति दर्शन होय. ना तरि तद्व्यतिरिक्तें शीणताती [ पाठांतरे-सानटी = धाकुटेयां परिश्रमती ] अनन्य स्मरणाचें कार्य प्रेमाश्रु आणि प्रेमाश्रुचे कार्य ईश्वर श्रीमूर्तीचे दर्शन तेणें प्राप्ति-सिद्ध ॥४११॥

प्रलयो = प्रकर्षें लयाते पावे जैसी प्रथम विरहिणी । कणवा = कृपा । अवलोकिलें = सु-प्रेमें पाहिलें--तेणें प्रेम संक्रमीनिलें. तेयांसि वियोगे प्रलय ॥ ४१२ ॥

क्रमौनि = उल्लंघौनि । जीवीं अनन्यत्वें ईश्वराची आवडी भरौनि राहे. । जीवीं = हृदयी । आयुष्य तल्लक्षणें डोणि = एका लाकडाची कोरीव अशी । ते वियोगार्णवीं--वियोग तल्लक्षण अर्णव = समुद्रीं बुडों पाहे ॥ ४१३ ॥

पढियंते = आवडते । नुरवी-न + उरवी = नुरवी = आपण आपणयांतें उरों नेदी दिन = दिवस एवं सूर्यप्रकाश । शेष = अल्प । अथवा पतंगु तो दीप प्रकाशा नुरवी । खेज दीपकासी सेजा करूनी आपणां धाडी--हा पाठभेदार्थ ॥ ४१४ ॥

कातरें = व्याकुळें । मानसें = अंतःकरणें । उत्तरें = निष्ठुरें शब्दें ॥ ४१५ ॥

असों = पुरे करों । आठैही भाव--हे राउळाचे = श्री-प्रभुरायाचे । दळवै = दलाधिपती । अनुरागाचा हृदयीं हे वृत्तीक = वार्ता जाणविणारे तथा अखंड वृत्ती

[1] सानटी [2] जैसा स्तवता

**रमण धन[1] विशेखी : परमार्थिका विषै कीं :**
**भावीं मालाथिलें सात्विकीं : स्वानुभवातें : ॥१७॥**
**जरि परसुखा अनुभवी : जे सुखभरे जीवीं :**
**तो रंगु गुणिया वाचवी : ऐसा देखों नाः ॥१८॥**
**ना ना देव्हारा प्रसीध्धु : जे बहुत आइको मंत्र सीध्धु :**
**परि विषय सांडणें नाहीं बहिर्मुदु[2] : न देखति ते : ॥१९॥**
**कवळैली कामलादि दोषीं : दृष्टी न रीगे वर्ण विशेषीं :**
**तेवि कर्माभिमानीं लोकीं : न देखिजे ईश्वरसुख : ॥२०॥**
**ते परसुखोपचारी : जेथ सेविलें किंकरीं :**
**तेआं देवांचा सेजारीं : बोली हे · ॥२१॥**
**संवरौनि भावाची उर्मी : भणे जेथ नांदिनिले स्वामी :**

---

वेणार. पाठभेद वृत्तीक १. वार्त्तीक २ दोहींचा अर्थ वरिला प्रमाणे ॥ ४१६ ॥
रमण = ईश्वराच्या ठांई विशेख रममाण । पर = सर्वोत्कृष्ट । अर्थ = स्वार्थ, द्रव्य. विषै कीं = उर्ध्व गतीक तो विषयच होऊनि ठाकेला । भावी = सात्विकाचे भाव-मालाथिले = वेधिले, आह्वाणिले, भूलविले ॥ ४१७ ॥

जरि पर-सुखा = परमेश्वर सुखा अनुभवी तरि तो रंगु सुखाचा । गुणिया = परमेश्वर । रंग = प्रेम, ज्ञान, निर्वेद तथा ईश्वरेक सबंधी सकळही गुण । ऐसा अन्य देखों ना । एथ साहित्य राहाणाचे ॥ ४१८ ॥

नाना--देव्हारे = सकळ देवतांचे भिन्न-भिन्न । मंत्र सिद्ध = आगम आथर्वण मंत्रें सिद्ध, तथा सिद्ध = ऋषी जनी आपापुळिया परिभाषें मंत्रे निमिर्ली । विषय = जड चेतन पदार्थांचे त्याग ते बहिर्मुखी = बाह्यात्कारी बेगडी नटवत् तेया मिथ्यत्वाते ज्ञान दृष्टे तें न देखतीर्चा ॥ ४१९ ॥

कवळैली = व्यापिली । कामलादि दोखी = कवळ रोगें । वर्णुन विशेखी = ते या कवळ रोगग्रस्ता सर्व पीतमय दिसतेंसे तैसे कर्मजड कर्माभिमानिये व्यक्त परमेश्वरावताराते न देखती ॥ ४२० ॥

किंकरीं = सेवकजनी ॥ ४२१ ॥

---

१ गुंण २ बहिर्मुख

**ते रचना पाहीं आह्मीं : नेदुं सुखाचिता : ॥२२॥**

प्र. २८ भीत भंग वर्णन ओव्या १४

**तंव भीत भंगा चहुंकडे : वानलगां वस्त्राचे वोसाडे :**
**जे पाहातां पुरवीति कोडें : दृष्टींचीं : ॥२३॥**
**कीं झळंबाचेनि मीषें : अनुरागें रातला असे :**
**मठु जेवि भुवनेशें · सोडिलेया : ॥२४॥**
**कीं देउ स्वरूप निर्गुणु : भणौनि वस्त्रांचिया खुणा :**
**मार्गे[1] लाधलेया गुणा : जाला विसावा तो : ॥२५॥**
**ना तया राजमठा : सदैवीं आणिला दुखवटा :**
**भणौनि पांगुरुविला सकटा : मीषें झळंबाचेनि · ॥२६॥**

---

सांवरौनि = आटोपौनि । उर्मी = उठावा-रचना = उभारणी ॥ ४२२ ॥

**एवं राजमढ प्रवेश ओव्या ४७, प्र० २७**

वाणलग = पंचवर्णीं भिन्नभिन्नवाणें । उसाडे = पडदे । कोडें = कवतिकें ॥४२३॥

झळबे = चांदोवे । रातला = रंगिला । भुवनेश = श्रीप्रभु ॥४२४॥

देव = देवपळ्हे । तयाचे स्वरूप = कापूस । तो निर्गुण वस्त्रायोग्य तंतुरहीत । तेया कापसाचे ततु निर्माण केलिया मग-वस्त्राचिया खुणा = वस्त्र निर्माण जालिया मग-मार्गीं लागलिया गुणा = तयाचा रगउनि भीतभगु तो श्रीप्रभुचिआ उपयोगा गुणा झाला । हें साहित्यार्थ ॥ देव = अव्यक्त । निर्गुण = अव्यक्तीगुणकार्यें न वर्ते । उद्धरण मार्गीं लागलिया गुणा = व्यक्तीगुणाचा अंगिकारु केला । वस्त्राचिया खुणा = वस्त्रवत आंगि स्वीकारौनि आपुलिये खूणें करौनि मग मार्गीं लागलिया गुणा = इतर देवता मार्गा सांडौनि परमेश्वर मार्गीं प्रवर्तलेया पुरुषां नित्यक नैमित्यक गुणा । तेणें ईश्वर प्राप्तीचा विसावा लाभे ॥ ॥ देव स्वरूप निर्गुण = ईश्वरीचे गुण बाणले जया पुरुषां तेही रजस्तमादि दोषीं निर्गुण । वस्त्राचिया = वस्त्रें आपुलियें खूणें करौनि सांगेति जैसे श्रीप्रभुसंबंधें आम्हांसी गुण बाणले तेआंसी मागा = श्रीप्रभु बीजें केलिया पश्चात रजस्तमादी गुणातीता पुरुषासि विसावा तो नमस्करणीय राजमढ तथा भीतभंगु असे ॥ ४२५ ॥

सकटा = समग्र एव चहूंकडीं संपूर्ण ॥ ४२६ ॥

---

१ मागें लागलेया

**वस्त्रें बाह्यें पांगुरता : तरि हा श्लेषु घडता**
**जरि दैवांचा तो आंतु धडौता : बाहीरि दीनु : ॥२७॥**
**ऐसीं भीतभंगा नेहटीं : सपोतें मांजिठीं :**
**वस्त्रें वोळगविलीं निसृष्टीं : निरूपम्यें : ॥२८॥**
**सुसाइलीं नाखिवें एकें : कवणा साध्य तें नाटकें :**
**ते रसभाव रूप रेखेः कवणु जाणे : ॥२९॥**
**अश्वगज नर वाणि : मध्यें कव्हणी ठाई पेखणीं :**
**ठसे पाहातां रूपति अंतःकरणीं : स्वभावपणें : ॥३०॥**
**तलगासीं[१] कमळें : चारा वांटित मराळे :**
**नारी कुंजराचीं दुकुलें : राजवल्लभें : ॥३१॥**

---

श्लेष घडता = उपमा घडतें । श्लेष = उपमा देऊनि दूषिजे । तरि श्लेषाचे का ना सृष्टी व्यवस्था ते बाहीरी पांगुरावयाची परि देवांचा राजमढु तो आंतु धडौता भणऊनि आंतूचि पांगुरविला ॥ वस्त्र बाह्य पांगुरता तरि हा श्लेषु न घडता । एवं भीतरी पांगुरविला म्हणौनि घडला परि दैवाचा मिक्षु आंतु धडौता बाहीरी दीन तैसाचि राजमढही म्हणोनि बाहिरी पांगुरावेआंची उपमा न घडे ॥४२७ ॥

नेहटी = भितीजवळ लिगटली । सपोर्ते = हिरडेयाचा रग असौनि पुनः । मांजीठीं = मंजिष्ट । निरूपम्य = उपमेरहीत ॥ ४२८ ॥

सु-साइली = सुष्ठु सायाची बिवर्डी ( ? ) , सुष्टु साउली । नाखिवे = चोखट कोरीवे, नखाचेनि चित्रिवे, रगभरीते चित्रिवे, नटारंभी चित्रिवे। कवणा साध्य ते = नाट्यशास्त्रज्ञां वांचोनि इतरां साध्य नोहेची इतराचे ते कव्हणाचेआ हृदया नये। रस भाव = नवाहीरसाचे प्रुथग्भाव। रूपें = सुदरे। रेखे = रेखायुक्ते लीहिली ॥ ४२९ ॥

अश्व = घोडे । गज = हत्ती । नर = मनुष्य । तें वाणा वाणाची । पेखणी = नर्तकी रूपती = तेया नृत्या अंतष्करणे खुपौनि राहती । स्वभाव–पणें = एवं तयाचे हावभाव निर्मळपणें ॥ ४३० ॥

तलगासी = बालकासी । मराळे = स्त्री पुरुषें । नारी कुंजराची = नवां नारी कुंजरांची । दूकूलें = युग्में । तथा सस नारी पालखीचीं युग्में ॥ दूःकूलें = वस्त्रें । राजवल्लभे = रायासि योग्य वस्त्रें मराळे = मयोरे तोंहि युगळांसी ॥ ४३१ ॥

---

१ तगलासी

ऐसीं तें वस्त्रें वाणी : आपुलीं ठेविलीं कृपिणीं :
आंगसिकें वेदुं भणौनि : सर्वज्ञांचीं : ॥३२॥
न लगतां काळाचे पाशे : एकें सदैवु आहाति ऐसें :
जे राउळीं घालीति ठसे : आपुलेया जोडिलेआंचे : ॥३३॥
जरि ब्रह्मयाचेनि सळें : झणें उठीति कव्हणीं वेळें :
कां जे अमृत श्राविए डोळे : माझेया स्वामिचे : ॥३४॥
जेवळि प्रपंचु नाठुसे : द्वापरीं प्रकटीलीं गोपवच्छें :
तेवि श्रीप्रभुचेनि कृपावसें : जीवीतुं पां : ॥३५॥
ऐसें भाव भ्रमीतु बोले : चित्र तेथौनि निगालें :
तंव पुढां उभे देखिले : स्तंभ द्वय : ॥३६॥

---

वाणी=भिन्न भिन्न वर्णाची । कृपिणी=ससारां न वेचातियेही । आंगसिकें= श्रीप्रभु सर्वज्ञांचीं प्रसादवस्त्रे भणौनि । वेद्धु=प्राप्त होआवी भणऊनि यत्नें ठेविलीं ॥ ४३२ ॥

काळ=यम, देहाभिमानीनि देवता । पाशे = फासे । राउळी ठसे = कर्माराहाटी आपुलाला पदार्थीं ठसे = चिन्हे घालिती तैसे राजमढीं पडदेआंवरी भाषती ठसे जे येही परि अनतें पापें आर्जिली आहेति; ते नासावेआ कीर्तिमुखें अखंडीत घडो कां ॥ ४३३॥

ब्रम्हयाचेनि-सळे--द्वापरीं श्रीकृष्णचक्रवर्ती गाइगोपवच्छें चारितां तीं ब्रम्हेंणि सत्यलोका नेलीं तंवं श्रीकृष्णे आपुलिये शक्तिसामर्थ्यें नूतन निर्मिलीं. तैसेंचि सामर्थ्य श्रीप्रभुचा ठांई वर्तति असेति । मृतवच्छ-ऊठेति कह्णियेवेळें = एवं सदासर्वदा तेचि क्रीडा ऐसेना । अमृतश्राविये नेत्रावलोकनेया मृतवच्छे सजीवत्त्वाते पावविलें स्तावक म्हणतो माझेया स्वामीचें कौतुक ऐसे ॥ ४३४ ॥

ब्रह्मेनि गोपवच्छे नेलेया अनंतरें जवळीं प्रपंच संग्रहीं नसतां आणि तयांचे ठसेही नसतां पण ईश्वरें तेयांसारिखी अकस्मातु प्रकटैलीं तेवी श्रीप्रभुचेनि कृपावशें जियालीं ॥ ४३५ ॥

भाव=आठैही सात्विकांचे भाव । भ्रमीत=भूललेंपण ॥ ४३६ ॥

**एवं भीतभंगवर्णन ओं० १४, प्र० २८**

प्र. २९ देवळा मधील खांब वर्णन ओव्या ३

कैसे परोपकारी भले : जे देवाचेआ संबंधा गेले :
जेआंवरि असे उभिले : असेख ते : ॥३७॥
परि ते भारु कैसे : देवाचेनि कृपावसें
दोन्ही मांडले सरिसे : चौरसुपणें : ॥३८॥
जो परात्परु : जे हिंसीं क्रीडा करी ईश्वरू :
भणौनि साष्टांगीं नमस्कारु : करूनिया : ॥३९॥

प्र. ३० नृसिंह वर्णन ओव्या १०

तेवींचि पाहे रचना : धृति नाहीं मनां :
तंव पुढां देखिलें सींहासना : भीतिभंगेंसी : ॥४०॥
वेढविलें पातळें : वस्त्रें स्वेतें सोहोज्वळें :
सर्वांगें बाहाकाति परिमळें : सुकडिचेनि : ॥४१॥
विकराली वदनां वरी : मुगुटु आच्छादिले विखूरी :
भालीं बावनेयांची भोरी : सतपत्राचेआ : ॥४२॥
कीं तया देवाची सन्निधि : भणौनि पातले उपाधि :
कीं ठाव[1] करुणानिधीं : उरविली ती ही : ॥४३॥
आपुलेनि नखें एकें : जो हिरण्यातें जिंके :
तोचि राउळीचीए जवळिके : निःकामि सदाः ॥४४॥

---

परोपकारी भले = स्तभ राजमढासी आधारू जाले ॥ ४३७ ॥
भारू = स्तंभ । चौरखु = चारी कोणे सारिखे ॥ ४३८ ॥ ४३९

एवं देउळा मधील खांब वर्णन ओं० ३ प्र० २९

धृत = धैर्य, अवकाश । सिंहासन ते नृसिंहाचें ॥ ४४० ॥
बाहकाति = उधाति । सुकडी = कस्तुरी ॥ ४४१ ॥
बावनयाची = बावनचंदनाची । शतपत्र = सेवतीचीं फुलें ॥ ४४२ ॥
ठाव = कणव ते पूर्वप्रमाद जालेया अनंतरें जोडिली आन जडत्वीं पडिले ॥४४३॥
हिरण्याते = हिरण्यकश्यपाते विदारी ॥ ४४४ ॥

---

१ कृपाव

संपूर्ण सींहु ना वरु : देवता आंगीचि वीभिचारुः
वरि अवतरावेआ दातारु : स्थान केला : ॥४५॥
तया अनन्या देवाचें : सन्निधान कैचें :
जरि सा:ह्य केलें भक्ताचें : भणौनि पढिएंति ते : ॥४६॥
भक्तातें दुरीं : धरिला अंगेंसी वैरी :
यया अपराधा ईश्वर जरि : कोपति पां : ॥४७॥
भणौनि परिहारा मीषें : बोलावेआ पसरीलीं मुखें :
अंतर निष्कपट चोखें : दावीति जैसे : ॥४८॥
कींबहुना यापरी : नामिले नरकेशरी :
तंव देखे हस्तांतरीं : स्थान एक : ॥४९॥

प्र. २१ ओटा वर्णन ओंव्या ६

परहातें वाढवीला : भणौनि गज प्रमाणें रचला :
तो उंचवटा देखिला : नितल नीट : ॥५०॥
कैसा साधला आउ॰ : जो भक्ताचा निज ठाउ॰ :
भणौनि वेळोवेळां देवराउ॰ : गविसूं एति : ॥५१॥
तो पुर्लींग [1]परसैया : जेथ मुळ बांधलें आवइया :
तो ओटा आवडे वनमाळिया : सदाकाळु : ॥५२॥

---

किंचितासिह किंचितनर ऐसा युक्तत्त्वे तो नर-सिहावतारू । देवता आंगी = चेष्टकर्त्वें । विभिचारू = अवतरली, संचारे विकरैली । द्वार = तो जन्मदेता खांब केला ॥ ४४५ ॥ ४४६ ॥

अंगेंसी = पालखतीं ॥ ४४७ ॥

चोखें = निर्मळ ॥ ४४८ ॥

हस्तांतरीं = दोनि हातांचेनि मानें. एकास्थाना देखों ॥ ४४९ ॥

**एवं नृसिंहवर्णन ओं० १०, प्र० ३०**

आणिकाचेनि हातें तो गजप्रमाणें ओटा तियेस्थली निर्मित होता ॥४५०॥

आउ॰ = ज्योतिष गणने । जो भक्तजनांचा ठाउ॰ । गिवसू = पडताळू ॥४५१॥

---

1 परिशय्या

तेथ सुमनत्वीं वास आगळा : जरि सेवा एइल फळा :
भणौनि साखर घालिजे आळां : सर्वज्ञ रायें : ॥५३॥
जगजीवनाचिया आवडी : पंच धारकरी वरी पडी :
भणौनि प्रेमाचां डीरीं खोडी : सांसिनली जेथः ॥ ५४ ॥
ऐसेया विशेष स्थाना : साष्टांग केलें नमन :
तंव दाक्षिणे देखे मर्दना : भूमि एकि : ॥५५॥

प्र. ३२ मर्दना स्थान ओव्या ३४

सदैवीं जेथ अपुलां हातीं : चौक भरिले निगुती :
ते बरवेपणें घेउनि बैसति : दृष्टितें : ॥५६॥
रेखिलीं परिकरें : सपुरें सर्वतोभद्रें :
जेथिची कुसरि नेत्रें : पारखवेना : ॥५७॥
नागबंधा पैलीकडे : सुरेख शंख चोखडें :
गर्भें रचिलीं उदंडें : अष्टदळें : ॥५८॥
हरीत पीत काळीं : बाहुल्यें स्वेत रांगोळी :

---

मूळ = रोप। आबइया = नागदेवाचार्यांच्या मातेचें नांव तथा अबैचें झाड ॥४५२॥
सुमन = पुष्प ॥ ४५३ ॥
जग-जीवना = जगाचा जीवन तो उदक तेवि भक्तांचा जीवन तो परमेश्वर। पंचधार = पंचधारेकरौनि वृक्षा सिंचति । खोडी = आबाइसाचे नांव तथा वृक्षाचा खोडी । डीरी = अंकूर निगेति । सासीन्निली = फलपुष्पी पत्रीं पडिभराते पावली ॥ ४५४ ॥ ॥ ४५५ ॥

**एवं ओटावर्णन ओव्या० ६, प्र० ३१.**

चौक = रंगमालिका = रगभरीवा विंविधावेलीचिया मालिका । निगुती = कुशलत्वें । ते दृष्टीतें घेऊनि बैसती ॥ ४५६ ॥
परिकरें = सुंदरें । सपुरें = बारीक ऐसें । सर्वतो-भद्रेसी = चातुर्दक्ष सिसाळें एवं कीर्ती मुखें । कुसरी = कुशलता । पारुखवेना = परिक्षा करवेना ॥ ४५७ ॥
रंगमालिकाचिआ तीनि प्रभावळी-तेचि प्रथम लिंगभद्राची नागबंधाची शंखाची । गर्भे = चौकामध्यें । अष्टदळें = कमळें ॥ ४५८ ॥

चौकावरि जिवाळीं : नवरत्नांचीं : ॥५९॥
चौक न होति साचे : पृथ्वी दाटले रोमांचे :
रजीं उज्रंभू सत्वाचे : हें देवाचेनि : ॥६०॥
सुखदानि सुलभु : निष्कामाचा वल्लभु :
तो फावला श्रीप्रभु : जीए सदैवेंसि : ॥६१॥
ते आपुलेनि कुपात्रपणें : पृथ्वियेया आछादिले मीं ह्मणें :
चौक नव्हे लाजीरवाणें : दाखवी जेवि : ॥६२॥
कीं सेवितां चरांऽचरां : माझा स्वामि गोडिरा :
भणौनि धातु आली वसुंधरा : मीषें चौकाचेंनि : ॥६३॥
तैसी चौक रचना : मंडण केलें स्थाना :
भणे एथ होए मर्दना : स्वामी माझेया : ॥६४॥
जेथ बुद्धिचा विटाळु : नाहीं मनासि आतळु :
कहीं न स्पर्शे अंचळु : निज वाणिचा : ॥६५॥
जे विवेकाचें देखणें : मुखाचें विसंवणें :
अमृता गोडि[1] सेवणें : अभिळाखु जेआंचा : ॥६६॥

---

जिवाळीं = लहान कमळे । नवा रत्नाची = नवरत्न साम्य नवारंगाचीं ॥४५९॥

संबधें-रज जाउनि तिये भूमिये स्वत्व उपनलासे ॥४६०॥

सुलभ = सोहपा, सुष्टु लाभरूप । निःकाम = अभिलाखरहीत । वल्लभु = पती, आवडता ॥ ४६१ ॥

कुपात्र = कुत्सितपात्र = अपात्र, उफराटा ॥ ४६२ ॥

धातु—पांचा रंगाचे पांच खडेया एसनें धातु = भूमिगतें । सप्तधातू वेउनि महाराजमढां देवता उळगों आलिया कां जैसिया ॥ ४६३ ॥

मंडण = शोभायमान, भूषण ॥ ४६४ ॥

विटाळु नाहीं = स्पर्श नाहीं । आतळु = आतळेना । अचळु = वस्त्र पदर । निज-वाणि = परावाचा ॥ ४६५ ॥

विवेकाचें देखणें = सकल सिद्धान्ताची दृष्टी । परब्रह्माचा अभिलाषु अमृत करी ॥४६६॥

---

१ गोडिरे पणें

माह्रा तेजाचा उजियडु : जो आकाशाचा पवाडु :
सत्यासि साचपणें गूढु : पदार्थ जो : ॥६७॥
जो आगाधासि आगाधु : सीधांसि असाध्यु :
ज्ञानासि प्रति बोधु : जाणता जो : ॥६८॥
आपुलेनि गोडिरेपणें : जया स्वयं स्वतांसी रमणें :
तो कीं मानीत असे मादनें : कृपावशें : ॥६९॥
आपण विश्व बीजाचा रासि : हृदइं सांटवला जेआंसि :
भणौनि कांइ मळवटे यासि : तेंचि नांव : ॥७०॥
निर्मळा आंगोद्वर्तनें : कळा कौशल्यें रसाएनें :
सर्वज्ञ नाथु तोषे जेणें : तें कांइ वाणुं : ॥७१॥
जऱ्ही नाना विधीं दळीं : भावितां सर्व काळीं :

---

पवाड = प्रकर्षेसी वाड एव अनता ब्रह्माण्डाचा अवकास रूप भूति ते ईश्वर स्वरूपीं एकदेशी हारपौनि गेली । सत्यासि = वेदासी ते आपुले विज्ञाने जाणौं भणति परि ईश्वराचा आद्यन्त जाणवेना । गूढ = गौप्य ॥४६७॥

जो ईश्वरस्वरूप–अगाधासि अगाधु = मानवासि देवता अगाधा आणि देवतासि ईश्वर अगाध । सिद्धांसि असाध्यु = वेदागमादि सिद्धिचे जे सिद्ध तेयांसीही जाणावेया साध्य नोहे । असा असून तो ज्ञानासि प्रति बोधु = सकळ देवतादि ज्ञानाते प्रकाशविता होये ॥४६८॥

स्वयं स्वतःसि रमणें = आत्मरमण । कृपावशे = कणवांगिकारें ॥४६९॥

विश्वबीजाचा राशी = जो स्वत. विश्व तल्लक्षणें बीज तयाचा एकत्रठा । तो हृदयीं साटविला = जैसें धान्यें कोथळेया मध्यें साटविती तैसें भक्तांचा हृदयीं जो आपण साटविला तो भक्त–एवं मायदेव पंडित यानां श्रीप्रभु सर्वज्ञें त्याच्या सप्रेमळ भक्तिवरून आणि तयाच्या स्थूल शरीरावरून तयाते कोथळा येणें नामें आळवीति तो मादने देतसे ॥४७०॥

निर्मळा आंगा–उद्वर्त्तनें = तेल आणि किकसा गेणें उद्वर्त्तनें = उटिणें देणें । कला = ठाई ठाई कैळासौनि । कौशल्यें = मर्दनें देतां चमत्कार दाखविणें । रसायनें = विविध सुगंधरूप परिमळ द्रव्यें ॥४७१॥

कस्तुरिएचा परिमळीं : कांइ विशेष दीसे : ॥७२॥
दीपिकाचेंनि बंबाळें : दीवसु केवि उजळे :
विजनेआंचेनि मळयानिळें : कांइ चांदिणें सैत्य होए : ॥७३॥
फरौलेआंचिआ योग्यता : कांई महिमा ए सारस्वता :
विषइं परमार्था : कांइ बीक चढे : ॥७४॥
बाराक्षरि[1] एका सारखी : श्लाघ्यता अति अध्वरीं :
कळसोदकें समुद्रीं : कांइ भरतें ए : ॥७५॥
तैसें निर्मळा निर्दोषा : केवळा स्वयं सुखा :
सुखोपचारी देखा : कांइ तोषु आति : ॥७६॥
जरि भवभुजंगाची दाटि जिथेंचेनि संकेतें उठी :
ते माउली सदैव[2] दृष्टी : वरि लोभापरु : ॥७७॥
ते निराकारातें आणि आकारा : निष्कामा दावी संसारा
ते उदासातें जोजारा : आंतु घाली : ॥७८॥
अमुर्तातें मूर्ति लेववी : पूर्णा चाड उपजवी :
कूटस्थातें हिंडवी : माउली ते : ॥७९॥
ते अनिर्वाच्यातें बोलवी : अतर्क्यातें दाखवी :

---

मळयानीळे = विजणेयाचेनि वायो करौनि । चादिणेया कांई शैत्य होये ॥४७३॥
फारौळें = वर्ण पंचक । सारस्वता = अभ्यासकांसी । बीक = भूषण चढे ॥४७४॥
श्लाघ्यता=सौभाग्यता । अध्वरीं=यज्ञसिद्धि पावाचेयाचे वेदमंत्रा सयोगी ॥४७५॥
कांई तोखु आति = कांई सतोष होय ॥४७६॥
भव–भुजंग = भव = संसार तल्लक्षणे भुजग = सर्प । तयाची दाटी = लहरी संकेतें = मंत्रें, सिद्धांते = विधी आचारें ॥४७७॥
संसारा = मनुष्यावतारादि दहा । जोजारा = गोजारणेया आंतु घाली ॥४७८॥
अमूर्त्ताते–मूर्ति लेववी = आऊट हात मनुष्य देह शोभवी ॥४७९॥
अनिर्बाच्य = अवक्तैकदेशित्वे वाचा नाहीं । अतर्क्याते जो तर्कला न जाये

---

१ बाराखडीचा अक्षरी : कांइ श्लाघ्यता अति अपारीं : २ जीव सृष्टि

निर्गुणा उपजवी: गुण गोडिसे : ॥८०॥
अनादितें करी बाळु : शांता उपजवी खेळु :
स्वयं बोधा क्रीडावेळु: गमवीतु असे : ॥८१॥
जो अगाधपणें उगेला : घे श्रुतीसीं अबोला :
तो आतीं बोलाविला : साद देतु असे : ॥८२॥
जयाचेनि नित्यतृप्तिपणें: यज्ञोपचारां लाजीरवाणें :
तो न बोलावितां आरोगणें : बीजें करी : ॥८३॥
काळाचेया मुगुटावरि : जयाचिए आज्ञची चाउरी :
तो कीं एकादे करीं[1] : अर्वाच्याचें : ॥८४॥
जयाचिए गांविचा मार्गु : चुके साधनाचा वर्गु :
तो देआवेया अपवर्गु : धांवे घरोघरीं : ॥८५॥
जरि हेंचि जाणें वर्मु : जेआं अवतराविलें परब्रम्हु :
सदैवासि[2] संसार कर्मु[3] : देखौनिया : ॥८६॥
जिए साउलिए वीणें : आमुचें सोच्यपणें :
तेआ दातारासि कवणें: कणव उपजवीलें : ॥८७॥
सदा निर्गुणा स्वरूपा: जरि जवळि नमती कृपा :

तयांही दाखवी । गोडिसे = स्वभावादीक ॥४८०॥

जेया आदि नाहीं तयाते बालरूप नटवी । शांत = रस अविक्रय । स्वयं बोधा = स्वयंप्रकाशवंता । गमवीतुसे = क्रमवीत असे ॥४८१॥

उगला = मौन्य । श्रुती जिया वेदांचेया त्याही न बोले ॥४८२॥ ॥४८३॥

यज्ञोपचारा = यज्ञा आणि तयाचे साहित्योपचार तेणे हिंसातिरेकें तोखु ना । काळाचेया = प्रकृतीचेआ । मुकुटावरी = शिरावरी । चाउरी = बैसिका आसन ॥४८४॥

अपवर्गु = आपुला मोक्ष, अनार्जीत ॥४८५॥

वर्म = जिह्वार, खाचणा ॥४८६॥

सोच्यपण = रंकपण ॥४८७॥

१ म्हाणितिल २ जीवा ३ श्रमु

तरि उदासा मायबापा : केंवि होतें आपुलेंपण : ॥८८॥
कीं बहुना यापरी : मर्दना स्थानु नमस्करी :
तंव रंगमाळिका देखे कुसरी : आरोगण भूमि : ॥८९॥

प्र. ३३ आरोगणास्थान ओंव्या १५.

चौकाचेनि बरवेपणें : दृष्टीसि मांडिलें धरणें :
उपवासु जाला मीं भणे : यालागि : ॥९०॥
कीं राउळीं आरोगणें : पूर्वीं चौकीं वाढणें :
ते रंग माळिका सुचिताए खुणे : वर्तमानीं : ॥९१॥
कीं अरुवरें करें : विचित्रा धातुची सपुरें :
वोडविजेति लिंगभद्रें : नवीं नवीं : ॥९२॥
कीं आरोगितां परमानंदु : उलंगिए[1] लाहाति प्रसादु :
तेणें सळें लिंगभद्रां आस्वादु : उपजतुसे : ॥९३॥
रचिलीं चंद्रसूर्याचीं मंडळें : ठाइं ठाइं तारागणे सोहोज्वळे :
कीं भीतरिं भरलेनि ब्रह्म गोळें : सविजे आरोगण स्थानीं : ॥९४॥
भंवते हांसळियांचे ठसे : निळिमा निर्वाळले पुंसे :
सुरंगा चांचुचे ठकारु कैसे : जैसे बोलतील कांइ : ॥९५॥

---

आपुलेपण = आप्तपण ॥४८८॥ ॥४८९॥

**एवं मदनास्थान ओंव्या ३४, प्र० ६२**

दृष्टींचें पारणें फेडावया रंगमालिका ॥४९०॥ ॥४९१॥

अरुवारे = सकुमारें । विचित्रा धातुची = पचरंगी भूमिगत पाषाणांची पाचरंगें । सपुरे = कुशलतेची । ओडवीजेति = रेखिलीजेति । लिंगभद्रे, कीर्तिमुखादि अपूर्वें ॥४९२॥

उलिंगीय = सेवकजन । सळें = अभिमानें । तेयां कीर्तिमुखास्वादु घेयावेयाची हाव उपजे म्हणोनि ते मुख पसरिले असेति ॥४९३॥ ॥४९४॥

हांसळियाचे = हंसाचे । नीळिमा = नीळेया वर्णाचे । पुंसे = रावे । सुरंगा = लाल चंचुयुक्त । ठकार = यथार्थ अवएवयुक्त आकार ॥ ४९५ ॥

---

१ उलिंगए

कीं मागां सुकाचां बोलीं : चरित्रें रूपांसि आलीं :
इयें देखौनि चित्रस्थ जालीं : तथें बोल कैसें : ॥९६॥
सरो हे उपमा श्लोकें[1] : जरि गुंपला[2] राहे चौकें :
जरि स्थान महिमा वरि टिके : बैसवावी असे : ॥९७॥
जेथ निरसा[3] पर गुणें : नित्य तृप्ता आरोगणें :
व्यापकाचीं बैसणें : जिए स्थानीं : ॥९८॥
जेथ निरवयवा मुख : आनंदासि भूक :
आत्मरमणा सुख : कीं रस सेवणें : ॥९९॥
ईश्वरीं स्वसुखा अनुभूति : रस सेवना केउती :
जरि अन्नब्रह्म हे श्रुति : बोलौनि गेलि : ॥५००॥
दंतोष्ट संपर्कीं : नलगे रसनेची नखी :
तीए ब्रह्मीं नपुंसकीं : देवा आवडि कैसी : ॥१॥
वसवीतीं कपाटें : डोंगरां देइजेति झटें :

मागा = द्वापारयुगी शुकाचा = शुकदेवाचा मुखें श्रीकृष्ण चक्रवर्तीचिअें चरित्रें रूपांसि आलीं । म्हणून तो शुक आतां चित्रीस्थ जाला = वेधें संभ्रमितु जाला मग बोलैल कांई ॥ ४९६ ॥

गुंपला = गुंतला राहे । स्थानमहिमा वरि टिके = जेवि मुद्रिकेवरि रत्नें खवणिंजे तेवी मुद्रिका स्थानीं ग्रंथ, रत्न स्थानी श्रीप्रभुची महिमा आन मूर्त्ति वर्णनाची प्रतिष्ठा करावी असे ॥ ४९७ ॥

निरसा = रसविरहीत· तथा निराशा = आशा रहीत होत सांतां ॥ आरोगणें = भोजन करणे ॥ ४९८ ॥

निरवयवा = अवअेवरहिता ॥ ४९९ ॥

केउती = कोठें लागे ॥ ५०० ॥

दंतोष्ट – दंत + ओष्ट = दंत आणि ओष्ट यांचें । संपर्की = युक्तत्वी । नखी = अल्प ॥ ५०१ ॥

कपाटे = योगासिद्धि कारणें कोहकी वसती । झटे = झगटणी । विवर = परमेश्वर

१ श्लेष वर्णके २ गुंतला ३ निरासो

परि यया वीवराचिए वाटे : जाणिवे रिगावा नाहीं : ॥२॥
असो हें भणिजताए तें आन : देखौनि आरोगण स्थान :
केलें साष्टांगीं नमन : भावो भरौनिया : ॥३॥
असों हें माझेया स्वामिचें : आरोगण स्थान श्रीप्रभुचें :
सेवितां जीव मुंचे : रांकडेपण : ॥४॥

प्र. ३४ भोजन पक्वान्न वर्णन ओव्या ३९

आसन सोरठा उर्णपटीं : पुढां मांचळी चौपुटी :
वरि प्रतिष्ठीला ताटीं : वोगरीति नानापरीसीं : ॥५॥
देवा करितां आरोगण : पूर्णचंद्रें लाधलें रवण :
तैसें ताटाचें चोखाळपण : विस्फुर्ति देखा : ॥६॥
सपुर सोजिएचें चोखट : फेडुनि सदळ कांठ :
तें कनकवर्ण वेंठ : वाढिजति मांडेयांचे : ॥७॥
निज किंकरीविए भुकें : जे वंचिलें वंचकें :
तें पक्वान्न पोळी भणौनि जवळिके : करूनए : ॥८॥
दोहीं मुनै सरिसे सतार : जैसे अमृताचे परांकुर[1] :

---

जाणिवेचा विचार ॥ कपाट तल्लक्षणे श्रीमुख । योगी तल्लक्षणे दशन । डोंगर झटे तल्लक्षणें अन्न चर्वीत करणें । विवर = कदन्नाचा विचार तल्लक्षणें वाट । जाणिवे रिगावा नाही = भोजन सारिलेआ ही परि दशनार्शी गोडी न लगे ॥ ५०२ ॥

भाउ भरौनि = हृदयीं सद्भावा साटउनि ॥ ५०३ ॥

रांकडेपणें मुंचे = रंकाचा आतिशय तें रांकडें = संसारपुनर्भ्रमा पासौनि मुंचे = मुक्त होय ॥ ५०४ ॥

एवं आरोगणास्थान वर्णन ओंव्या १५. प्र० ३३.

सोरटा — ऊर्णपटी = सोरठी जाडी ती ऊर्ण — रोमांची विणलेली. । चौएटी = चाकोर्णी । ताटी उगरांति = ताटांत पदार्थ वाढिती ॥ ५०५ ॥

रवण = अवकाश रूपतठाए । विस्फुर्ती = तेजाचा प्रसर ॥ ५०६ ॥

सोजी = रवा । सदट = ठेसर । कनकवर्णवेंठ = साकरमांडे ॥५०७॥५०८॥

---

1 अंकुर

ते मध्यें राजाऽन्नाचे वोगरः वोळगवीति[1] : ॥९॥
पहा तें थापिला : जो सोष्णु न न्हाए दाटिला :
आंगें घेतुसे उफाळा : सिंगेवरि : ॥१०॥
आकृति आणि परिमळें : जिंतलें मोगरे यांचें फुलें :
भगत[2] परि राउळें : कीं सेविजताए : ॥११॥
पूर्ण चंद्राचेनि पाडें : वाढिजेति शिखरणिचे वडे :
रुची छिद्रांचे परि आवडे : सर्वज्ञासि : ॥१२॥
दृष्टि चंचल परि एकसरें : जयामाजि वावरे :
बरवा गुंपली कीं न मोहरें : कांहीं केली : ॥१३॥
मीटिमीटि स्वर्ग देवा : पाताळीं पीयूषाचा ठेवा :
भणौनि तळौनि काढिला हावा : अमृतरूप : ॥१४॥
मोकळी मोतियें जाति पसरीं : भणौनि पायसें आळिली या
सरवळीआचीआ क्षीरी :
वरि पंच धारगौरी : आळंगी चोखाळपणें : ॥१॥
द्वीज पंक्तिची रचना : हारी हासे रसना :
तुह्मा उभएता लाग लागों देना : सेवितां मी : ॥१६॥
पूर्ण चंद्राचा अनुकारी : चोखाळपणें भाजिजे इडरीं :

---

मुनें = आणिआ । सतार = सरळ, उज्वल ॥ ५०९ ॥
सोष्णु—स = भान तो उष्ण दाटिलेआही न राहे ॥ ५१० ॥ ५११॥
पूर्ण चंद्राचेनि पाडें : पौर्णिमाशि चंद्राचेनि समानें । शिखरणीचे = दह्यांतील अथवा कढी आंतील वडे ॥५१२॥
वावरे = विचरे ॥५१३॥
मिटिमिटि--स्वर्गदेवा = स्वर्गाचेया देवता ही मृत्यु लोकींचे पदार्थ गिवसावेया टकमका पांति । हावा = हव्यास ॥५१४॥
आळंगी चोखाळपणे = तद्रूप होये निर्मळपण ॥५१५॥
द्विज--पंक्ति = दत ओळा । रसना = जिह्वा । सेवितां = भक्षितां ॥५१६॥

---

१ वोगरीजति २ भक्तांचि.

जरि तयां कळंकु अंतरीं : ये या निष्कळंका : ॥१७॥
सुप्रभा स्नेहवशें : भीतरि पूर्णत्वें असे :
वाढितां उदंबरें सरिसें : पूरिकांसी : ॥१८॥
कीं ब्रह्मण्य देवां पुढें : ब्रह्मपुरीसीं मांडे :
कीं कवचां लेइलीं कोडें : मीषें पुरिकांचेनि : ॥१९॥
कापुर गौरी चोखटः छिद्रांची परि नव्हे नष्ट :
त्रियंच नामधारी बरवंट : ब्रह्मपुरीसीं : ॥२०॥
गोक्षीर धार[1] धवळें : भीतरु भरला साकर गुळें :
कीं देवाचिये सन्निधी अमृतफळें : पावतें जालीं : ॥२१॥
ताटी तेचि गगनु : वटिका पूर्णचंद्राचें मानु :
भणौनि अमृत फळें तारांगणु : सारिखी दीसति : ॥२२॥
नाखिवा माळतिया साळिवें : इत्यादि वाळिवटू बरवें :
साटीं वाढिति सदैवें : सेवकजनु : ॥२३॥
सोलिवा तीळांचीं तीळुवें : गोडी मिसळौनि सेवै :
ते मोदकु आरोगितां देवें : गुळु थोडा भणे : ॥२४॥
बहुतां छिद्रांचिया : कीं सरिया रुपेंयाचिया :
तिया वाढिती कुरवांडिया : पर्पटेंसीं[2] : ॥२५॥
स्यामें पीतवर्णें : वाणिया जिंतलें सोनें :

---

इडरी = धिडरी, धिरडे ॥५१७॥
सु–प्रभा = प्रभेसहवर्तमान । स्नेह = तूप, तेल । उदंबरे = उंबरे ॥५१८॥
ब्रह्मण्य–देव = ब्रह्मण्यधर्माचार्य श्रीप्रभु ॥ ५१९॥
कापूरगौरी = श्वेत । चोखट = निर्मळ । त्रियंची नामधारी = धारी ॥५२०॥५२१॥
ताटं तल्लक्षणें गगन । वटिका = वडा ॥५२२॥
नाखिवे = नखुली । मालतिया = मुरडिवा । साळिवे = सरवळी५२३॥ ॥
मोदक = लाडू ॥५२४॥
पर्पट = पापड ॥५२५॥५२६॥

---

१ धाम  २ परपटेंसी

भणौनि वालाचीं तुकें हीनें : तीयें तेथ बोलों न एति : ॥२६॥
जैसीं माणिकुलीं पिळिलीं : तैसें गौघृत पात्रें पुरिलीं :
सद्यस्तप्तें परि निवालीं : देवाचां ठाइं : ॥२७॥
नानारुची केली उपेणी : कीं पाचि प्रभेची वाणी[1] :
कीं माधुर्यावरि सांघनी : अन्ये रसाची : ॥२८॥
आरोगणेंचा अवसरू : धुरेवीण मांडे ना गजरु :
भणौनि आग्रहें सर्वेश्वरु : आनु धाडीति : ॥२९॥
दोहीं विभागीं कुसंबीरी पत्र शाकें : रूप सस्नेह भर्जिकें
अभावीं मागिजेति वृथा कें : सर्वज्ञ रायें : ॥३०॥
ऐसीं पक्वान्नें राज योग्यें : जियें राउळांसि भोग्यें :
कदन्नें आभाग्यें : भणों आन कांई : ॥३१॥
सम बुद्धि ईश्वरीं : भणाल जवळि एकें कां दुरि :
भणौनि कानवले थेटरी[2] : भाकरी मागिजति बळें : ॥३२॥
जंत्रिचे निरसना झांजरे : लागलेया न मने भीतरें :
कीं तेआंलागि गीवसीजति[3] घरें : धान्यवंतांचीं : ॥३३॥
रस पाकाचिया आवडी : तें तेंचि निज किंकरि वाढी :
तरि नांव एकि खोडी : ठेविजे कां : ॥३४॥

गौघृत = गाईचें तूप ॥५२७॥

उपेणी = राहावा । माधूर्य = गोडी । सांघनी = घालवी, आडी ॥५२८॥५२९॥

अभावी—अवकाळी, भावरूप नसतां एवं आम्रफळे तथा अलर्कवसा = तरवटाची भाजी ॥५३०॥

कदान्नें = कुत्सितान्नें ॥५३१॥

ठेटरी = लाखाची ॥५३२

धान्यवंताची = अन्नधान्याची ॥५३३॥

खोडी = आबाईसाचें नाम ती नागदेवाचार्यांची माता धर्मास मूळ कोळरूप ॥५३४॥

१ ठाणी २ तेठरी ३ सोधीजति

दधि दुधें तक्रें : कढिया कालवणें विचीत्रें :
निज दृष्टी होति पवीत्रें : प्रसादा लागि : ॥३५॥
जेथ रुचि नाहीं थोडी : जे अन्यरसांतें झोडी :
आत्मरमणा गोडी : उपजविताए : ॥३६॥
जरि तीए सामसाखे सदैवं : मज पांतां परतिजे सेवे :
बावन रुपवेधाचें मूळ सभावें : भणौनि साच भणों : ॥३७॥
निर्दोषें निर्मळें : जाण सरोवरिचेनि जळें :
गुळळा कीजे राउळें : आरोगणांतीं : ॥३८॥
चंदनें श्रीकर उल्लाळिले : वरि उष्णोदकें प्रक्षाळिले :
सवेंचि निर्मळा आंचळें दाटिले : सेवकजनीं : ॥३९॥
नेलउती [1]केउल चोळीं : सपुरां फोडी कर्पुरादि परिमळीं :
घोळिलेया श्रीमुख कमळीं : ॐळगवीजति : ॥४०॥
कापुर वेलीची चोखडी : उजळिली परीवडी :
तेही सकर्पुरी वीडी : विराजिता श्रीमुखीं : ॥४१॥
जेथ लवंग जातीफळ एळा : कात गोळिया सुपरिमळा :
तिआं परतलिया तांबुळा : हात वोडवीती निज किंकरा : ॥४२॥
स्मरतां तें आरोगण : सुरस जालें अंतःकरण :
तंव पुढां देखिलें सुलक्षण : देवाचें निद्रास्थानु : ॥४३॥

---

कालवणें = जेतुलीं कालवीजेति तियें अनेका परीचीं ॥५३५॥५३६॥
शामशाखे = तरवटयाची भाजी। बावनेरूप = पीत्तवर्णा अंकुर तथा पुष्पा॥५३७
जाण सरोवर = जाणाळे तळें ॥५३८॥
उल्लाळिले=ऊटिले, माखिले । अचळें=सपूरा वस्त्रें। दाटिले = परिमार्जिले॥५३९॥
नेलउत्ती १, केऊल २, पोळी ३. इये तीनी सुपारियेची देशाउरें ॥५४०॥
कापूर वेली = पानांची जाती पैकीं । उजळैली = पीकलेलीं पानें ॥५४१॥
जाति फळ = जायफळ ॥५४२॥

---

१ मांडी २ चेउल.

प्र. ३५ मंचक वर्णन ओव्या ६

अंश सेवटीं एकीकडे : अनंतें हारपैलीं ब्रह्मांडें :
तो देउ चक्रवर्ति पहुडे : जिए मंचकीं : ॥४४॥
तंव पुढां देखिला मंचकु : भणों चौपाइ शेषू :
कीं तो भाट भणौनि सुतसे नीकु : जीवितासी : ॥४५॥
मज पांतां मंचकु : जैसा सप्त ऋषींचा चौकु :
परि उचावता त्रीकु : तरि प्रभु स्वरूप भणतां : ॥४६॥
आगम ठाउ ए जेथें : साम वेदादि गाते :
सत्वाचेनि पाटसुतें : वीणिला जो : ॥४७॥
शुद्ध सांभव वेधाचिए खोळें : विश्व कापासि उजळे :
तया आस्तुरणांवरि पासवडा निर्मळे : ब्रह्मविद्येचा : ॥४८॥
जो सकल साधनां अवघडु : आगम निगमा गुढु :
तो आत्मवसन करी पहुडु : जेयांवरि : ॥४९॥

---

सुलक्षण = सुष्ठु लक्षणवंत ॥५४३॥

**एवं भोजन पक्वान्नवर्णन ओंव्या ३९. प्र० ३४**

अश = माया । सेवटी = रोमकूपी ॥५४४॥

भाट = पवाडे वाणिते । शेषु = शेषशय्यावत पर्यंक ॥५४५॥

उच्चावत त्रिक = सप्तर्षि पैकी मागीला तीनि चांदणिया तिया बाळानेंवत्त, त्रि अकारक पुरस्थ ॥५४६॥

आगमे तल्लक्षणं च्यारी ठावे । सामवेदादि तल्लक्षणें चारि गातें । शुद्ध सत्व = अष्टभयेरत्र तल्लक्षणें तयाची विद्या तेचि पाटसुतें ॥५४७॥

शुद्ध सांभव = चैतन्याची विद्या तल्लक्षणे खोल = गवसणी विश्व=विश्वेची विद्या तल्लक्षणें कर्पास = कापूस तेणे उजळे = कारणांचे मळ देखे । तेया आथरूणांवरि. ब्रह्मविद्येचा पासवडा एवं आच्छादिता ऐसा ॥५४८॥

अवघड — पावावया अशक्य । निगम = वेद । गूढ = गौप्य ॥५४९॥

**एवं मंचक वर्णन ओंव्या ६, प्र० ३५**

---

१. आतमरमण

प्र. ३६ श्री प्रभुमूर्ति वर्णन ओव्या ६२

**कव्हणीं वेळीं निजप्रवृत्ति : पद्मासनीं आरूढें जीव-पती :**
**ते आपादतळ मस्तकु श्रीमूर्ति : वाणावेआ मति कैची : ॥५०॥**
**आनंद रंगाचां बोजां : उपमा वर्गु न ए सहजा :**
**तो मोसु श्रीचरण पंकजां : जवळि दीसे : ॥५१॥**
**कीं पूर्व पश्चिम दीशा : संध्यारागु मांडिला सरिसा :**
**तोहि उपंढरु ऐसा : मज वाटतुसे : ॥५२॥**
**इंद्रगोप धुतले पाउसें : पद्मरागीं जडत्व असे :**
**जावडी देखौनि न मुसे : कुंकुमपणें : ॥५३॥**
**आगाधत्व देखोनि अधिकें : ओळगे आलीं सामुद्रिकें :**

---

आरूढ = उपाविष्ट । आपाद तळ–मस्तकु = श्री चरणां पासौनि श्रीमुकुटा पर्यंत ॥५५०॥

आनंद रंगाचा = आनंद रस तल्लक्षणे रग तेणे मायेचे पुर = मनुष्य वेषे रंगला उपमावर्गु = उपमेचा समूह । न ये सहजा = श्रीप्रभुचिया चरण कमलासि द्यावेया उपमा न जोडे । मोस = मार्ग, उपमेचा किंचित् दिसतुसे तें कांइसेनि ना जीव देवतांची पंचविध लक्षणें स्वीकरीनिली असेति, तरि तिंअें कवणें १ आन्वैके, २ उपमिते, ३– दैविके, भावे गौणिके. ४– शात्तिके का अनंतशक्ति-युक्तपरमेश्वर. ५– अतीशये, भावें स्वारूपिकें ऐसा पांचापरि मार्गु दिसतुसे । पंकजा = श्रीचरण कमला ॥ ५५१ ॥

पूर्व–पश्चिम = संध्याराग, अरुण राग एवं उभय आरक्ततें पेक्षां श्रीचरणांचा रंग । मांडिला = शोभला । पुन तोहीं उपंढरू = प्रातःकाळीं शुभ्र होय एवं आरक्तता नुरेची ॥ ५५२ ॥

इंद्रगोप = मृग नक्षत्रीं आरक्त कीटक, मखमली लाल किडे । पद्मराग = तो आरक्त रत्न, माणीक । जावडी = हीन । कुंकुम तोही मुसे = मूर्छित होये ॥ ५५३ ॥

सामुद्रिकें = सामुद्र शास्त्रोक्त लक्षणें ॥ ५५४ ॥

तीयें पदस्थ जाली कवतीकें · श्रीचरण योगें[1] : ॥५४॥
मन लागौनि बुधीचिए कासे : श्रीचरण वाणावेआंचेनुमुखें[2] :
आतां प्रमई खुंतलें असे : मागुतें निगावेआ ॥५५॥
निज प्रवृतिचेएनि ओलें: चैतन्यां डीरू निगाले :
तैसीं नखाचेनि मीषें[3] फुलें : श्रीआंगुळिकीं : ॥५६॥
कीं अंगिका अंगुष्ठद्वया जवळें : गर्भिचेया लावण्या आठांगुळें :
भणौनि पूर्णचंद्र बैसविले : [4]सह पंक्ति : ॥५७॥
निजपदिचेनि ओलें : सोनें पीका निगालें :
तें एकवंकीं सासिनलें : श्रीचरण क्षेत्रीं : ॥५८॥
उपणितां रासि थोरी : माप करोनि वैखरी :
कणु एकु सांटवीति हृदया आंबारिं : परमार्थिए : ॥५९॥
समीप वनस्फुरा : ते ह्मणौ भक्ति क्षेत्रिचा धुरा :

---

प्रमय = बधकरावेया । खुंतले = वेचले । नुमुखे = उमस नेघे ॥ ५५५ ॥
डीर = अंकूर । नखें = फुलें ॥ ५५६ ॥

आंगिका = आंगूलिका । अंगद्वया = दोनि अगुष्टाजवळीं । गर्भीचिया = आठांगुलिकांचे सांधे । आठांगुळें = दोनि अंगुष्टाविरहिता आठांगुलिया । पूर्णचंद्र तल्लक्षणें नख तेजोमय तें, सुपंक्ती = श्रेणि बद्ध ॥ ५५७ ॥

निजपद = श्री चरण तल्लक्षणें ओल। स्मरण तल्लक्षणे सोनें। पाठ भेदें. निजरूपें स्वरूप तल्लक्षणें ओल। सोनें तल्लक्षणे पूर्वाधिकार तें बीज। ते एकवंकी = आघवेआं कोडियांची तल्लक्षणें श्रीचरणीं एकवंकी = पादभूषण। सासीनली = भरें पीकेली मग तें पीक ज्ञानिया कां भक्ता जालें ॥ ५५८ ॥

उपाणिता रासि थोरी = ईश्वरें मनुष्यवेष मायावेषें भूस उपणनिलें। मग केवळ परात्पर केवळ गाभियांची आठवण ते कण। वैखरी तल्लक्षणें पायली। मग एकांतीक भक्तहृदये तल्लक्षणें आंबारी साटाविलें एवं अव्यक्त ध्यान श्रेष्टत्व ॥ तथा उपणितां = स्मरण करितां। रास = मनचांचल्यता एकवट करणें तल्लक्षणें भूस। ईश्वरू लेखीलागे तल्लक्षणें कण = धान्य. वेखरी तल्लक्षणें पायली ॥ ५५९ ॥

वनस्फुरा = विस्ताररूपा भक्ती तल्लक्षणें क्षेत्र तेयांचा धुरा = मर्यादारक्षक। जेथ=

---

१. श्री प्रभुरायें  २. नि मीषें  ३. नुमासे  ४. सुपंक्ति

**जेथें मार्गु निगे पुढारा : मुमुक्षुसि : ॥६०॥**
**समस्त गुल्फाचा उंचवटा : श्रीप्रभुचिया पायवटा :**
**पांतां नलगे ताठा : संत त्रइयांसी : ॥६१॥**
**सरळिया जानु : मीं बरवेपणें[1] नेणे वाणुं :**
**उंचपणें देति मानु : जंघद्वया : ॥६२॥**
**जघन जानुचिया संधी : मध्यें कुंठालिया बुधी :**
**चाकीं भ्रमतां अर्थ सीधी : न पवतीचि : ॥६३॥**
**वरि समस्त उरु : जथ कामु न लाहे क्रिया करूं :**
**उपवासु[2] जालेया जागरू : नाहीं[3] तयां : ॥६४॥**

---

जेया धुरापासाव. मार्ग निगे पुढारा = भक्ति करूनी वैराग्य ते चरीत होये। मुमुक्षुसी मोक्षार्थियांसी ॥ ५६० ॥

गुल्फ = घोटें । पावटा-ओहटळ । पाठभेदें ( पायवटा = पाचाही मुख्य शिरांचा सांगातु )। ताठा = कळा बियावरी मृदुमय असे एव कळाविया वरी तीनिरेषा तिया त्रितापा नाशती । सत = पवित्र तथा संत = सात आणि त्रइ = तीनि एवं दशांगुशी । सत्पथी जो वेद तो त्रई = भेदाभेद कर्म तथा त्रिगुणात्मक पांता परमेश्वरस्वरूपांतु न कळे भणऊनि तेया ताठा = ते ताटस्थें राहिलें । तथा त्रई = ज्ञान भक्ति वैराग्य युक्तांसी अगम्येची । तथा अपरोक्ष सामान्य विशेष ज्ञानियांसी ही ॥ ५६१ ॥

सरळा = नीट नितळा । जानु = चाकिया खालुतिया । जघ-द्वया = दोही जंघासि मान देती ॥ ५६२ ॥

जघन आन जानु या द्वयांचा संधी = सांदा एवं चाकी। कुंठलिआ = राहिलिया तु कां ना माया तल्लक्षणें चाकीं तियें स्थलीं जो भ्रमणीं पडिला तेआ अर्थसिद्धि न पवेची ॥ चाकी = कृपादि शक्तीसमूह तल्लक्षणें चक्र तया वरि जो पडिला तो मुंचला । तेणें देवताचि अर्थसिद्धि न होअेची ॥ ५६३ ॥

समसा = समा । उरू = मांडिया। काम = मदन तेयांची। क्रीडा = रजरूप वर्तन तेआ । उपवासु = ब्रह्मचर्य व्रताची प्रवृत्ती । जागरू = रजोद्भव होॐ न सकेची ॥

---

१ मीरवेपण २ जवळीक वास जालेयाही जागरू ३ न ल्हायेचि तो.

**कीं नसतां संसारा : पुरुषार्थ तीसरा :**
**लुपौनि राहिला माजिवास्थारा : जंघ द्वइं : ॥६५॥**
**कटि प्रदेश सांवळा : वरि वेढिला पाटौळा :**
**जो पाहों नसरे डोळां : ब्रह्म वीद्येचा : ॥६६॥**
**कीं परब्रह्मा उदासु : जगीं घालितां कासु :**
**सौंदर्या आनौंति वासु : पाहों नेदी : ॥६७॥**
**नाभि सखोल सुंदर : ना तो मायापुरीचा भंवरा :**
**दार्टातुसे भीतरा : तरतेयांतें : ॥६८॥**
**नाना मार्गीं सैंबी : नागाविले याची केली नाभी[1] :**

उपवासु उप = जवळिके, वास = विषयांचा राहावा असतांही = पुरुषत्व पूर्ण असतांही परि रजा ठाउनि नाहीं ॥ ५६४ ॥

संसारा = समृद्धि असोनि परंतु ब्रह्मचर्याची प्रवृत्ति अंगिकारे । पुरुषार्थु-तीसरा = काम तो लुपौनि राहिला । जघद्वई । अन्तरा = मध्यभागीं, गेहामध्यें, वस्त्राच्छादीत एवं श्रीप्रभु सान्निधी कामु तो विश्रामालागीं आला ॥ ५६५ ॥

पाटौळा = पटनिर्मीत वस्त्र ॥ ५६६ ॥

जगा उदास होतसातां ही फुण अविद्यादि बध नासावया कास घाली । सौंदर्य = सुंदराचा अतिशय तेणें । आनौति = आणिकीकडें पाहों नेदी ॥५६७॥

नाभी = ना भी एव संसार आवागमनादि भया पासौनि निवर्त्तवीति । तथा-नाभी सखोल-एव खोल असून मुरडीव । मायापुर तत्क्षणें नइचा पूर, तेयांतु । भंवरा = आवर्त तो दाटीतसे = अर्हातुसे । भीतरा = आपुलिआ जीवोद्धरण वेषणा भीतरा । तरतेआंते = संसारा बाहीरि न पडती तेआंतें । तथा तारीतेआंतें = जे-ही सर्वसंगु परित्यजौनि ईश्वरा अनुसरण तत्क्षणें पेटी बांधिली ते ना भी एणें वचनें संसारा पासौनि मुंचिले ॥५६७॥

साहित्यार्थ-नानामार्ग = अनेका चोर वाटा । सेंबी = दगडा खिळ्यांनीं युक्त तेथें पांतस्था नागउनि मग खिळेंनि तेयाते दाटिती, तेथें चोर बैसौनि वाटा-घेति । तेथें ना भी ऐसा कवणु वदे ॥ सिद्धांतार्थ-नाना मार्ग = सकलाही देवतांचे अतर्यागु बहिर्यागु, भावादि साधनें तत्क्षणें अनंता वाटा एवं बहुता साधनाचे

१ उर्मी

**तेथ जीव देवतांचा बोंबी : कवण[5] वांचे : ॥६९॥**
**उदैजेति परबिंबीं : काळि कोळिगा राहिला कोंभीं :**
**तेथ प्रभुते भणिजताहे नाभि : अमळ त्रयातें : ॥७०॥**
**तेआं नाभि मंडळा आगाधा : समवेत ब्रह्मं पेलिलें दोंदा :**
**तेथ भीतरि भरलेया आनंदा: सामानुक सायासु : ॥७१॥**

---

तिखटे। सेबी = वाटेचा मध्य पावावयांचे परि भयानकें स्थळें ऐसा स्थळीं पावला पुरुष तो देखता विघ्नें नागविला = साधनाचा अती तथा फलाचा अंतीं देवता अंतिके संपादीति ऐसी ते बोंब जाली. तव ना भी ऐसा कवण म्हणे एवं बोंबिते जीवां देवतांची कां पां देवता निष्ठुरा आणि जीवु तरि जीवांचा आहारु होती ॥ नाभी ते खोल, बोबी—बेंबी ते सपाट, सेंबी ते वरी उंचवट बोंबटयुक्त ॥५६९॥

साहित्यार्थ—उदैजेति = चंद्र उगवलेया। कळी = सूर्यकमलनीची कळी। कोळगा = भ्रमर। राहिला कोंभीं = कमलदलांतु गुंपौनि राहिला। प्रभु = सूर्य तो उगवला तेणें तो भ्रमरा नाभि कारू दीह्नला एवं सूर्योदयीं सूर्यकमल विकासलें तेणें तो भ्रमरू बंधनापासौनि मुक्त जाला। अमलत्रय = तीहि काळीं ॥ सिद्धान्तार्थ—उदैजेति परा बिंबीं = परमेश्वर सृष्टीं अवतरण जाला। कळी = कलीयुग। कोळगा = कली दोख एव चौकडी नरक। राहिला कोंभीं = तीनि दानें रेविला तथा सकला असंता प्रतिबंधिला। तेथ प्रभुत्व = संपूर्णत्वे उभय दर्श्या अवतार। ना भि = ज्ञान प्रेम देऊनि जीवा नाभिकारु देतां जाला अमलत्रया ते = नाम वेध, मूर्ति वेध, मार्ग वेध. तथा—अविद्या, आदिमळ, सलग्न—भावे चरम देह = सुवर्ण देह. तथा—तीनि ज्ञानें एवं परमेश्वर विरुद्ध धर्म आंगिकरूनि तेआंचें चरीत करीति ॥ २—उदैजेति = सूर्य उगवलेआ। कळी कोळगा = कलहो कर्ता अथवा धनापहारु करिता कोळी मार्ग अवरोधौनि राहिला। कोंभीं = वनीं, डांगेआंतु, गृहाआंतु ऐसा तस्कराचरणु करितां तेथें। प्रभु = राजा तो प्रजाजना, भयभीता जना। ना भी = भय मानों नका एवं निर्भयत्वा मार्गाचा कौल देतां जाला। अमल त्रयातें = प्रातर्मध्यान सायंकाळातें एवं त्रिकाळीं मार्ग क्रमों लागीनिले ॥५७०॥

मंडल = प्रांत। अगाध = गाध कळेना। ब्रम्ह पेलिलें = उंचावलें दिसे

---

५ नाश कवण भणें

प्रेमिए भक्तीचिया वाटा : गीवसितां लपे कैवल्याचा आव्हाटा :
तो अभयें आला पोटा : श्रीप्रभूचेया : ॥७२॥
भीतरि सुखा अवटिाः श्रीमूर्ति मंडपाचा दारवठा :
जतनें आड केलें[1] कपाटा : तैसें निट वक्षस्थळ : ॥७३॥
हृदइचेनि ऊलें : सुखा अंकुर निगाले :
तैसें स्तोम मीरवलें : रोममीषें : ॥७४॥
कीं भीतरि औदार्ये वसे : तेथ लोवसपण कांइसे
भणौनि बाहीर नीनिले तेणें मीषें : हों काजू : ॥७५॥
कीं नाभि मंडळा पासाव : रोमराजीची बरव :
उर्ध्वै येता ये खेवा : साजात्येंसीं : ॥७६॥
आतां उच्च समस्थळें : भणों स्कंद युगळ :

---

दोंद = उदर। तरि दोद का पां उचावले ना भीतरी भरला जो आनंद तो समावेष करावेआ कारणे ॥५७१॥

प्रेमिअे भक्तीचिआ वाटा = प्रेम भक्तीचेन मार्गे जातां । गिवसितां = सांपडवितां । लपे कैवल्याचा आव्हाटा = कैवल्याची वाट चुकौनि आडवाटे पडे आन कैवल्यमार्गाची सरळ वाट लोपे। तरि ती कां पां लोपे ना तेआ भक्तांचें आचरण यथाज्ञान घडे भणऊनि तेआ भय नाही. एव तेआ मोक्ष तऱ्ही होईल, मार्वे उपाअें प्रेम चाविजैल यदर्थीं नाभी असे ॥५७२॥

अविट = विटेना। श्रीमूर्ति लक्षणें मंडप। हृदय लक्षणे दारवटा। जतनें=आनंदा यत्ने करावेआ। वक्षस्छल = कपाट आड केले कां जैसें। नीट = नितळ ॥५७३॥

हृदयांचेनि सुखें=हृदई जी प्रसन्नता तेआंचेनि ऊलें। सुखा अंकूर निगाले = जे विश्रान्तचैतन्य तेआ अति सुख झालें भणऊनि अंकूराचेनि मिखें बाहीरि निगाले स्तोम=गुच्छ, समूह ॥५७४॥

लोवसपण = अज्ञानपण, कृपणपण, कुटीलपण। नीनिले = बाहीरा घातले। हो काजू = मज पांता ॥५७५॥

रोम–राजी = रोमाची श्रेणी। खेवा = भेटीस। साजात्येंशी = खाड रोमाची

---

१ अंडिलें

**पुढां भुजा-दंड सरळ : उदार ते : ॥७७॥**
**नरदेहधारी : अवतरिजे [1]नगरीं :**
**जरि कृमितें ब्रह्मवीदां करी : ऐसा श्रीप्रभुचि होए : ॥७८॥**
**आणीका शर्त्री सुर्पी : आळि बनी सुरापि :**
**श्रीप्रभूचां करपुर्ष्पी : कैवल्यफळ : ॥७९॥**
**कर्मवसें जीव साधारण : पावति जे सर्वगात्रा प्रमाण :**
**ते परदेवाचे वाणितां सगुण : मज बोलवैल कांइ : ॥८०॥**
**परि नव्हे सुहावी : अज्ञानाची वाचा बरवी :**
**कीं माउली कांइ न बोलवी : बाळकां करवि : ॥८१॥**

---

दोनी एकची जाती ॥५७६॥

स्कंध = खांद । युगळ = दोनी । सरळ = नीट, ओहरते । उदार ते = चतुर्दोना उदीत जे ॥५७७॥

नृ देहधारी = मानव देहीं अनंते ईश्वर अवतारे असेति तरि श्रीप्रभु हे । कृमीते ब्रम्हविदा करी = कृमी = क्षुल्लक देहाश्रीत जीवा ब्रम्ह जे माया ते आदिकरौनि यक्षणी पर्यंत सकलांची फलें देति । अथवा कृमीते = ज्ञानियाते । ब्रम्हविदा करी = ब्रह्म = सब्रह्म तेथ प्राप्ति करी ॥५७८॥

आणिका अवतारा ते—शर्त्री = श्रीकृष्णचक्रवर्ती । सूर्पी = श्रीचक्रपाणि एवं द्वारावतीकार । सुरापि = सुरापै = श्रीदत्तात्रेय प्रभु । आलिंबनादि = श्रीचक्रधर तथापि श्रीप्रभुचा करपुर्ष्पी कैवल्यफळ = श्रीप्रभूते टाळी वाऔनि गगनाची वास पातु दश वीस तीस गणना करिताची अविद्या छेदौनि कैवल्यपदा अर्पिती. ऐसे श्रीप्रभु थोर ॥५७९॥

सर्वगात्रा—प्रमाण = सर्वदेहा श्रेष्ट जो शिर एवं श्रीमुकुट तो मज स्तावक नारायणा वाणवैल कांई एवं सर्वगुणीं युक्त शिरकमल तो वाणवेना ॥५८०॥

सुहावी = सुष्टु हावावरूप । वाचा = वैखरी । बरवी नव्हे = उपमा साहित्यालंकार श्लेषादि युक्त नह्वे । परि माउली = जीवमाता तियेचिया प्रसन्नते ती बोलवी । बालका = अज्ञाना ॥५८१॥

---

१ अवतारीं

भीतरु भरला आटा : आदि शंखाचेया सेवटा :
तो श्री गोविंदप्रभुचेया कंठा : कांइ उपमा पावेः ॥८२॥
भीतरि नसतां रक : लोक प्रसीध वाजविति संख ;
तो परमार्थ नायक : उपमु केवि श्रीकंठेंसी : ॥८३॥
आनंदामृत लिंग वरि : श्रीमूर्ति प्रासादु सुत्रीं[१] :
पर जाणिवेचा कळसु वरि : ठेविला जैसा : ॥८४॥
चौघा मेळौनि पांचवा : तया हरि चंदना करुनि चढावा :
ते बावने ॐळगवीजे देवदेवा : प्रतीदीनीं : ॥८५॥
ते श्रीकंठीं चर्चित पातळ : ॐळगवीजे साखळे नसी माळ :
जे परीमळाचे वेलाउळ : सार ग्राहिकांसी : ॥८६॥
सोनें परिणामलें सांखळें : कीं साडे पन्हरें जालें कडिवळें :

---

जेया शंखा आद्यन्तपर्यंत आट = पीळ असे तेआ शखाची उपमा श्रीप्रभुचेआ कंठा केंवि देॐ ॥५८२॥

शंखा भीतरी जीवत्व नसतां लोक वाजवीति तेणें जना रजवीति असे असतां तेयांची उपमा श्रीकंठा केवि घडे ॥५८३॥

आनंदामृत-लिंग = आनंद तल्लक्षणें अमृत तेआंचें लिंग। पाठभेदें-आमंदामूर्ती लिंग = आनंद मवला नाही तल्लक्षणें लिंग। श्रीमूर्ती प्रासादु = देऊळ। सूत्री = श्रीमुकुट तो सूत्र। परजाणिवेचा कळसु वरी = परमेश्वराची जाणीव कर्ती परावाचा तल्लक्षणं तो श्रीमुकुट कळस शोभे ॥ ५८४ ॥

चौघा मिळौनि—१—कापूर, —२ कृष्णागरु, ३—कस्तुरी, ४—कापूरचीनी तथा १—केशर, २—अगर, ३—कंचौळ, ४—कस्तुरी.। पांचवा हरिचंदन। चढावा = पुढें देऊन ऐसें संमिस्र तें बावन तयाचे परिमळ—ते देवा प्रतिदिनीं ॐळगविजे ॥५८५॥

चर्चीत = मर्दीत। माळ = पुष्पाची माळ। वेलाउळ = मुख्य पेठ। सारग्राहिक = ते श्रीप्रभु ॥ ५८६ ॥

---

१ क्षेत्रीं

भणौनि अंगिकरिलें राउळें : आंगाजवाळि : ॥८७॥
लिंगत्रया अतीतु : अवक्रीये अनंतु :
तें परब्रह्म आलें पुरुषार्थु : स्मश्रुकुर्च मीषें : ॥८८॥
जैसिया जंत्रीं काढीलिया : इंद्रनिळांचिया सरिया :
तैसे वेल्हावते दोंदा वाऱ्हिया : कुर्च नाभि चुंबीत : ॥८९॥
दंतोष्ट रसना : नरलोक वाक् साधना :
जरि परेशा पासाव ब्रह्म भुवना : ययावेया श्रीमुखाचि एकू : ॥९०
ब्रह्मविद्ये झगटैली : परा चाचरैली :
तैसी वेंभळ बोली : जिए श्रीमुखिची : ॥२१॥

---

सोनें परिणामलें = जेया सोनें ऐसें नाम होतें तेआ परिणामें सांखळी ऐसें नाम जालें, विकरलें, आन सारिखे जालें, विस्तारिलें तथा खोटबद्ध जालें । साडे पंभ + साडेपहर = तयाते ४ नी गुणिलें भणिजे ते ६२ कसाचे होति । कडिवळें = कडिआ करौनि राहिलें, कडेचें लेंकरूं, साडे पहर जें होतें तें हीण कस जालें यदर्थी दुःखि जालें म्हणूनि श्रीप्रभु राउळे तेया आंगिकारलें ॥ ५८७ ॥

अविक्रयु = विकरेना । परि तेणें स्मश्रु कूर्च = मिशा दाढी पुरुषार्थ लक्षणें जटा भारादि आंगिकरिलें ॥ ५८८ ॥

इंद्रनीळ तें रत्न जातीचे तेआ रत्नाचे जंत्रातौनि जैसे कां तारच काढिले तैसे श्री प्रभुंचे कूर्च रोमराजी नाभि–चूंबीत कळाप एवं नाभीसी चुंबन देताति ऐसें सरळ लांब ॥ ५८९ ॥

दंतोष्ट रसना = दंत + ओष्ट आणि जिह्वा । नृलोक वाक् साधना = मानव लोकीं वाचेंचे साधन आठयुक्तत्व आंगें असावेति । तैसें परदैवाचे नव्हेत परावाचे पासौनि ब्रम्हविद्या निरोपीति तेणें–ब्रह्मभुवन जे अव्यक्त तेथें पावावेआ श्रीमुख कारण ॥२– ब्रह्म = शब्द ब्रह्म तें अंतःकरणा यावया = यथार्थत्वें उमटावेआ श्रीमुखें परा बोळलीं अक्षरें ॥३–परेशापासाव = परा = प्रकृति, माया तिजेचा ईश तो परेश ते- आचेआ परे वाचे पासौनि जीवा बोध तो शब्दब्रह्म तल्लक्षणें भुवन तेणें ईश्वर स्वामि जीव भृत्य उमटावेआ श्रीमुखकारण ॥ ५९० ॥

ब्रह्मविद्ये झगटैली = ज्ञानशक्ती परावाचेसी स्पर्शिली तेणें परा चाचरैली = वेंभ-

निज संनेधी वीण : सदैव पावताति मरण :
भणौनि प्रथम पुरस्करिति या खुणा : मज पांता : ॥९२॥
आतां कैसा भणों नाशावंसु : जो सर्व अवएअंचा कळसु :
प्राणनाथेवीण उसासु : घालीति जेथें : ॥९३॥
भणों तें जगाचें जीवन : भणौनि पातलें सन्निधान :
तया वावरावेया भुवन : रचलें जैसें : ॥ ९४
कपोलांचें वर्तुळपण : भणों ज्ञान प्रेमाचें दर्पण :
जैसें निज बरवेंपण : पाहींवेआ : ॥ ९५ ॥
नेत्राचेनि बरवेंपणें : जरि नाहीं आपणपें देखणें :

---

ठेली ॥ २—ज्ञानशक्तीचा स्वीकार नाहीं म्हणौनि ज्ञानशक्तीचे झगटणी करौनि परावाचा चाचरी गेली ॥ ५९१ ॥

निजसन्निधीविण = ईश्वर सन्निधी वांचौनि । पावताति मरण = देवताही चतुर्विध कर्मफळीं घातले ते मेलेचि । पुरस्कारीत = मेली एणें नामें सबोधीति तेणें अनाधिकारा नासौनि अधिकारा अशंसीति । तेआ खुणा मेली वदती ते मरण चुकवावयाची बोली ॥ ५९२ ॥

नासा- वंश = नाशिका वंशा सदृश्य सरळ । कळसु = सकळ अवअेवांमध्यें श्रेष्ठ कां अेणेंवीण मनुष्य अप्रयोजक । पाठांतर- कसु = कसवटी एवं मनुज स्वरूप दर्शनाची परिक्षा । प्राण = प्राणवायु नाथेंवीण = स्वामीवीण । उस्वासु = परमेश्वरेविण श्रमले म्हणौनि नाशा वंशीं स्वासोस्वास घालीति ॥५९३ ॥

तो प्राणवायो जगांचा जीवन जाला म्हणौनि तो श्री प्रभुचा सन्निधान पावला वावरावेआ = विचरावेया नाशीक लक्षणें भुवन तेया मीनलें। २—तें परमेश्वरस्वरूप जगा = सकळ जीवमात्रा जीवनरूप जालें म्हणौनि स्वासोस्वासीं सन्निधान केलें ॥ ५९४ ॥

कपोल = गंडस्थळ। वर्तुळ = वाटोळें । दर्पण = ज्ञान प्रेम तत्क्षणें दोनि आरसेचि कां जैसे । निज बरवेंपण = स्वरूपीचें संपूर्णत्व पाहावेया ॥ ५९५ ॥

नेत्राचे बरवेंपणें असौनि आपणपें देखणें नाहीं तैसें श्री प्रभु आपण अवर शक्तीचेनि स्वीकारें पर देखणें नाहीं ऐसें असतांही—आत्मदर्शन = परशक्तीस्वीकारें

**तें श्रीप्रभूचेनि आत्मदर्शनें : मोडिपलें : ॥ ९६ ॥**
**मज पांतां ते डोळे : दावीति जीवा सुखांचे सोहळे :**
**अवलोकौनी परम मंगळे : पातले जे : ॥ ९७ ॥**
**ते वस्तु शब्दातीत निर्गुण : तिआ अंगिकृत उभय श्रवण :**
**आतां बोलाची साठवण : करावेआ : ॥ ९८ ॥**
**निकुरेंनि परतली कस्तुरी : श्रीप्रभुचे कान भरी :**
**पालट नाहीं ईश्वरीं : क्षेणुही भरी : ॥ ९९ ॥**
**भृभंग वक्रपणें : निष्कामांचीं[1] कोदंडें निर्गुणें :**

---

पर देखाति तेणे बाहिरील देखणे टाकिले ॥ २– नेत्रेकरौनि आपणपें अंतरीचें देखणें नाहीं बाहीरील सकळही देखे। ते श्री प्रभु सन्निधाने आत्मदर्शन जालें तेणें आपुलेआ दोखा देखेति एवं बाह्यपदार्थावरी विरामले ॥ ३–नेत्राचेनि बरवेंपणें आणि कांतें देखणें असें परि आपुला अंतरी देखणे नाहीं ते श्री प्रभुचेनि आत्मदर्शनें आत्मनीं देखणें ठाकिलें होते ते जालें ॥५९६॥

जीवा = जे जीवदेखती तआंसि सुखाचे सोहळे होति। अवलोकौनि परम मंगळे = कल्याणरूपे। पाववीती = अविद्या छेदौनि परमगति पाववीति ॥५९७॥

अव्यक्त तो शब्दातीत परि व्यक्ती स्वीकार असे। श्रवण = करण। ते आर्तवंता पुरुषाची। बोलाची = स्तुतींची, विनवणी, गाऱ्हाणें। साटवण = आइकावेआ कारण ॥ ५९८ ॥

निकुरेंनि = आंतुलसार तेणेंसी। परतली = मार्दिली। कानभरी = काना लाविती, कान भरीति परि पालटु नाहीं ॥ २–निकुरें = रागें। परतली = मागे फिरली। कानभरी = सकळ जीवांचें गाऱ्हाणे दे जे जीवु दोखी, द्वेखी, मच्छरी, क्रोधी, करवाई, स्वामिया करणाशी पात्रु न होति तरि गोसावी सृष्टानुसृष्टीं कां पां श्रमताति ऐसे सांघत असतांही परि ईश्वरा कृपाळु वा पालटु नाहीं कां पां तो अच्यूत कीं ॥५९९॥

भ्रूभंग = भंवया। वक्रपणें = वांकडेपणे। निःकामाचीं– कोदण्डें = श्रीप्रभुची धनुष्यें। निर्गुणें = शीतें विवर्नीते। जेथ = श्रीप्रभुचा टाई संधान नाहीं करणे = सविकारा दृष्टी पाहणें। ममलक्षी = रजस्तम लक्षणें मल अभीभूत तेआ वरीं

---

[1] भणौनि कामाचीं.

जेथ संधानें नाहीं करणें : समळ लक्षीं : ॥ ६०० ॥
सृष्टि आदिचे सेवट : करीतिए आज्ञेचें मूळपीठ :
तैसे भ्रूभंग वंकट : मिरवताति : ॥ १ ॥
विसाळा भाळाचां वहिवटीं : भणौनि प्रकृति सठी :
न लिहेचि अक्षरावळि गोमटी : सानकुळितेची : ॥ २ ॥
चैतन्य देवता वरिष्टी : मांडिली श्रीप्रभूसी लल्लाटीं :
उदास परब्रह्म सेवटीं : जाणौनिया : ॥ ३ ॥
असा हें तीए भाळीं बरवंटु : मृगनाभिचा मळिवटु :
वरि टीळा क्षेवणिला चोखटु : सुढाळा मोतियांचा : ॥४॥
कीं तियें मोतियें निर्गुणें : गुणातीत वस्तु मीं भणें :
भणौनि जवळीक करणें : साजात्येंसी : ॥ ५ ॥
आतां श्रीचरण तीर्थिचेनिउल्लें : वरील सुख पाहाळीं गेलें :

---

लक्ष नाहीं ॥ २– संधान नाहीं करणें = ज्ञान प्रेम संधान देणें नाहीं समल लक्षीं = समला जीवावरी लक्ष नाहीं ॥ ६०० ॥

सृष्टि आदिचे सेवट = सष्टि रचना संहार । आज्ञेचें मूळ–पीठ = आज्ञापक मूळस्थान एवं अव्यक्ती तीनि प्रवृत्तीची आज्ञा करीति । तैसें = तद्वत । भ्रूभंग लक्षणें प्रवृत्तीची कां जैसी ॥६०१॥

विशाल = थोर । भाल = भालप्रदेश । वहिवटी = वहीवरी । सटी = प्रवृत्ती लक्षणें सटवी । गोमटी = बरवी । सानुकूळतेची प्रवृत्ती = एवं श्रीप्रभुचा ठाई जगा प्रतिकूलत्वभाव नाहीं ॥६०२॥

चैतन्य देवता वरिष्टी = परमेश्वर पुराभिमानीनी तेही आरीख विहार आनं जग सानुकूलता आन उदासीनता मांडिली । ललाटीं = भालपटीं । सेवटीं = पुरत्याजिताही विलक्षणता होईलु ॥६०३॥

मृगजा = मृगनाभी पासौनि जाली कस्तुरी । खेवनिला = जडिताकृति रेखिला ॥६०४॥

निर्गुणें = तंतूअवण रहितें एवं अछिद्रें । आन श्रीप्रभुही निर्गुण ऐसें उभयां साजात्य निर्गुणत्वें भणउनि मौक्तिका भालस्थळीं आंगी करीति ॥६०५॥

तैसे केश कलाप मीरवले : श्रीमुगुटिचे : ॥ ६ ॥
कीं दीनत्व नाहीं ईश्वरीं : भणौनि रात्रि आंधारी :
श्रीमुखचंद्रा भेण पाठिमोरी : जाली जैसी : ॥ ७ ॥
हीने स्थानीं जाले जन्म : जरि जवादि सुगंध निरुपम :
मागील लोपालेआ वर्म : लपे केशकळापीं : ॥ ८ ॥
दशे येउनि सेवटीं : परीमळाची हे कुटि :
तीही सुमनीं पूजी श्रीमुगटी : प्रसाद होआवेआ : ॥ ९ ॥
असों हें मज हाचि अभ्यासु : जें वाणावेया श्रीगोविंद परमेशु :
कांइ कैवल्य कनकांचा कसु : भरे कसवटिए वीण : ॥१०॥
कीं मुकिये जडे : घालीति सारस्वताचे धेडे :

---

पाहाळीं गेलें = पाहिलें ॥६०६॥

कीं दीनत्व नाहीं ईश्वरीं = कीं = पुनरोत्परीक्षा । शामता ईश्वरीं नाहीं = जैसे सूर्यमावळिलिआ रात्रांधकारु पडे तैसे ईश्वरांचा ठाईं नाहीं. येथ श्रीमुख तो सदा चंद्र आन श्रीनेत्र सदा सूर्य यया कारणें रात्री = शामता पाठिमोरी केली एवं केशकळाप पाठीशी सदा असती अथवा बद्ध असती ॥६०७॥

जरि केश–कळापि जवादि परिमळ लोपे तरि केस ते मानेवरील ते हीन, आन कळाप ते शिखो भागील वा शिरोभागीचे ते थोर एवं ऐसा वर्म असे ॥६०७॥

दशे येऊनि = आपल्या तारुण्या पूर्ण येऊनि = कालिका विकासांनि, तंतू ऊऊनि । सेवटी = अंतीं तेआ माळ ऐसें नाम जालें तेणें । परिमळ जाये = सुवास उधाये । सुमनी = पुष्पीं, सु–मनीं = सुष्टु मने आहेती कां जेआ भक्ति जनाचें तेही प्रसादा लागीं पूजा केली ॥६०९॥

असो = हृदईं वसो । अभि = सर्वभावीं । असु = प्रयत्न. अभ्यासु = अभि + असु । श्रीगोविंद हे तेआंचे आळविते नाम परम+ईश = परमेश [चिद्धव्वेषु=चित् + धव + वेषु – चित् = माया, धव = तियेचा पती तो चिद्धव तेणे धरिला मानव वेषु] तो–कैवल्य तल्लक्षणे कनक = सुवर्ण तयाचा कसु = कसवटी = परिक्षक । कसवटी वीण सुवर्णाची परिक्षा नुमटे तेवि सुष्टु हृदयेवीण तथा बोधेवीण अनुसरलेआ विरक्ताची कसवटी नुमटे ॥६१०॥

**खद्योत तेजें केवि उजिएडे : ब्रह्मगोळु: ॥११ ॥**
**मज कृपिणाचि वाणीः सुरसा बोलांची सिरियाणी :**
**तो मीं केवि सांघे काहाणी : कैवल्यामृताची : ॥ १२ ॥**

प्र. ३७ ईश्वर विरह पुरुषलक्षण ओव्या २६

**भणाल हेंचि वेन्ही नेणता : तरि मागिलेसी अन्वयो कथा :**
**एवंवीध सर्वज्ञावीण रीता : देखे मंचकुतो : ॥ १३ ॥**
**भीतरि नाहीं प्रेमाची ऊळ : तया केवि बोलवती वियोगिचे बोल :**
**जे आर्तियांचिए सभे न ल्हाति मोल : गौरवाचे : ॥ १४ ॥**
**वियोग घनाचा घावो गाढा : लागलेआ ह्मैसवा थरा जाए तढा :[1]**
**तेआंही पासव मज निवरडा : उपमा वज्र कठीणा : ॥१५॥**
**रोगिया जाय मरौनि : परि रसुकरी गुणी :**

---

कीं मुकीं जडें तिअे सारस्वताचे धडे घालिती कीं खद्योताचेनि तेजें ब्रह्मगोळकु उजिअेडे ॥ ६११ ॥

तेवि = तदन्याये कृपु = दुर्बल वाचें । सुरसा = आवडरूप, सुष्टु रसरूप, सकोमल पणाची । शिरि आणी = दुर्मिळता कथा भावरूप। कैवल्य तल्लक्षणें अमृताची प्रवाहरूप कथा. मीं = स्तावक केवि सांघे एव मज वदवेना ॥६१२॥

**एवं श्रीप्रभु मूर्ती वर्णन ओंव्या ६३. प्र०३६**

हेचि वेन्ही = हा ठाऊपर्यंत ॥६१३॥

जेआ भीतरी = हृदयांतरीं । प्रेम = आवडी तल्लक्षणें ऊल नाहीं तेआ वियोगाचे बोल कांई बोलवेति ऐसेआ निठुरा आर्तिआ = मनुष्यावतार भजनिआचिअे सभे कांई गौरव लाहे आर्तिअे = जेही त्रिदंडि युक्तत्वें परमेश्वरु अभ्यर्थिला तेआचिअे सभे शृंगारीकशब्दें एव भाव विहिनेनि शब्दें कांई मोल लाहे ॥६१४॥

वियोग तल्लक्षणें घन तेआ घनाचा घाऊ गाढा = अति दृढ कठीण । तेआ घाअें आर्ताचें हृदय तें फूटलें परि। म्हैसवाथर निवरडा = म्हैसवा पाषाणाचा थर तो अति कठीण तेवि स्तावक आपणास वज्रोपमी कठीणतर लेखी एव त्रियंच भजनी ॥६१५॥

रस करी गुणी = रोगिआ चंद्री लागालिआ चिंतामणी रसु दीजे तेणें तो सावधा

---

१ धढा.

**तैसें कांहीं स्मरौनि : बोलैन मी : ॥ १६ ॥**
***बीजें करितां प्रभुराजा : आपुलेया सांगातु नाहीं दुजा :**
**भणौनि सांडौनि गेलेति सेजा : निज ठाउ : ॥ १७ ॥**
**दडवा दडी धांवतां उत्कंठा आलेया बहुता :**
**कां जी ठेविला रीता : राजमठा : ॥१८॥**
**तो हा मठ नव्हे : जेथ कैवल्य वस्तु सांटवे :**
**परमार्गु वाहाति सदैवें : जेआं लागिं : ॥ १९ ॥**
**एका पुरुष त्रयी साधे भीतरूं : एकु नावेंचि उच्च थोरू :**
**राजमठु कां ठेविला निराधारु : निज सनैधीवीण : ॥२०॥**
**गुणीं श्रवणा सोहळे : वाचे नाम मंगळें :**

---

होउनि बोले निरवणूक करी पृच्छन्न अर्थी सांगी तैसें मज = स्तावक वदे अविद्या राग लाभीन्निला असे परि ज्ञान तल्लक्षणे रमु ईश्वरें दीहला तेआ स्फुर्ती कांई बोलैन मीं ॥६१६॥

आपुलेआ सागांतु नाहीं दुजा = अनुसरलेआ सेवका सांगातु दुसरा नाहीं। सेजा = मंचक। निजठाउ = राजमठ ॥६१७॥

दडवा दडी = तातडा तातडी। आलेआ = उरसे पातलेआ ॥६१८॥

मठ नोहे एवं तोचि राजमठ होय। जेथें = राजमठीं। परमार्गु = पर जो परमेश्वर तेआंचा मार्गु एवं अनुसरले जन। सदैवें = दैवे आथिले एवं ईश्वराज्ञा प्रतिपाळिते। ते-वाहती = राजमठा हृदयीं वागवीति, नमस्कारावया सद्भावीक जन येती जाती। जेआं लागीं = राजमठा लागीं ॥६१९॥

पुरुष त्रयी साधे भीतरूं = तीनि देव असेति तेणें तेआ समाधानु एव त्रिपुरुख उंचमढ हें नाम थोर तेणें तेआ समाधानु वाटे। निराधारू = रात्रमठीं राजा नाहीं भणौनि तो आधारें वीणु दीसताअे ॥६२०॥

गुणीं = ईश्वराचे गुणानुवादन आइकौनि श्रवणा = कर्णा सोहळे जाले। वाचा

---

ओवी ६१६ व ६१७ मध्ये दुसऱ्या प्रतींत एक आणखी ओवी आहे तीः—
जी राउळेवीण मंचकु : म्हणौं चौपाइ शेखु
कीं तो माट म्हणोनि झुतसे नोकु : जीवितासी : ॥

एकले चडफडीति डोळे : दर्शनें वीण: ॥ २१॥
मन जाला पांगुळा : बुध्दि न देखे डोळां :
अहंकारें सांडिलें सळं : वियोगु देखौनिआ : ॥ २२ ॥
कर्मेंद्रियें जेणें आधारें : तो एकला प्राण एर झारे :
देहभाव जाले पाठिमोरे : जिए स्थानीं : ॥ २३ ॥
*तो विरहाग्नी खरा : भणौनि हृदय मुसे भीतरा :
आट नोहेचि जीव भांगारा : संकीड भणौनिया : ॥ २४ ॥
परि लागला ताउ : घडितां न धरी आउ :
भणौनि अळंकाराचा विपाउ : श्रीचरणींचेआ : ॥ २५ ॥
कीं बुडतां भवार्णवीं : वरि एतां उपडथवी :

= जिह्वा नामस्मरण करौनि मंगलरूपा जाली ॥६२१॥

मना पांगुळता आली एव चपलता ठाकौनि स्थीरावलें । तेणें स्फुर्ती राहिली आन सळ = तेयांचें अहंकाराचें मीपण गेलें ॥६२२॥

कर्मेंद्रियें जेण आधारे = जेआं देहाचेनि आधारें कर्मेंद्रियें वावरत होतीं तेआ देहाची गती कुंठली मग तो प्राणवायु एकला येरझारु = स्वासोस्वासु करी देहभाउ जाले पाठिमोरे = देहाचे भाउतो देहभाउ ते पाठिमोरे जाले = मन इंद्रियें स्वभाव यांचिआ वृत्ती कुंठलिआ ॥६२३॥

विरह + अग्नी = विरह तल्लक्षणे अग्नी ते विरहाग्नी । खरा = यथार्थ, तीक्ष्ण । हृदय तल्लक्षणें मूस आन जीव तल्लक्षणें भांगार = सुवर्ण । आटि नोहे = आटे ना । कां सकीड = डाक लग मेळवनयुक्त अनार्त्तीवंत ॥६२४॥

ताउ = वियोगजन्य दुःख तल्लक्षणें ताप । घडितां न धरीचि आउ = अळंकारा रूप न धरीची एवं फुटौनि जाओ, ईश्वरीं स्मरणा अवस्छा उपजे ना। विपाउ= उपाउ, एवं ईश्वरविरहें देह न वचे ॥ २–लागला ताउ = देव होआवेआंचा विपर्याय जाला ॥ ३–लागला ताउ = अनुसरण जालें परि घडितां न धरी आउ = त्रिदोख तथा जाओ बाविशी दोखु न चुकेति ॥ तेणें ईश्वर प्रातिष्टा उपाउ न होववेची ॥५२५॥

*मंगल = कल्याणरूप चडफडीत = तळमाळितु ( ज्या ओवीची ही टीप आहे ती ओवी आम्हांस मिळालेल्या प्रतीवर नाहीं )

**तेवीचि काकुळती दावी : कृपावंता पुढें : ॥ २६ ॥**
**तेवीचि पाहे पाराकडें : तव कव्हणीं न देखे पुढें :**
**असों असों धांवा-फोकरी तोंडें : अनाथ भणौनि : ॥२७॥**
**कीं कणवा घालुनि उडी : पावाविला संतथडी :**
**ते व्हेळी आसु जाली फुडी : जिआवेआची : ॥२८॥**
**भणाल सोडीला निढाळु : तरि तुमचा स्वामि कृपाळु :**
**माझां बोलीं एतुसे आळु : निष्ठुरपणाचा : ॥ २९ ॥**
**साचाचि तुटलेआ कणवा : तुम्ही लटकेंन न झकवा**
**जरि प्रबंधु सरतां न दिसे बरवा : दुःखा ठी करितां : ॥३०॥**
**आणि राउळिचीं कृपा : प्रसीध आली असे रूपा :**

---

भवार्णव = भव + आर्णव—भव = ससार तल्लक्षणें समुद्र । उपड थवी = बुडतां कांही आधार सांपडे-तल्लक्षणे मनुष्य देहीं ज्ञानशक्ति संचारे ईश्वर स्वामी जीव भ्टत्यु ऐसा बोध होओे. ॥ ६२६॥

पाराकडें = अनुसरण सिद्धि पाववितेआं कडे तंव । कवणीं न देखे = ईश्वरावतारू कां तत्सम त्रिदंडचान्वितु ज्ञानिया देखे ना, पार तो ग्रामस्थ जन बैसता ठाॐ, पार = जो संसार पैलपारू तारिता जो परमेश्वर तेआकडें ॥६२७॥

कणवा = कणवें उडी घालौनि । सत-थडी = संत-जे रजस्तमहीने साधु तल्लक्षणे थडिअे पावविला एवं उत्तम ज्ञात विरक्तांचा योग मेळविला ॥ २- माझी = स्तावकाची कणव देखोनि साधुजनें तथा ईश्वरेंही मज ताराविआ संसार्णवीं उडी घातळी मग । पावविला संत थडी = संतें ज्ञान निरोपौनि अनुसरणा आणिलें मग क्रियेयुक्तत्वाचरणें ईश्वर प्राप्ती पावविलें । फुडी = निर्धारेंशी ॥६२८॥

हा निराधारु टाकिला ऐसें जरि वदाल तरि तुमचे कृपाळुपणा उणें येईलु । निष्ठुरपणांचा बोल येईलु निष्ठुर = उदास ॥६२९॥

साचची = सत्यची । तुटलिआं कणवा = मज स्तावका ईश्वरांचेनि श्रीमुखें ज्ञानश्रवण करौनि बोधसंक्रमणु नाहीं । न झकवा = झकॐ नका, फसॐ नका। प्रबध = ग्रंथ। दुःखा ठी = सिमा एवं अत्यंतीक रिता। बरवा = शोभायमान॥६३०।

राउळीची कृपा प्रसिद्ध रूप मजवरी असे तरि तेतुलें सौभाग्य मिआं स्तावका

जरि तेतुलें सौभाग्य कां पां : न भोगावें मीआं : ॥ ३१ ॥
चोरु साधुत्वें नटे : लटिका साचा वेठे :
तैसें निवृतांचिए पेठे : माझे बोलु : ॥ ३२ ॥
कळसा आला प्रबंधु : भणों हा तुमचाचि प्रसादु :
श्रोते पावतु[1] आनंदु : श्रवण मात्रें : ॥ ३३ ॥
हें श्री ऋद्धिपुरवर्णन : जे अभ्यासिती करुनि मन्न :
तेआंसि कैवल्याचें साधन : दुरि नोहे : ॥ ३४ ॥
जरि आधिष्टिलेति परदेवें : तरि एणें वाग् वैभवें :
नांदतां मिया देखावें : यया आपुला डोळां : ॥ ३५ ॥
एथिचेआ नामधारका : विज्ञापन परिवारिआ मार्गिका :
जे जन्माचेनि लाहे अभ्यासका : श्रीऋद्धिपुर वर्णन : ॥३६॥

---

कां पां व भोगावे ॥६३१॥

लटिका = मिथ्या परि सत्यार्था सारिखाचि। निवृत = प्रवृत्ती धर्मरहित। तेआं चिये पेठे. माझे प्रवृत्त मिश्रीत आरीख बोल काई भूषती ॥६३२॥

कळसा आला = सेवटा आला। प्रसादु = तुमचिआ प्रसन्नतेकरौनि ॥६३३॥

श्रीऋद्धिपुर = श्री = लक्ष्मी अलंकृत = सकलही समृद्धिचें नगर = कैवल्याचें साधन = कैवल्यस्वरूप प्राप्तिचें साधन ॥६३४॥

अधिष्टिलेति = प्रतिष्टिलेति एव ज्ञान देऊनि अधिकरण पदा भूषविलेति। पर—देवें = परमेश्वरावतारें। वाक् + वैभव = वाग्वैभव = ईशस्तवन तल्लक्षणे सौभाग्य ॥ हें आशीर्वादात्मक मंगलाचरण ॥६३५॥

विज्ञापन = विज्ञाप्ति। एथिंचिआ नामधारका = परमेश्वर मार्गीचिआ नामस्मरण करितिआ गृहस्था। परिवारिआ = सानेआही आदि करौनि। मार्गिका = दर्शनिया। जन्माचेनि = ज्ञानानुकूलत्त्वें अनुसरलेया बोधवंता। लाहे = अत्यंतवीतरागी चर्यावत दक्षा। अभ्यासका = चर्या संपूर्णत्वें अखंड चतुर्विध स्मरणदक्षा ॥ ६३६॥

---

१ पावोत

अर्थ प्रमइं उणें : मज अज्ञानाचें बोलणें :
परि अंगिकरावें[1] नाराएणु भणे : श्रोतेआंतें : ॥३७॥

प्र. ३८ ग्रंथांतीं मंगलाचरण ओव्या ७

जयजय परात्परा : जयजय अमिती चरित्रा :
जय परम मंगळ[2] गोत्रा : जी आदि पुरुषा : ॥ ३८ ॥
जय जय सुख सुकाळा जयजय परम मंगळा :
जय उदार लिळा : करुणानिधी : ॥ ३९ ॥
जयजय सदानंद रूपा : जय उदारा सकृपा :
जय अनिमीत्त बंधु मायबापा प्रीति पाळका : ॥ ४० ॥
बाणाष्ट यमचंद्र शोभनेसी : आषाढें निशाकर चंद्रेसी :
ग्रंथु पावला सिद्धीसी : ऋद्धिपुर वर्णनु : ॥ ४१ ॥
आजि सुदिनु सद्गुरूपासनेचा : योजिला वाक्पुष्पार्चनेचा :

---

अर्थ = विस्ताररूप सिद्धान्त । प्रकर्षेणमपितं प्रमेयं । आधिवे = अभ्यास करौनि प्रातिष्ठावे ऐसें नारायणु = ग्रंथकर्ता वदे ॥६३७॥

**एवं ईश्वरविरहपुरुष लक्षण ओं० २६ प्र० ३७.**

जय जय = अगाध सामर्थ्यें यशवंता। परात् पर तरा-परा = माया तिऐं होौनि परा. तरा = अतिशयवाचक। अमिती = अ-गणिती । पर-पथ = परमेश्वरमार्गे । आदि = जीव देवतां सकल सृष्टी आदि। पुरुषा = पुरुषार्थ प्रवरा ॥६३८॥

सुख-सुकाळा = सौख्यसुकाळ करितां परम मंगला = सर्वोत्कृष्ट कल्याणकारका उदार-लीळा = उदार चारित्रा । करुणेचा निधी ॥६३९॥

सदानंद = अखडानद। एथ-उदारा = थोरा । स-कृपा = कृपेसह वर्तमाना । अ-निमित्य-बंधु = जनक जननी गुरू गोत्रादि कारण नसतां पण बंधु ॥६४०॥
बाण ५.अष्ट ८.यम २. चंद्र १अंकानां वामतोगति प्रमाण चंद्र[1] यम[2] अष्ट[8] बाण[5] ( शके १२८५ ) शोमन नाम संवत्सरेसी । आषाढीं पौर्णिमा चंद्रवासरेसी । ऋद्धिपुरवर्णन ग्रंथ सिद्धि पावला ॥६४१॥

---

१ अधिष्ठावें २ पंथ

**श्रोतीं अर्चावे श्रीप्रभु साचा : सद्भावनेंसी : ॥ ४२ ॥**
**एवं हा ज्ञान जगतीं सुधाकरू : आइकोति करौनि आदरू :**
**तेयां नाहीं संसारू : याता यातु दे : ॥ ४३ ॥**
**जय अव्यक्ता निर्गुणा : जय मूर्ता सगुणा :**
**वरद होइ नारायणा : अनाथांसि : ॥ ४४ ॥**
**अचला मुरारी नंदनें : मल्लिनाथ परमार्ग विवर्द्धनें :**
**तया सुत नारायणें : बोलीला श्री ऋद्धिपुर वर्णनु : ॥ ४५ ॥**

**इतिश्री परमधर्मे महा मोक्षैक साधने श्रीनागार्जुनोपदेशे कवीश्वराम्नाय दीक्षित पंडित नारायण व्यास कृत श्री-ऋद्धिपुर वर्णनम् संपूर्णम् .**

---

सुदिनु सद्गुरू उपासनेचा = मोक्षगुरू पूजेचा, व्यासपूजेचा हा प्रसिद्ध नामु। वाक् + पुष्प + अर्चन = वाकपुष्पार्चन = वाचेनी ग्रथन केलेल्या ओंव्या तल्लक्षणें फूल तेणें पूजा बांधिली ॥६४२॥

एवं = पूर्वोक्त वाणिलेला ग्रथ हा सुधाकर – एवं भवरोगिया अमृताची खाणी। ते सच्छूद्धे परिशीलिआ संसारा जन्ममरण नाही ॥६४३॥ अव्यक्ता = व्यक्तिरहिता, चतु:प्रमाणि अप्रकाशका-एत्र १-शाब्द, २-प्रत्यक्ष, ३-अनुमान उपमान, येणें। अव्यक्त असून पण.मूर्ती सगुणा = व्यक्त मूर्तीधारका एवं विरुद्ध धर्मी ईश्वरा तूं नारायणा = स्तावका, निर्विक्षेपण शीलाचाठाई अयन = स्थान। ऐसिआ अ-नाथासि = नाथरहितासी। वरद होई = त्वद्गुण वर्णावेआ वरदान देता होई ॥ ग्रंथांती मंगलाचरण ॥६४४॥

**एवं ग्रंथांतीं मंगलाचरण ओं० ७. प्र० ३८.**

**इतिश्री परधर्मे महामोक्षैकसाधने श्रीनागार्जुनोपदेशे कवीश्वराम्नाय-दीक्षित पंडित नारायण व्यासकृत श्रीऋद्धिपुर वर्णन संपूर्णम् ॥**

**श्रीगोविंदप्रभु अर्पणमस्तु**

# परिशिष्ट अ

## स्थानपोथीमधील ऋद्धिपुरवर्णन

### तीनि मढ

श्रीरिधपुर नगर : तेया नगराचा नैर्कृत्य कोणी : पसीमे महा प्रसीध विसाळ : पूर्वाभिमूख जगती असे : तिये जगती भीतरि : वाव्य कोणी : पूर्वाभिमूख राजमढु असे : तेया राजमढाचा अग्न कोणी : माहाप्रचड पूर्वाभिमूख उंचमढु असे : तेया उंचमढा अग्न कोणी : उत्तराभिमूख : त्री पुरुषांचा मढु : तेथचे विसेख : पाइरीया : ३ : तेयांसी खेळ : १ : पूर्व पसीम पटीसाळ : २ : तेथ पटिसाळेचा पूर्वीली सीरा खांतें : तेथ गणेसु : तेणेंसीं खेळु : ४ : भीतरी रीगतां पुर्वीली दार संकेर्सी आसन : ५ : तेथुचि द्रावडदेसीचेया ब्राम्हणासि भेटी : देस भाषानुवादु : ६ : तेथचि मर्दना : आंगणीं मादनें पाइरीया खालि पांडा एका मादनें : ७ : पाइरीयां वरवंडेयांवरि वस्त्रे वेढणें : ८ : भीतरि पूर्वीली भीतभंगेंसीं : वासन पसिमीलीं : ९ : समोरीले खांबेंसीं : आरोगण : १० : ॥ मधीलां दोहीं खांबेंसीं खेळु : ११ : त्रीपुरुखेसीं : खेळु : १२ : एवं त्रीपुरुखांचा मढु : ॥ ७ ॥

आतां त्रीपुरुखांचेया मढा उत्तरे : उंचमढापूर्वे : नींबा पसीमे : उखळी : तेथ दोहीं देवां आरोगण : १ : उखळी पूर्वे नींबु : २ : नींबातळीं : ३ : खेळु : ४ : वेढे : ५ : स्परीसु : ६ : नींबांपूर्वे भीतीसी खांतें : तेथ आमचे सर्वज्ञ खांतेंनसी च्यरण चारी उभे : ७ : खांतां गरुडु तेणेंसी खेळु : ॥ ७ ॥

आतां उंचमढु : उंचमढु पूर्वामूख : पाइरीया : ७ : अनुक्रमें वितीक्रमें गणणें : २ : उत्तरदक्षिण सोंडिया दोन्हीं : उत्तरीली सोंडियेवरी : कापुर वोळगवणें : ३ : उत्तरदक्षीण पटिसाळ : उत्तरीलीं विभागीं : ६ : ४ : तेथचि घट भंगणें : ५ : तेथचि गाईसी खेळु : खाणृ : गोदोहन : आपद्धवळीए म्हणणें : ७ : तेथचि विनायकासी खेळु : ८ : दक्षिणी विभागीं नरसींहेंसी खेळु : ९ : तेथचि फाळे-यांचा वोवरा : माचेयावरि अवस्थान : १० : तेथचि सर्पभयें नटणें : ११ : तेथचि चांग बोला म्हणणें : १२ : उंचमढाचेया उंबरवटावरि आसन : १३ : मढाभीतरि :

चीजें करणें : केसवेंसी खेळ : १४ : घंटा हालवणें : १५ : तेथचि पेखणें : १६ : तेथचि कीर्तन : १७ : तेथचि पुराण परीसणें : १८ : आगण मादळ तुडवणें : १९ : चौदा खांबांसी खेळु : २० : उतरीली देउळीये भैरवेसी खेळु : २१ : दक्षिणीली देउळीये महालक्ष्मीसी खेळु : २२ : पेखणेंयांसि चुकी दाखवणें : २३ : तथा पसावो देववणें : २४ : पटिसाळे दक्षिणीली विभागीं मर्दना : २५ : आंगणीं मादनें : २६ : कदाचित् सोंडियेवरी प्रातःपूजा : २७ : एवं उंचमढु : ॥ ७ ॥

आतां दोहीं मढांचीये संदी : फुलांचेया वोवरेया उत्तरे : सुतवणे यांची मोगरी : १ : त्या पसिमे लपनिथपनि : २ : तेथचि श्रीप्रभु सर्वज्ञ कोपारूढ होउनि : विदीत करीते म्हणणें : ३ : त्रीपुरुखांचेया मढा पसीमे : कोणटा एक वडाळु ऐसें होतें : तेथ मांचा घातला : तेथ अवस्थान जालें : ४ : म्हाइ भट एकी आसुची फुलें घेति : फुलांचा वोवरा करीति : वोवरे तीनी : फुलांचा वोवरा : १ : पाटियांचा वोवरा : २ : तटियांचा वोवरा : ३ : तेथ मर्दना : मादनें : पूजा : आरोगण : ४ : तेया पसीमे जगतीचीये खातां दुबळेश्वरू : तेणेंसी खेळु : ५ : तेया पसीमे विनायकेसी खेळु : ६ : उंचमढाचे दक्षिणील विभागीचे च्यान्ही पनाळ : ७ : दुबळेश्वरापासौनि पूर्व पर्शाम : उत्तरामुख पटिसाळ : पटिसाळेसी दक्षिणे खिडकी : ८ : खिडकीये बाहीरि पुर्वे स्वानभये नटणें : ९ : खिडकीये पसीमे वासरूवांची कोपटी : १० : कोपठीए दक्षिणे परिश्रय : ११ : खिडकीए भीतरि पसिमे म्हाइंभटाचें भानवस : उतरामुख : तेथ खेळु : १२ : भानवसा ईसान्य कोनीं : बेळें : तेथ स्नान प्रसंगीं : साधातें भेवडवणें : १३ : जगतीसि नैर्कृत्य कोर्णी स्वान बाइयांची मढोली : स्वान बाइया सात : तेयासी खेळु : पुर्वीली कोणी उत्तर दक्षिण बोटा : तेथ सोमागें असतें होतीं : तेथ सर्वज्ञ प्रति दीनीं पडिताळावेया बीजें करिति : १५ : तेयां पुढां पटिसाळ : पूर्वाभिमुख : तेथ जातीं : पाटे : मुसळें : उखळें : तेयांसी खेळु : १६ : तियेचि पटिसाळे वेढे : तेयाचि पुढां : सोभागांची कीडडी : तीकटें श्रीकरें धरणें : १८ : तेयां पुढां उथानपिंड : १९ : तेथौनिचि खोलबुंथी घालौनि : अनुवर्जीत बीजें करणे : २० : जातेयां : पाटेया उत्तरे : आबाइसांचें भानवस पूर्वामुख : तेथ खेळु : १ : खांबेंसी खेळु : २ : जावाई नामकरणें : ३ : फुटे यांचां प्रसंगीं उमाइसांतें थांपा हाणणें तेथचि उमाइसांते समजावणें : ५ : दारेंसीं उमाइसांतें तांदुळ निसीतां टोलेनि

ह्मणणें : ६ : भानवसाचेया आंगणा : बीजें करणें : तेया पूर्वे उंचमढेंसी घागरी तेथ चुळु भरणे : १ : तेयासि उतरे वानरीया : तेयांसी खेळु : २ · राजमढा दक्षिणे : कापडाचा वोवरा : ३ · तेयापूर्वे न्हाणींचे मकरतोंड : ४ : तेयावरि काकोचा करवता : ५ · तेथचि न्हाणीएचा पऱ्हींवायां : तेणेंसी खेळु : ६ : उंचमढाचे उत्तर विभागील : च्याऱ्ही पनाळ तेणेसी खेळु : २० : ॥ ® ॥

आतां राजमढु राजमढु पूर्वाभिमूख : उत्तरदक्षिण पटिसाळा : पटिसाळे दक्षिणील विभागी : पूर्वे वीपलाणे : १ : तेथचि आरिसा : प्रतिबिंबेसी खेळु : २ : तेथचि जावाया बैलु सांघणे : ३ : तेथचि : नाथोबांचे वस्त्र सांघणे : ४ : सोपान भिंतीसी खेळु : ५ : भिंती श्रीकरें स्पर्शणें : ६ : तेया पूर्वे रूवावरि लोळणे : ७ : तेया पुढें चरण चारिया उभेया ठाकणे : ८ : उंबरवटापुढें स्तब्ध असणें : ९ : तेथचि पूर्वाभिमुख उभेया ठाकणें : १० : तेयापुढे राखेसी तापणे : ११ : तेयाचिपुढें पटिसाळेसीं जनेंसी चवकौनि : खांबेसी उभेया ठाकणे : १२ : तेथचि मर्दनें : १३ : तेथचि डोळो डोळो म्हणणें : १४ : सूर्याते वरता ये म्हणणे : १५ : पटिसाळे वरौनि दांडीये आरूहण : १६ : ब्राम्हणा भोजन देववणे : १७ : तेथचि प्रजन्य आव्हानणें : १८ : पटिसाळेचां उत्तरीली सीरां : नागनाथाची देउळी : दक्षिणाभिमूख : तेथ उदास्य स्वीकारू : तेथ तीनि दी पहूडु : २० : नागनाथा पूर्वे : पूर्वपर्सांम : दक्षिणाभिमूख पटिसाळ : २१ : ॥ ® ॥

आतां राजमढांतुलें स्थानें : उंबरवटावरि उकड आसन : १ : सनिवारीं बुधवारीं न्हावें म्हणणें : २ : उदरव्यथा समे : सातवेळ उंबरा वोलांडवणें : ३ : तेथचि आंडोरा करवि सातखडे वोलांडवणें : ४ : दोहीं दारसंकांसी खेळु : ५ : भीतरि अग्नकोणी : पूर्वीली भीतिभगेंसी उत्तर दक्षिण मांचा : तेथ अवस्थान : मांचेयावरि विसेखु : पहुड होय : १ : उपहुड होए : २ : म्हाइंभटां भेटि : ३ : भटां भेटि : ४ : लक्ष्मींद्र भटां भेटि : ५ : हंसराजा भेटि : ६ : नाथोबा भेटि : ७ : आबाइसां भेटि : ८ : आउसां भेटि : ९ : लेंकी जावाइया भेटि : १० : वांकि वोळगवणें : ११ : वांकिचा श्री चरणु तऱ्हाटणें : १२ : सांखळें वोळगवणें : १३ : कस्तुरीचा आडा रेखणें : १४ : मोतियांचा टीळा वोळगवणें : १५ : श्री मुगुटु विंचुरणें : १६ : भांगीं जवादि भरणे : १७ : जवादि भीतिभगेंसी पुसणें : १८ : नाथपुरु कापुर अनुवादु : १९ : आरिसा पाहाणें : २० : गळ दंडनेसी खेळु : २१ : सुप-

वतीचारू काढणें : २२ : पासवडेनसीं खेळु : २३ : सीर कवळीसीं खेळु : २४ : चोसाडीयेसीं खेळु : २५ : वीडा स्वीकारू : २६ : तांबुळ प्रत्येजणें : २७ : पीठ प्रत्येजणें : २८ : दीपेसी खेळु करणे : २९ : श्री करे तापणें : ३० : वेस पंडीत कन्येचे अमळक : आरोगण : ३१ : साधां भेटि उदास्य परिहारू : ३२ : तथा चरणोदक प्रसाद दान : ३३ : तथा ताट प्रसाद दान : ३४ : तथा दाढ प्रसाद दान : ३५ : तथा नख प्रसाद दान : ३६ : भूतानंदा भेटी : ३७ : आबाइसां साकर वाढणे : तेव्हळि मांचेयावरि आसन : ३८ : नरसिंग दरणेयाची वीनति स्वीकारू : ३९ . खाजे : आरोगण : ४० : उदरव्यथा स्वीकारू : ४१ : वांकि परित्यजणे : ४२ : सांखळें परित्येजणें : ४३ : टोपरें परित्येजणें : ४४ : फुटा परित्येजणे : ४५ : म्हाइं भटांची दुटी अंगीकरणे : ४६ : परीतोखें दुटी परित्येजणे : ४७ : म्हाइं भटाचा उपाहारू परीतोखें परित्येजणें : ४८ : कोथळोबांते ठाउवा म्हणणे : ४९ : दिवाळीसनि वोवाळणे : ५० : पुंश्चली म्हणणें : ५१ : पेंढीये त्यागु देणे : ५२ : लेकी जावाइया भेटि : ५३ : भावे सींपवणें : ५४ : उबरावतीयेंचे सांकनायेक तेही दुर्ग देसांहूनि दुटी आणिली : ते वोळगवणें : ते उदास्याची : ५५ ' आतां माचेया पसीमे : आरोगणें स्थान : तेथ पूजा : आरोगण होए : दृष्टीपुढां आरोगणस्थानीचा खांब : आतां आरोगण स्थानींचे विसेखें : केसव नायकाचा उपहारू : आरोगण : १ : एकाइसांचीया पोळिया अंतर : २ : आम्रेंइ तुरी मागणे : ५ : आउसांचें पेवणें : आरोगण : ४ : तथा कानवला मागणें : ५ : साधां ताट प्रसाद दान : ६ ' ताकपी मालीया : लुखीये म्हणणें : ७ : उदक मागणें : ८ : धानाचा भातु : आरोगण : ९ : अवकाळी वांगें मागणें : १० : अलर्कवसा मागणे : ११ : अवकाळ आंबे मागणें : १२ : चिंता स्वीकारू : १३ : पेंडाळु मागणें : १४ : म्हाइंभटाचा उपाहारू : आरोगण : १५ : उदक वोळगवीता वानरा म्हणणें : १६ : महादाईसां उमाइसां नाम करणे : १७ : कठीण आगारीकें पीढें उपहासु : १८ : दर्भ उपहासु : १९ : आरोगण स्थानींचेया खांबेंसी खेळु : २० : ठेटरी मागणें : २१ : भाकरि मागणें : २२ : ॥ ७ ॥

आतां खांबा नैर्रुत्ये : मर्दने स्थान : १ : कोथळोबा उचलुनी : श्रीमूर्ति सोडवणें : २ : दाइंबातें उपकरसीना म्हणणें : ३ : ॥ ७ ॥

पसीमीली भिंतीसीं : मध्यें वीदारणसींहु : १ : योगनरसींहु : तेयासीं खेळु : २ :

नरसींहा पुढां दोहीं खांबांमध्यें : आउसाची रंगपूजा : १ : तेथचि श्रीकरू मोवंडणें : २ : तेथचि खीचपुरीया नवसणें : ३ : ॥ ⊛ ॥

वाव्यकोणीं आबाइसांचा वोटा : आबाइसां सेजारी पडिताळणें : १ : उदरव्येथा निवारणें : २ : खांच वीश्रवणें : ३ : हातेंवेसि खेळु : ४ : ॥ ⊛ ॥

तेया दक्षिणे आबाइसा साकर वाढणें : १ : तेयांपसिमे : भीतिभंगी साकरेचे डेरे : १ : खाजेयाचे डेरे : २ : कणीकांचे डेरे : ३ : तांडुळांचे डेरे : ४ : तेयांसी खेळु : खाजे : आरोगण: चौभिंतीं स्परीसु : आबाइसांतें हातीं धरूनि आळि घेणें : १० : एवं राजमढु वीसेखु : २६ : ॥ ⊛ ॥

आतां नागनाथा अन्ने : दोहीं पटीसाळांचा कोणी : पूर्वे पसीम बौली सात केशव : ष्टा : पुत्राची मूंजि : १ : ईश्वर नायेकाचेया : २ : वेस पंडीतांचेया : ३ : रूपनाएकांचेया : ४ : जोगनाएकाचेया : ५ : वीठल नाएकाचेया : ६ : महेश्वरपंडितांची मूजि : ७ : तेथचि विहवावो स्वीकारू : ८ : महादाईसा करवीं : रूक्मीणी सइवर गाववणें : ९ : धवळ गाववणे : १० : आसींग बांधवणें : ११ : कांकण बांधवणें : १२ : डाउ गळा घालवणें : १३ : रुक्मीणीचा राउळीं जेविलें म्हणणें : १४ : हळदी लावणें : १५ : हरीमेयांचा : हरीमा म्हणणे : १६ : च्यान्ही दीस मर्दना मादना स्वीकारू : एवं सातही बौली : ॥ ⊛ ॥

बौलीया पूर्वे चौकन्हाणीए : १ : तेथची हळदी उटणे : २ : तेथचि नींराजन : ३ : तेथचि पीतवस्त्र वेढणे : ४ : तेयां पूर्वे नित्य वेवस्थेचें मादणें : ५ : तेथचि प्रजन्यु अवीसर्जणें : ६ : म्हाइंभटे वनी सांडणे : ७ : म्हाइंभटें धूत जाणिवें सांडणें : ८ : तीपुरारि भटांची सेवा स्वीकारू : ९ : मादने या उत्तरे पटिसाळेवरी वस्त्रें वेढणें : १० : नळीएचे वस्त्र वेढणें : ११ : मादने स्थाना पूर्वे समीप : पन्हीवा दुटी श्रीचरणें बुडाविणें : १ : ॥ ⊛ ॥

फळावी : न फळावी : मसि : घसी म्हणणें : १ : त्यासि पूर्वे म्हाइंभटाचा उपाहारु म्हणणें : २ : त्यासि पूर्वे आडु : तेथ श्रीमुख पाहाणें : २ : प्रतिबींबेसीं खेळु : २ : कोथळेया अनुवादु : ३ : ॥ ⊛ ॥

अडापूर्वे वासुदेवोभट्ट दुवो जाला म्हणणें : १ : अडादक्षिणें गोदोहोनें : २ : गाइ पसीम वोटेयावरि बोरितीचें गात : ३ : अडापसीमे म्हाइंभटासि कारू वारू म्हणणें

: ४ : तेथाचे नांदु : ५ : अडानैंक्रने मोगरफूल : वांसा : तेथचि मांचळीयेवरि आसन . ६ : तेथचि केळांची सोळवडी : ७ नारिएळाची मोळवंडी · ८ · उसांची सोळवंडी : ९ : तीळांची सोळवंडी : १० : तयांतु तीळु : १ . बोरे : २ : गाजर : ३ : बरवीं पंचखार्जो : बरवीं फळादिकें : भाकरी घालुनिया देववणे : ४ · तेथचि आकास दीपु : ५ तयापमिमे तांबुळाची लुडी क्रीडा : ६ : ॥ ७ ॥

उचमठा उत्तरे रायांगणी पसिमीली सीरां माहादाइसांचे सर्पदष्ट वीख उतरणे : १ : तेथची सर्पदष्ट गांवींख उतरणे : २ : बोने बाइयां भेटि : ३ : सांति बाइसा भेटि · ४ : ॥ ७ ॥

सोपाने पासौनि बेताळीस हात रायांगण · रायांगणी भेटि सात : पहिली भेटि दामुराउताची · १ : लक्षमीद्र भटांची भेटि · २ : भटांची भेटि · ३ · लाकि जावायाची भेटि : ४ : भूतानदाची भेटी : ५ : देवा : महादाइसांची भेटि : ६ : सारंग पंडिताची भेटि ७ : ॥ ७ ॥

उचमढाचेया उतरीला सीहाडेया पूर्वे आसन · नाएक भार्तीयाची चर्चा : १ : तेथचि संन्यासियासी वीपलाणे : २ · मेहाडेया सांडीएमध्ये घट्ट तुडुवणे : ३ : ॥ ७

आतां माहाद्वार पसमीलीया पाइरीया पांच . पाइरीया चढतां दुसरी पाइरीतें सोपान : सोपान प्रतिदीनी श्रीचरणु लावणे : १ . पाइरीयांसी खेळु . २ : पाइरीयां पुढां माहादेवोबाचा दीठ्ठवेढा : ३ : ॥ ७ ॥

माहाद्वारीचेया उबरवटावरि वीसेखु . उदक स्वीकारु . १ : पूर्वदीसा अवलोकणे : २ : पद्मासनी बैसणे : ३ : चरणचारी उभीया असणे · ४ : पसीम दिसां अवलोकणे : ५ दोन्ही दारसंका धरणे : ६ : कवाडासी खेळु . ७ : इंदाउवांवरी श्रीचरण ठेवणे : ८ दक्षिणेला कवाडा आड : आमचे गोसावी उभे : ९ : सीमुगां उपराठी भोंगळ काढणे : १० उपराठी खीळे काहाढणें · ११ : कवाडा आड लपणे : : १२ : चहुं कोपरां श्रीचरण ठेवणे : १३ · दक्षीणीली दारसंकेसी खाते : तेथ गणेसेसीं खेळु : १४ : साधी फोडि प्रसादु दान : १५ : कोथळोबानें पाचारणें : १६ : खोलबुंथी घालणे : १७ : तेथ चरण चारी उभीयां राहाणे : १८ : मुकेया वाचा देणे : १९ : म्हातारें खांड जाले म्हणणे : २० : कुमारींसीं खेळु : २१ : पांगुळा पाए देणे : २२ : एवं उंबरवटावरी बावीस वीसेखु : ॥ ७ ॥

बाहीरीलो पाइरीया अनुक्रम- वीतीक्रम गणणें .१ पाइरीया वरूनि . दांडीए आरूहण प्रतदीनी : २ दामुर्त विज्ञापनी दांडीते अरूहण .३. पाइरीया तीनि : पाइरीया पुढ विसेख. ब्राह्मणु थापा हाणणे : १ : सांमुगा सीपणे : २ : गांवघेर म्हणणे : ३ डोळो डोळो म्हणणे ४ : दक्षिणीली विभागीचि विसेख . भांतीभंगेसीं वोतपळी घेणे . ५ मूर्यांत वरता ये म्हणणे ६ : हरीमा म्हणणे : ७ : गोळणीसी खेळु ८ दहे दुध चाखणे : ९ उत्तरीले विभागी विसेख कोपरा दोही देवांचा सबधु · १० : आबाइसां वेरणे वेढवणे : ११ : तेथचि पाडा चोंचेनि अनुक्रम रंगमाळा चुकवणे : १२ ॥ ७ ॥

आता जगति पुर्वपसिम येकुन्यासी हात उत्तर दक्षिण साटिहातः एव मद्ध ॥ ७ ॥

जगती बाहिरील स्थाने . आता जगतीचिया ईसान्य कोणा टसान्ये पाडा चोंपांचाचेनि मानेः राजबीदीचा सीरा · वीचार-चोरियाचे स्थान १ खालाळी टेकाळी अनुवादु नाणांगी सोनांगी अनुवादु ३ धामने माउरे अनुवादु : ४ आठ जया अनुवादु · ५ विचारचोरिया पासिमे आळंदीया पासोनि . राजबीदी : विचारचोरिया पूर्वे राजबीदी : ६ विचारचोरिया पासोनि उतरे श्रावणीये पासोनि · राजबीदि ७ विचारचोरिया उतरे पाडापांचाचेनि माने : सोने सळंया गहुवाचीए रोटीएचा आवारू · ८ त्या पुर्वे मरूपरायाचा आवारू : उत्तरामुख : ९ : रोटीएचेया आवारा उत्तर · तीकोपाध्याचा आवारू : पूर्वाभिमूख १० · त्या आवारांतु वीसेखु : चौकी पूर्वामूख १ : उत्तरदक्षिण पटिसाळ : २ : पटिसाळ दक्षिणीलीकडे वोटा : ३ : तेथ अवस्थान : तीकडेचि वांसरूवांची खोली : वांसरूवा पेडी घालणे . ४ . वोटेयावरि सातरा · ५ : बाइसे पूजा आरोगण देति : ६ : आमचे सर्वज्ञ उदेयांचा पूजा अवसर अवलोकावेया बीजे करीति ७ : बाइ : वार्काहुनी वस्त्र आणीलीं ते आणा आरूते . सर्वज्ञ दोहीं श्रीकरीं घेऊनि : उचलुनि दृष्टपूत केलें : श्रीप्रभु सर्वज्ञ नीराकरिले : ऐसें एक दोनि दीस वोळगवीलें . एकु दीसु सर्वज्ञ उत्तरीले सीहाडेनसीं : दक्षिणाभिमूख उभे : दक्षिणीली पटिसाळे : पसिमामुख : गुढगे मोडुनि आसन नीरी करूनि वस्त्र प्रधान केले : आबाइसांची भेटि : ८ : म्हाई भटांची भेटि : ९ : उपाध्याची भेटि .१० : भटा महादाइसांची भेटि ११ : दादोसांची भेटि : १२ : महादाइसाचे अमृतफळ आरोगण : १३ . तथा धीडरें आरोगण : १४ ; अल्प गुळुनोदक म्हणणे . १५ : नपुसत

महादाइसा श्रीमुगुटी तेल वोळगवणे :१६: पासवडी चोरी नेली म्हणणे :१७: नारसींग दरणेया वीनती वासना : तीको पाध्या जाया मृत्य सुचणे १९ : उबरेयावरि दधिभातु . आरोगण . २० आगणी मादने : २१ . तेथचि खीडकी २२ : तेथचि काटा काढि करणे वोटेया पुढे राजणवडी . २४ : सातरा घालणे : २५ : त्यापूर्वे पटिमाळ पूर्वपस्चिम उत्तरामुख . २६ . तेथ वेढव्याएन : २७ . इसान्य कोणी उडिवा : २८ तेथ चाटेयातु पहुडु : २९ तथा प्रकासु दर्शनु ३० : तीको पाध्याची वीनती : ३१ : पटिसाळे मठावरि पहुडु ३२ : चोकीचे या उत्तरीला सी हाडेयासी आमचे सर्वज्ञ उभे ३३ चोकीये वाव्ये लघु परीश्रए . ३४ : एवं तीकोपाध्यायाचा आवारू : ॥ ७ ॥

तीकोपाऱ्यांचिया आवारा नैऋत्य कोणी आमचे सर्वज्ञ अनुवर्जीत उभे : १ : टीकोपाऱ्यांचिया आवारा पसीमे : बीदी पसीमे जावायाचा आवारू पूर्वाभिमुख : तेयातचि म्हातारीयेची कोपटी : तेथ श्राधी ' आरोगण : ॥ ७ ॥

तेया दक्षिणे ' नाथोचा आवारू . तेथ घाटा : आरोगण ॥ ७ ॥

तेया पसीमे मीनामीनाचा आवारू : उत्तराभिमुख ' ॥ ७ ॥

तेया आवारा नैर्कृत्य कोणी : राजबीदी उत्तरे बेळे . १ . तेथ साधाचा वीसेखु ' २ ॥ ७ ॥

राजमठा पस्मिमे ' पांडा दाहा कमळेश्वरू : १ . कमळेश्वरावाव्ये बीदी उत्तरे : वोडण झडपाचा आवारू : पूर्वामूख : १ . चोकीपूर्वाभिमूख :२. त्याची बाइल थापा हाणणे .३. साळी दाळीचीया हाडीया फोडणे : ४ . वीनती स्वीकारू : ५ : पूजा आरोगण . ॥ ७ ॥

तेया आवारा उत्तरे : वोवेया गोविंद नायकाचा आवारू : पूर्वाभिमूख : ॥ ७ ॥

तेयां उत्तरे भैरवाची देउळी : पूर्वाभिमुख . तेणेसी खेळु :१ : पटिमाळ पूर्वामुख : पटिसाळे मुक्तेश्वराची देउळी ' तेणसी खेळु : २ : जगती बाहीरि पसिमे : कन्हे कुंचकी आसन ब्राह्मणाची वीनती स्वीकारू : १ : नगराचे दारवठे च्यारि : पसिमीले दारवठांहूनि माल्हण देवीचा मार्गु : १ : राज.मठाचीये जगती पसीमे : वांवेया चांचेनि माने वोणा : वोणेया पसिमे अळदीया . उत्तर दक्षिण दोन्हीं : २ : तेयांसी खेळु : १ . प्रतिबींब पाहाणे :२: नख खाड विचरणे : ३ . सर्वज्ञ आप

भेयां आपंण गोष्टी करणें : ४ : वेढे करणें : ५ : अळंदीयांमध्ये दोहीं देवां भेटि : ६ : पुष्टि विभागीं क्षेमालिंगन : ७ : श्री चरणीचें रज : आमचा सर्वज्ञ श्री मुगुटावरि : ८ : श्री प्रभु भुइंचें इटाळें वेउनि : भुइंसी त्राहाटणें : ९ : दक्षिणीली अळंदीये नैऋत्य खैराळाचा मार्गु : १० : तीकडेचि आइसांतें राहावणें : ११ : एवं अळंदीया : ॥ ® ॥

अळंदीया वाव्ये : वाजेश्वरू पूर्वाभिमूख :१: चौकीं खीचपूरीया : आरोगण : २ : जगति आंतु दक्षिणे नींबु : ३ : दुसरा नैऋत्य कोणीं नींबु : ४ : दोहीं खालि भटोबासांचें वीजनें : निरूपणे : ५ : अग्नि कोणीं निरोध परिहारू : ६ : इसान्य कोणी : भटांची मात्रा : ७ : जगतीच्या दारवठा पूर्वाभिमूख : ८ : बाहीरि उत्तरविभागी आडु : ९ : त्या पूर्वेहळु : त्यासीं खेळु : १० : जगतीची उत्तरे खीडकी : ११ : ॥ ® ॥

वाजेश्वरा दाक्षिणें वीघेयां दोचेनि मानें वडु : तेथ कापुस वांटणें : १ : वाजेश्वरा अग्नेे वडा पूर्वे : उत्तर दक्षीण कासारांची हाटवटी : तेथ पदार्थासी खेळु : २ : तेथचि तिव्हाळां प्रकास दर्शन : ३ : वाजेश्वरा पसिमे कामठु : तेथ पेंडीये गमन : ४ : ॥ ® ॥

वाजेश्वरा पूर्वे वोतु : वोता पूर्वेसमीप : अळजपुरीचा मार्गु : मृत्यबालक जीववणें : १ : वाजेश्वरा उत्तरे अळजपूरीचा मार्गु : मार्गा उत्तरे वीघेया चौचेनिमानें वेदिका : ॥ ® ॥

ते वौलीये वरि वाव्यकोणी सामान स्त्रीयेचें अन्न आरोगण : १ : वेदिके पूर्वे पांडांचौचेनि मानें : रामवीहीरा : २ : तेयां उत्तरे पांडां ती लक्ष्मण वीहरा : तो खाणवीला : ३ : वेदिके उत्तरे : वीघेयां चौचेनिमानें : नींबु तेथ आसन : ४ : वासना सामान स्त्रीयेचें अन्न आरोगण :५: नींबा उत्तरे देउळवाडांचा मार्गु : ६ : नींबा पूर्वे दुरि गोपाळांचेया वडा पसिमे वोतु : वोता पसिमे : पांडां बारां पींपळ : तेथ वेदध्यायेन : ७ : त्या पिंपळापूर्वे : पांडां दाहीं दहन : तेथ मुंजिया : पाइं धरूनि : १ : वडाचां पालव्रां जीववणें :२ : वडा पसिमे : पांडां चौं दोन्हीं करंड वीहीरे : ३ : उत्तर दक्षिण : तेयांसीं खेळु : तेथचि माहादाइसें सर्प दष्ट : ४ : वडाखालि गोपाळांतु भोजन : ५ : ॥®॥

तेयां वडा दक्षिणे : अग्निकोणा आश्राइत : वीघेयांचेनि मानें : भानेश्वराची

देउळी पूर्वाभिमूख : १ : तोचि पूर्वे आडु : हलु : २ : तेणेंसीं खेळु : ३ : माने-श्वरा दक्षिणे : पांडा साचेनि माने : चणाक्षेचें देउळ : पूर्वाभिमूख : १ : चणाक्षे अग्ने कोणी वाटे दक्षिणे वीचेयां चौंचेनि मानें : गौळणीचा वडु : तेथ दहीदूध चाखणें : १ : वडापसिमे पांडा वीसांचेनि माने : उपासनीयांचा आडु : २ : उत्तरे हलु : तेयासीं खेळु : ३ : अडाचां पूर्वीलीं पालवीं : तीकोपाध्याचें दहन : १ : त्यापूर्वे सोहागाचें दहन : २ : त्यापूर्वे सांति बाइसांचें दहन : ३ : कपाळमोचन होय तव तेथ आसन : ४ : ॥ ७ ॥

वडा पूर्वे सींदके पसिमे समसान स्थली : तेथ मृत्यार्ते बोळवीत बीजें करीति : ॥ ७ ॥

सींदक : सुतक : उत्तर दक्षिण दोन्हीं विहीरी : दोहींमध्यें सींदकेश्वर सूतकेश्वरू : त्यासीं खेळु : १ : उत्तरेची सूतक : पूर्वामुख रीगावां : २ : तेथ स्नान : ३ : विहीरी आंतु वस्त्र धुणें :४ : बाहीरि वस्त्र वाळवणें : ॥ ७ ॥

सुतक पसिमे पांडां पंधराचेनि माने : समसानेश्वरू : १ : सुतके पूर्वे : पांडां वीसाचेनि मानें : वेदिका : २ : तिये अग्न कोणी नगरविसांवां : ३ : ॥ ७ ॥

सुतके उत्तरे तळेयाचीये पाळी गौळणीचा वडु : तेथ गौळणीसीं खेळु : दहीयें दुधें चाखणे : १ : तेयां वडा पूर्वे पांडां चौंचेनि माने : ब्राम्हणाचें दुस : तेथ पातळीये : आरोगण : २ : ॥ ७ ॥

तेयांपुढें पांडा वीसांचेनि मानें : वेदिका तेथ वेदाध्ययेन : १ : तया पूर्वे आदित्याचें देउळ : पूर्वामुख : तेथ खेळु : २ : आदित्या दक्षिणे : सेजोंचि भैरवाचें देउळ : पूर्वाभिमूख : तेथ आमचेया सर्वज्ञा अवस्थान : दीस वीस : भैरवैंसीं खेळु : १ : आमचेया सर्वज्ञांसीं खेळु प्रतदीनीं श्रीप्रभुचा प्रसाद : आरोगण : ३ :

हंसराज श्रीप्रभुचीये सेवे राहावणे :४: दोहीं देउळांचीये संदी : संदीचा ऊंबर-वटु : ५ : पसीमे जगतीची खीडकी : ६ : खीडकीये बाहीरि वाव्ये परीश्रये : ७ : तेथचि उदकावीण योगु : ८ : भीतरि संदिचेया उंबरवटावरि श्रीप्रभुचरण प्रक्षाळणें :९: आदित्या मागां आमचेया सर्वज्ञा आसन : १२ : भैरवापूर्वे दुसरें भैरवाचें देउळ : १३ : भैरवादक्षिणे अग्नकोणा आश्राइत : धीजा मार्गु सांघणें : १४: ॥७॥

आदित्या भैरवां पूर्वे : केशवाचें देउळ : पूर्वाभिमूख : १५ : केशवामागां

जगती भीतरि : पसिमीली जगतीसि : सैंग उतर दाक्षिण : पूर्वाभिमूख पटिसाळ : तेथ बारा ब्रम्हेयांसीं खेळु : उत्तरेचां सीरां : बटभैरवांची देउळी : २ : एक म्हणति तेथ दोही देवां भेटि : ३ : त्या भैरवां उत्तरे : भोजनता : बारव : ३ : भैरवापूर्वे : पूर्व पसिम पटिसाळ दाक्षिणाभिमूख : ४ : तीये पटिसाळे पूर्वाली सीरां जळसेनाची देउळी : ५ : तीये पासौनि : दोहीं पटिसाळांचीया देउळीयांसीं खेळु : ६ . केसवादक्षिणे : दसावतारांसी खेळु : ७ : पटिसाळेचां पूर्वीला सीरां गणेसु : तेणेंसीं खेळु : ८ : गणेसा दाक्षिणे रामु : सीता : लक्ष्मणु : यांचीया : देउळीया : तेयांसीं खेळु : ९ : गणेसा अग्न कोणी संन्यास मढु : १० : अनोबासाचीया वासना : तेथ संन्यासु स्वीकारिला : ११ : केशवा अग्न कोणी : ईश्वर पार्वतीचे देउळ : तेयांसी खेळु : १२ : केशवापूर्वे गरुडाळें : पसिमामूख : तेथ गरुडसीं खेळु : १३ : तेयासि उतरे पद्मेश्वरू : तेणेंसीं खेळु : १४ : ईश्वर पार्वतीयेचेया देउळा पूर्वे : बारवेचे कांठी : सावित्रीचा वडु : तेणेंसीं खेळु : १५ : तेथचि जगतीचा दारवठा : पूर्वाभिमूख :॥ ७ ॥

तेयां वडापूर्वे पांडां तीसाचेनि मानें : बंदेस्वरू पूर्वाभिमूख : १ : तेथ अवस्थान अनियेत वासी : २ : बुंदेश्वरा पसिमे पांडां चौंचेनि मार्गे : ब्राम्हणा आसु देणें : ३ : बुंदेस्वरा नैर्ऋत्ये पांडां दाहांचेनि माने मात्र कौळींचे देउळ उत्तराभिमूख : तेथ खेळु : ४ : बुदेस्वरा पूर्वे आसन : ५ : ॥ ७ ॥

बुदेस्वरापासौनि तळेयांचा वोणा : पांडां वीसांचेनि मानें : चीरेबंध घाटु : तीये घाटीं खेळु : क्रीडा : १ : बुदेस्वरा पूर्वे पांडां दाहांचेनि माने : पाळेश्वर तेथ खेळु : २ : तेयां पूर्वे वोणा घाटीं : तेथ म्हाइंभट थापा हाणणें : ३ : ॥ तेयां दक्षिणे उत्तरवटीं : बोपा थापा हाणणें : ४ : ॥ ७ ॥

माहाकाळी माहालक्ष्मी पसीमामूख : १ : पटिसाळ : २ : उंबरवटु : ३ : दारसंका : ४ : आडदांडी : ५ : चौक : ६ : माहालक्ष्मीसीं खेळु : ७ : माहाकाळीसीं खेळु : ८ : अवेवांते व्यतीक्रमें : अनुक्रमें म्हणणें : ९ खांबांसी खेळु : १० : दोहीं खातां लपु स्वीकारणें : ११ : बाहीरि देउळांचा : चातुर्दक्ष भद्रें नव : तेयासी खेळु : १२ : जगतिचा दारवठा पूर्वाभिमुख : १३ : दारवठेयांतु रीगतां डावेया हातां पींपळु : तेयांसी खेळु : १४ : ॥ ७ ॥

माहाकाळी उत्तरे : सूर्यकांताचें देउळ : तेयासीं खेळु : १ : त्यापूर्वे अग्न कोणा

आश्राइत : सोमकांताचें देउळ : त्यासीं खेळु : २ : सोमकांता इसान्यें ब्रम्हनाथाचें देउळ : पूर्वाभिमूख : १ : ॥ ® ॥

ब्रम्हनाथा पसिमे लिंगाची देउळी : पूर्वाभिमूख : तेथ खेळु : १ : लिंगाचीये देउळीये इसान्ये नगरेस्वराचें देउळ : पसीमामुख : २ : तेथ सामान स्त्रीचा वर्णभेदु करणे : २ : नगरेश्वरा इसान्ये भावइंचे स्थान : १ : भावइंसीं खेळु : १ : उडी पारू : २ : माडां मांडौ : ३ : वडयाचें तोरणें : ४ : हळेदीचीया पोतलीया :५: लोटी फोडणें : ६ : ॥ ® ॥

नगरेश्वरापूर्वे पांडां दों चौ दोपेचे स्थाने : दोवे सोंपणे : १ : नगरेश्वरा दक्षिणे लिंगाचे देउळ : तेथ क्रीडा : २ : ॥ ® ॥

नगरेस्त्ररा उत्तरे वीघेयां दोंचेन माने : मूळ वीहिरि : तेथ उदका आश्राइतः श्रीमूर्ति झळबणे : १ : नगरेस्वरा इसान्ये विघेया दोचेनि माने कळंकेश्वराचें देउळः पूर्वाभिमूख : १ : त्यासि दक्षेणे : सेजोसे आदित्याचे देउळ : पूर्वाभिमूख : तयासि खेळु : २ : दोहीं देउळांचीए सदी : मांजरा स्थीति : तोंचि मार्गा घाटु : ४ : कळंकेश्वरा मागा घाटा खालि वीहिरि : ५ : कळंकेश्वरा दखीण विभागीं पिंपळु : तेणेंसी प्रदक्षेणा : ६ : आदित्या पुढां गाइसी खेळु : ७ : एकी वासना कळंकेश्वरा पुढां : पांडां चौं : पींपळु : तेथ आसन : प्रदक्षेणा : फांकटा आंगुळीया घालीति : ७ : ॥ ® ॥

कळंकेश्वरा पूर्वे अन्न कोणा आश्राइत : वीघेया चौचेनि मानें : नगराचा पऱ्हीवाः तयांतुनि येणें जाणें : १ : ॥ ® ॥

तेया दक्षीणे वीघेयाचेनि मानें : रेणुकेचें देउळ : उत्तरामुख : तीयेसीं खेळु : १ : ॥ ® ॥

तीये उत्तरे : वाव्ये आश्राइत : वीनाएक : पूर्वाभिमूख : तेथ अवस्थान : १ : वीनाएका पूर्वे कोल्हारि पसिमामुख : तीएसी खेळु : २ : जगतीचा दारवठा : पसिमामूख : ३ : ॥ ® ॥

गणेसापूर्वे पांडां चाळीसांचेनि मानें : चांचलेस्त्ररू उत्तरा मुखः तेथ अवस्थान . . : आवो मेला तूं जाए तूं एथ अविद्ये सहीत आहेसि म्हणे : ऐसे अनीएत अवस्थान म्हणति : श्री गुंडम पहुड स्वीकरीति : ॥ ® ॥

चाचलेस्वरा अग्नं कोणी दक्षीण आश्राइत : साते आवार : धेडे : १ : लेंपुटें : २ : कणगरे : ३ : भुजाडे : ४ : खैवंग : ५ : बोढेकार : ६ : भट : ७ : ऐसें सातही आवार : सातांही आवारीं : आरोगण : खेळु क्रोडा : ।। ⊛ ।।

तेया आवारा इसान्ये भोपे यांचा आवारू : नगरांतु जगतीसीं तेथ : आरोगण : खेळु : क्रीडा : ।। ⊛ ।।

आळीये आंतु अड्ड अवलोकणें : ।। ⊛ ।।

तेया आवारा पूर्वे नगरा बाहीरि प्रसीद्ध परसरामाची जगती : पूर्वामूख : परसरामाचे देउळ पूर्व्रामुख : १ : पूजे आश्राइत श्रीकर घालुनि : परसरामु स्पर्शणें : २ : परसरामा दक्षिणे पांडां दों : एकवीरेचें देउळ : पूर्वाभिमूख : तीसी खेळु : ३ : परसरामा पुढां गरुड : तेणेंसीं खेळु : ४ : परसरामा इसान्ये विहीरी तेथ खेळु : ५ : जगती बाहीरि पुढें : पांडां चौंचेनि मानें : त्वंगु : तेथ सीमुगा सींपणें : ६ : तथा पात्रनाचु अवलोकणें : जगती बाहीरि इसान्य कोणी : पांडां चौ कां पांची श्रीचरणु लावणें : ७ : ।। ⊛ ।।

काढी इसान्ये पांडांवीसां : उत्तरे वटीं कटि गाळि देणें : ।। ⊛ ।।

तेया वाव्ये पांडां साटीचेनि मानें : समसानेश्वरू पसीमामूख : ।। ⊛ ।।

तेया भवंती समसान स्थळी : १ : तेथ कपाळमोचन होए तवं चरण चारीआं उभे : २ : ।। ⊛ ।।

आतां नगरा इसान्ये देवाळें : १ : तेया देवाळियाचीये पसिमीले पाळीवरिः तीनि देउळें : प्रसींधें : जगतीचा दारवठा अग्नं कोणी : दक्षिणाभिमूख : १ : भीतरि चंडिकेचें देउळ उतराभिमूख : २ : खीडकी पूर्वाभिमूख : ३ : चंडीकेचेया देउळापूर्वे : वैजनाथाचें देउळ : पूर्व्रामिमूख : ४ : वैजनाथा उत्तरे : इसान्ये आश्राइतः प्रेजांचि नागनाथु : ५ : वैजनाथा पूर्वे घांटी स्नान : ६ : तेथचि कर्मा मानु देणें : ७ : त्या पसिमे पांडां दों वस्त्रें वेढणें : तेथचि ब्रम्हा मानु देणें : ९ : वैजनाथा उत्तरेः इसान्ये आश्राइत : सोमनाथु पूर्व्रामुख :१०: सोमनाथा उत्तर : वाव्ये आश्राइत : गोपाळांतु खेळु : आरोगण . ११ : सोमनाथा पसिमे लघु परिश्रए : १२ : सोमनाथा पसिमे चंडिके उतरे वेदिका : १३ : चंडिकेहुनि हात वेनसीं : बोळावीत येणें : १४ : वैजनाथा दक्षिणे : लक्ष्मीनारायण पूर्व्रामूख : १५ : लक्ष्मीनारायणा

अग्नें संकनाथु : पूर्वाभिमूख : १६ : संकनाथा नैर्ऋत्य कोणी लंकनाथु : पूर्वाभिमूख : १७ : तेथचि वंकनाथु उत्तरामुख : १८ : वंकनाथा दक्षीणे मल्लिनाथु : पूर्वाभिमूख : १९ : मल्लिनाथा पूर्वे सीदोरीचा पींपळु : तेया चींचा : २० : तेथ ब्राम्हणाचें अन्न : आरोगण : २१ : आवघीया देउळीयांचीया प्रतीमांसीं खेळु: २२: जगतीचीये नैर्ऋत्य कोणी बाहीरि अडु अवलोकणें : २३ : जगती बाहीरि दक्षीणे नैर्ऋत्य कोणा आश्राइत : पांडा वीसांचेनि मानें नींबु : तेया तळि आसन : २४ : एकी वासना : तळेयाचींये दक्षिणीली पाळी सीदोरीचा पींपळु : २५ : त्या पूर्वे पांडां चौंचेनि मानें अळंकार लपवणें : २६ : तळेया अग्न कोणी दोन्ही अरणी दर्शन देणें : सीष्टाई करणें : २७ : ॥ ⊛ ॥

वैजनाथा अग्ने वीचेयां चौं पांचांचेनि मानें : खेडमार्गी गौळणीचा वडु : तेथ दहें दुधें चाखणें : १ : तोचि खेड मार्गु : २ : खेडमार्गी चुडजे तियेसीं खेळु : ३ : गौळणीचेया वडां अग्ने चिंचा : तेथ घोडे हाटु : तेथ क्रीडा : ४ : ॥ ⊛ ॥

आतां केशव वीहीरि : १ : केशव नाएकाची वीनती : २ : पाणी लागैल म्हणणें : ३ : उद्यापन करवणें : ४ : केशववीहीरीचे दोनि रीगावे : येकु पसिमामूखु : ५ : एकु उतरामुखु : ६ : मध्यें सारणि : ७ : गोमुख पसिमामूंख : ८ : गोमुखा पसिमे हळु : पूर्वा पसीम तेयांसीं खेळु : ९ : विहीरी दक्षिणे पव्हे : १० : पव्हेचें उदक स्वीकार : ११ : तेथ गणेसेंसीं खेळु : १२ : विहीरी पव्हे मध्यें मांडो : १३ : तेथ उदक पान : आरोगण : १४ : ॥ ⊛ ॥

पव्हेसि दक्षिणे गरूडी : तेथ सीरां आसन : २ : गरूडीं दक्षीण पांडां तीसां : मातांगाची पव्हे : ३ : तेथ उदक स्वीकारू : ४ : ॥ ⊛ ॥

आतां वोडियाळेया पूर्वे : पांडां वीसांचेनि मानें : रामनाथाचें देउळ पूर्वामूख : १ : रामनाथाचां चौकीं वस्त्रें : २ : वोली परीत्येजणें : कोरडीं वेढणें : ३ : रामनाथा पुढां पसिमाभिमूख : नांदियाचें साजे : नांदियासीं खेळु : ४ : जगतीचा दारवठा उत्तरामूख : ५ : रामनाथा अग्न कोणी : पांडां दाहां वडामध्यें: नरसिंगदरणेयांचें दुसः वासना : रामदरणेयांचें : तेथ मर्दना : मादनें : पूजा : आरोगण : ६ : रामनाथा दक्षिणे : पांडा दाहा पींपळु तेथ कन्हेरी पोमाइसे: उदक ओळगवीति : ७ : ॥ ⊛ ॥

रामनाथा उत्तरे केशव विहीरी : विहीरीवाव्ये पांडां चाळिसाचेंनि मानें : माणिकेश्वरू पूर्वाभिमूख : तेथ खडकांबुळां खेळु : १ : पुढां माणीक विहीरी : ३ : रीगावे तीनि : एकु पसिमे एकु उत्तरे : एकु दक्षिणे : तेथ क्रीडा : ३ : ॥ ® ॥

आतां म्हाद्वारापुढें: पूर्वे वोडियाळे : १ : पासिमीली पाळी विसेखु : पोळांचे बैल शृंघारणें : १ : कुमारीसीं गौरासी खेळु : भोडणें पन्हवणें : ३ : मांडें पन्हवणें : ४ : चौथीचे गणेस बोळवणें : ५ : दीवाळीचीया म्हैसी श्रृंघारणें : ६ : तीनि पाळी वीसेखांचीया : ७ : वोडियाळीचीया उतरीली पाळी : : इसान्य कोणीं : वाटे उत्तरे वडु : तेथ खोंकरीं आधण घालणें म्हणणें : ८ : ॥ ® ॥

आतां नगर माहाद्वार : पूर्वामूख : १ : तेथचे वीसेख : दाहीं दारसकांचेयां घोडेयावरि आसन : १ : घोडेया आड आसन :२: तेथ गाई बुजवणे : ३ : नगर माहाद्वारापुढें : गोपाळांचें झुंझ : त्यांतु खेळु : ४ : माहाद्वारा इसान्ये : पांडां वीसांचेनि माने : नासीकमुक्त त्रिपलाणे : ५ : तयापूर्वे वनीतांचे तडवे : तेयांसी खेळु : गोरी : काळी : सावळी : भणति : दीघडी; खुजी : ठुसक म्हणाति : अवेव विसरेती : अळंकार विसरेति : ६ : माहाद्वारा बाहीरि : रीगतां उवजेया हाता : कबाड हाट तेथ खेळु : ७ : रीगतां डावेया हाता : मातांगाचा हाटु : तेथ खेळु : ८ : ॥ ® ॥

नगर माहाद्वार भीतरि रीगता उजवेया हाताः पांडां आठां हनुमंतु : हनुमंतेंसी खेळु : १ : हनुमंता दाक्षिणे : पुढां होळी तेथ खेळु : २ : हनुमंता मागां सुताराचा हाटु तेथ खेळु : ३ : तेथाचि गोंडांचा हाटु : तेथ खेळु : ४ : हनुमता पूर्वे सुताच्चा हाटुः तेथ खेळु : ५ : हनुमंता पसिमे पांडां चौ घागरिसि मुख लावणें: तेथ उदक स्वीकारू : ६ : माहाद्वारा दक्षिणे : रीगतां डावेया हाता : समीपतुप सांतु : तेथ खेळु : ७ :॥ ® ॥

तुप सांते पासिमे : दानीयांची चाउडी तीयेवरि गणेसु तेणेंसीं खेळु : १ : तेथचि दर्पणीं श्रीमुख पाहाणे : २ : ॥ ® ॥

चाउडीए पसिमे : वाव्यकोणा आश्राइत : पूर्वपसिम हाटवटी : तेथ पूर्वेकडे माळीयांचा हाट : पूर्वे पसिम : १ : तेथ गुळीचा गाडा विधूळणे : २ : तेथचि बोर विधूळणें : ३ : तेथचि उंसाचा गाडा विधूळणें : ४ : तेथचि मोहाळु कांदे : आरोगण

: ५ : माळियांचेया हाटा पसिमे : गांधी यांचा हाट्ट : पूर्वपसिम : तेथ खाजी आरोगण : १ : ॥ ७ ॥

चाउडीए पसिमे गांधी यांचा हाट्ट : उतरदक्षिण : तेथ खेळु : १ : ॥ ७ ॥

चाउडीए दक्षिणे : पांडां वीसाचेनि मानें : केशवनाएकाची पव्हे : पव्हेचे दोनि रांजन : तेथ उदक स्वीकारू : १ : पव्हे नैर्ऋत्ये पांडां दाहा बारांचेनि मानें : माप फोडा गणेसु : २ : तेथ मापें फोडणें : ३ : तेथें त्याचे माथा मापें फोडणें : ४ : तेथचि भुसार हाट : तेथ मापें उमानीति खरें खोटें म्हणति : ५ : ॥ मापु फोडेया दक्षिणे तीव्हाळा पांडां चौचेनि मानें : तेथ प्रकासु दर्शन : १ : ॥ ७ ॥

तीव्हाळेया पूर्वे ताने यांचा हाटु : तेयांसीं खेळु : १ :॥ ७ ॥

आतां हटकेश्वरू : पसिमामुख : मंडपाचा दारवठा उत्तरामूख : जगतीचा दारवठा उत्तरामूख : १ : तेथ हटकेश्वरीं कंटकेश्वरी कंटक नित्रुति : ॥ ७ ॥

जगतीचीये वाव्य कोणी : सोवणीयांचा हाटु : उत्तरदक्षिण : १ : केशवनाएकाचें : इश्वरनाएकाचें : दोनि दुकानें : तेया उत्तरे तीसरें : म्हाइं भटाचें दुकान : तेथ आसुंसीं खेळु : तेया उतरे धाकुटे सोवणी : तेथ खेळु : ॥ ७ ।

सोवनीहाटा पसिमे : कांसार हाटु उत्तर दक्षिण : तेथ खेळु : १ : कांसार हाटा पसिमे : सींपेहाटु पूर्वपसिम तेथ खेळु : ॥ ७ ॥

सींपेहाटीं चौबारां गणेसु : तेणेंसीं खेळु : ॥ ७ ॥

हटकेश्वराचींयि जगतीसि पाहीरि पसिमे रांधवणें हाटु : उतर दक्षिण : तेथ पूर्वीली ओळी श्रीप्रभु सर्वज्ञ : पसिमीली वोळी आमचे सर्वज्ञ : मध्यें दोहीं देवां भेटि : १ : सेंगुळें बुडुडें निमीत्यें ज्ञानशक्ति स्वीकारू : ॥

हटकेश्वरा इसान्य कोणी : जगती बाहीरि दुसीयांचा हाटु : तेथचि धाकटे दसी : तयांसीं खेळु : २ : ॥ ७ ॥

हटकेश्वरा उतरे : जगती बाहीरि : वाएनाएकाचें दुकांन उतराभिमूख : तेथ खेळु : १ : हटकेश्वराचीये जगती बाहीरि : इसान्यकोणी उभेयां घडीयांचे चाटे कोष्टे : तेथ खेळु : २ : हटकेश्वरा पूर्वे जगती बाहीरि : धनगरांचा हाटु : तेथ खेळु : ३ : हटकेश्वरा दक्षिणे : जगती बाहीरि : तांबुळियांचा हाटु : तेथ खेळु : ४ पाने फेरीति : ५ : काट मोवीति : ॥ ७ ॥

हटकेश्वरा दक्षिणे कुंभारवाडेया पूर्वे : पांडां वीसां खाटीक हाट्ट : तेथ सीळेवरि खेळु : तथा परडी : ॥ ७ ॥

कुंभारवाडेया दक्षिणे : पांडां पांचा ळाळळाचा हाट्ट : तेथ खेळु :१: हटकेश्वरा नैर्ऋत्ये पांडां दाहांचेनि माने : रूपनाएकें वीनउनि घोडेया आरोहण : २ : हटकेश्वरा नैर्ऋत्ये पांडां वीसांचेनि मानें : कुंभारवाडा : १ : वासना : तेथ मोगरसुल १ मडकेयासी खेळु : २ : मडकी घें टाळीति : आवा रचीतां आणुनि देति : आवा उकलीतां मडकी यांसी खेळु : वाजवीति : धड फुटके म्हणति : आडकीणें : पैकणे म्हणति : ॥

कुंभारवाडेया उत्तरे : पांडां दाहां वाटे उत्तरे समीप : इगळु वमणे : ॥ ७ ॥

त्या पसिमे पांडां तीसांचेनि मानें : देसभृत्याचा आवारू : तेथ दोघांमध्ये पहुडु : कदाचीत : आरोगण : कदाचित वीडा : तेयाची स्त्री ते येकली असतां : बीजें करीति :

तेया दाक्षिणे समीप तेलिणी हाट्ट : तेथचि डो आणुनि देणे : १ : श्रीमुगुटीं तेल घालणे : २ : लेकरू आणुनि देणें : ३ : मागुते घरा नेणें : ४ : ॥ ७ ॥

देसभृत्याचेया आवारा पसिमे : पांडां चाळिसांचेनि माने : न्हावी यांचे आवार: तेथ खेळु : १ : श्रीमुकुट वीचरूनि दाढी संवरीति : आरीसा पाहाति : ॥

न्हावी यांचेया आवारा दक्षिणे वाटु : वाटे दक्षिणे समीप : चोहटांचा वडु : तेथ गौळणीची दहे दुधे चाखणें : १ : वडा नैर्ऋत्य कोणी : पांडां वीसांचेनि माने : नीळकंठाचें देउळ : पूर्वाभिमूख : तेथ खेळु :२: नीळकंठा वाव्ये पांडां तीसांचेनि मानें : माळां जांबु तेथ खेळु: ३ : त्या पसिमे काळिका तेथ खेळु : ४ : ॥ ७ ॥

आतां दक्षिणेचे नगर माह द्वार : रीगतां उजवेआ हाता : भीतरि मातांगवाडा : तयांचां घरी खेळु क्रीडा : मग बाहीरि घातलीं : तोही रीगतां उजवेया हाता बाहीरि : मातांगी वीनती : २ : माहाद्वारा बाहीरि : उजवेया हाता समीप : म्हाइंभटीं श्रीप्रभु पुसणें : ६ : माहाद्वारा अंतु वाटे समीप : उत्तर दक्षिण : पांडा चाळिसांचेनि मानें : कोठें : तेथ केशव नाएकाचा कोठा झाडणे : ४ : ॥ ७ ॥

माहाद्वारा दक्षिणे : वीघेयां सांचेनि मानें : मातांग वीहीरि : ते खाणवणें: ॥ तीसि उत्तरे पांडां वीसांचेनि मानें : गोपाळांचा वडु : तेथ गोपाळांसीं खेळु: आरोगण : ॥ मातांग वीहीरी दक्षिणे । नेतनांचेनि मानें गणेसु : तेणेंसीं खेळु :॥: तेया दक्षिणे

पांडां दों गोळणीचा वडु : तेथ गोळणीसीं खेळु दह दुथे चाखणं : येकी गोळणीतें गालवी धरुनि राहावणे : तेथचि दोही देवां भेटि : ॥ ७ ॥

त्यासि दक्षिण नेतनाचेनि मानें : तेलाळे · तेलाळां क्रीडा :१: पसिमीली पाळी पांचै पींपळ : तेयांसीं खेळु : २ : तळे याचीये पसिमीली पाळीं उत्तरवृटी : हंस- राजु राहावणें : ३ : पिंपळा उत्तरे : तळेया वाव्ये पाळीवरि गोपाळांचा वडु : ।

वडाउत्तरे पांडां चाळीसांचेनि मानें : द्रावडांची भेटि : ॥ ७ ॥

आतां राजमठा नैर्ऋत्य कोणी : वीघेया पांचांचेनि माने : वांकांवेसि : उत्तरामूख: ॥

आतां महालक्ष्मीचें देउळ : साधांचेया वोटा पूर्वे : उत्तराभिमूख : माहालक्ष्मीचें देउळ : १ : जगतीचींये वाव्य कोणी : आउसांची गुंफा पूर्वांमूख : जगतीचींये नैर्ऋत्य कोणी दुसरी देहअवसानाची गुंफा : ॥ ७ ॥

जगतीचा दारवठाया इसान्य कोणीं : पूर्वाभिमूख : ॥ ७ ॥

तेथा दारवठेया उत्तरे गोगटलेचि नगर माहाद्वार : पसिमामूख : ॥ ७ ॥

तेया पूर्वे पांडां पंधराचेनि माने श्रावणी : तेथ केसवनाएकाची वस्त्रपूजा : १ : श्रीचरण प्रक्षाळीति : २ : वस्त्र वोळघवीति : ३ : जाणीत्रेयाचा जोडा वोळग- वीति : ४ : श्रावणीये दक्षिणे जवळीचि लेकरूंवीं वेलिवेटि : ५ : ॥ ७ ॥

श्रावणीये उत्तरे : भैरवां दक्षिणे : खोलवटी घोडेसानु : एकी वासना नवे :१: घोडेयावरि आसन : २ : घाटेयां हरि भटा भेटि : ३ : सिंगणापुरा जाये म्हणणें : ४ : श्रीचरणे टांकलीति : कडबाडाचेनि ताजणेनि हाणती : मेला जाये चालेना म्हणेति : ६ : श्रावणीए दक्षिणे राजबीदि : घोडे दोनि : ॥ ७ ॥

श्रावणीए अग्न कोणी : पांडां वीसांचेनि माने : राजबीदीचां पसिमीली सीरां : खालवटीं : मृत्य वछ जीववणें : ॥ ७ ॥

आतां आवार नगरांतुल : श्रावणीए दक्षिणे : पांडां तीसांचेनि माने : देव दीक्षि- तांचा आवारू : उत्तराभिमूख : १ : त्या पूर्वे सेजारिच मृत्यवछाचा आवारु : उतराभिमूख : २ : टेकाळी उतरौनि राजबीदीचां पसिमीली सीरां : उतरवटी : भट थापा हाणणे : ३ : तेचि राजबीदि साळेपासौनि उतरे : पूर्वपासिम : ४ : तीये राजबीदीचां पसिमीळी सीरां : बीदी उत्तरे कोहाळियेचा

आवारू : पूर्वाभिमूख : ५ : तेथ उपडोनि कोहळी लावणें : ६ : गाटी आंत कोहळी : धानी घालणें : ॥

आतां साळ पूर्वामुख : तेथ पठण : १ : वेद अभ्यासणें : २ : साळेचेया वाव्य कोणी बोपदेवो उपाध्याचा मढ : तेथ अवस्थान : ३ : पेडीये गमन : १ : अतरीक्ष पेडो येणें : तेयाचेया वासरुवासि पेडी घालणें : ३ . तांबीया भरूनि देणें : ४ : मर्दना मादण आंगणीं . ५ भीतरीला खांबेंसीं आरोगण ६ : मढांत रीगतां डावेया हाता . पटिसाळेवरि चाटेयातु पहुडु : ७ : प्रकास दर्शन ८ : चाटेया चुकि सांधणें : ९ : उपाध्यां चुकि साधणे . १० :

साळेचीये नैर्कृत्य कोणी भीतरि सुंतवणि यांचा मढु : पूर्वाभिमूख : १ : साळे चिये अग्न कोणी आंतु : कान्हो पाध्याचा मढु उत्तराभिमूख : २ : कान्होपाध्यांचा पुत्रु रामदेओ पाध्ये : ३ : जनोपाध्ये : ४ : माहादेओपाध्ये ५ : हे तीघ भाऊ आंतु . दोघे वेगळ : बोपदेओ पाध्ये तीकोपाध्ये : हे दोघ भाऊ सापत्नी . ऐसे पांच भाऊ :

साळेचीये जगतीचा दारवटा पूर्वाभिमूख : तेथ वीनाएकेसी खेळु . २. साळे इसान्य कोणी जगतीभीतरि माणीक वीहीरि : १ : रीगात्रे दोनि . रीगावा दक्षिणामूख देउळीयां माणिकेश्वराची पासिमामूख : १ : ब्रम्हनाथाची पूर्वाभिमूख : २ . साळ ते माणिकेश्वराचे देउळ : २ : बोपदेवो पाध्यांचा मढु . तो नाराएणमढु : ३ : सुतवणियांचा तो दैत्यसूदनाचा मढु : ३ : कान्हो पाध्यांचा मढु : तो गोवर्धनाचा मढु : ।

आतां साळेचीये जगती बाहीरि : पश्चिमे समीप : ईश्वरनाएकाचा आवारू . उत्तराभिमूख : १ : ईश्वरनाएकाचेया आवारा पसिमे : सेजाचि केशवनाएका आवारू . उत्तराभिमूख महाप्रसीध : १ : चोंकी-पूर्वामूख : १ : तेथ दधि करंबा : आरोगण : २ : परीसा निमंत्रणी : आरोगण : ३ : घोडवडी दक्षिणाभिमूख : ४ : अग्न वात सुचणी : हासुतेल : हाणपुटे म्हणणे : ५ : रांजणवटी चोंकीये पूर्वे : पसिमा-मूख : तेथ आसनें : वीडा : ६ : चोंकीये अग्न कोणी वोवरीया सात : एकी वासनां नवें : ७ : जगतीचिया अग्न कोणा आश्रइत : पन्हिवा तेथ क्रमि ब्रम्हपदा नेणें म्हणणें : ८ : चोंकीये अग्न कोणी भानवस-घर : तेथ सकळ पदार्थां सबधु देणें ९ : मांचळीयेवरि आसन : मांडेयाचीया चवडी करणें : १० : व्यतीक्रमें : अनुक्रमें

गणणें : ११ : माइलालुखीए जेवितां चोरूनि घांसु घेणें : १२ : तथा देहांतीं संबंधु देणें : १३ : ॥ ❁ ॥

केशवनाएकाचेया आवारा पूर्वे : तेयांचे भाउ कान्हनाएक : तेयांचा आवारू : १ : ॥ ❁ ॥

तेयाचि उत्तरे फोडौनि रांजणु सांदणें : तो आवारू उत्तरामूख : ॥ ❁ ॥

साळेचीए नैर्ऋत्य कोणी : जगती बाहीरि : केसवनाएकाचेया जावायाचा आवारू : १ : ॥ ❁ ॥

केशवनाएकाचेया आवारा उतरे : उपासनीयांचा आवारू पूर्वामूख : चौकी पूर्वाभिमूख : १ : चौकीए आंतु रीगौनि सलुदीचीया आसु काढुनि पटिसाळे दक्षिणीली कडे : पारूखणें : २ : चौकीएचा अग्न कोणी : राजणी श्रीकरू धुणें : ३ : चौकीये पूर्वे घर दक्षिणाभिमुख : तेथ कुंडीं श्रीकरू दाखवणें : ४ : ॥ ❁ ॥

केशवनाएकाचेया आवारापसिमे : समीप : वेसपंडितांचा आवारू : उत्तराभिमूख : १ : चौकी उत्तराभिमूख : १ : ॥ ❁ ॥

वेसपडितांचे या आवारा पसिमे : तेयांचेया जावायाचा आवारू : १ : ॥ ❁ ॥

साळेचीये जगतीसि बाहीरिलां आंगीं : वाव्य कोणी : उतराभिमूख : खाता तेथ गणेसू : १ : तेथचि गणेसू दूसरा : २ : तेथचि वोटेयावरि केशवनाएकाची माता : आणि इश्वर नाएकाची माता : श्रीप्रभु सर्वज्ञांचेया श्रीचरणा तुलसि वाति : मग जेवीति : येक म्हणति नैर्ऋत्ये हा वीसेखु : ३ : तेथचि ठेंकटमए निवृत्ति : ॥ ❁ ॥

साळेचीए जगती बाहीरि उतरे : पांडा पंधराचेनि मानें : सुतारांचा आवारू : ॥ ❁ ॥

सुतारांचेया आवारा अग्ने साळे उत्तरे समीप : रजकांचा आवारू पूर्वामूख : रजकांचेया आवारा उतरे सुद्रगृहीं : आरोगण : तो आवारू पूर्वामुख । तेथ सार्धा प्रसादु ग्रहण : ॥ ❁ ॥ ❁ ॥

साळेचीए जगती बाहीरि वाव्य कोणींचेया गणेसा उतरे : पांडा वीसां अळंकाराचा आवारू : उत्तराभिमूख : ॥ ❁ ॥

साळे वाव्ये पांडा दाहांचेनि मानें : पाखाळें बाळक लपवणे : ते आवारू उतराभिमूख : ॥ ❁ ॥

६. तेया पसिमे लागलाचि कापुस पाहाळीं बाळक लपवणें : तो आवारू उत्तरामुख : ॥ ७ ॥

तेयासि उत्तरे लागलाचि : मृत्य बाळक जीववणें : तो आवारू पूर्वामुख : १ : तेया समीप उत्तरे : जीसि दीधलें तीचें घर पूर्वामूख : २ : मृत्य बाळकाचेया आवारा पसिमे : राजबीदी सीरां कोहळीयेचा आवारू : पूर्वामुख : गारीसि कोहळी : धाइ घालणें : ३ : साळे उत्तरे पसिमे टेंकाळी : ॥ : जीसि दीधलें तेया घरासि उतरे : आग्रहे भोजन मागणें : तो आवारू उत्तरामूख : ४ : ॥ ८ ॥

तेया आवारा उत्तरे : बोप्याचा आवारू : ५ : आग्रहें भोजन : तेया आवारा पूर्वे : घोडी घेववणें तो आवारू उत्तराभूख : ६ : तेयासि पूर्वे लिगटलाचि सार्धे । लपाली होतीं : तो आवारू उत्तरामुख : तेथचि बाळकांतु भोजन : ७ : तेयासि इसान्य कोणी : खातियांचा आवारू : उत्तरामूख : तेथ खीरि : आरोगण : ८ : साळेचीया जगतीचेया इसान्य कोणी : उत्तरे : ताळांचा आवारू : पूर्वाभिमूख : ९ : तेयासि उत्तरे : गौरवीचा आवारू पूर्वाभिमूख : तेथ गौरवी बैसणें : १० : तेयासि इसान्ये राजबीदी पसिमे भद्राचे स्थान : ११ : भद्रा वाच्ये आरद्र वस्त्र विमोचनी मृत्य सुचणे : तो आवारू पूर्वाभिमूख : १२ : तया उतरे यंत्र करणे : मृत्य सुचणे : तो आवारू पूर्वाभिमूख : १३ : भद्राइसान्ये बीदीचां बेजां पाटु पाणीपूर्वक सन्यासिया वीपलाणे : १४ : भद्रापूर्वे राजबीदी पूर्वे : टोकणे यांचा आवारू पूर्वामुख : १५ : चौकी पूर्वेमुख : १ : घरांतु रीगत उजवेया हाता दारसकेसीं आसन : श्रीमुगुटींचें तेल : श्रीकरें दारसकेसि पुसणें : २ : तेथचि मर्दना : आंगणी मादने : ३ : घरीचीये बाइकोसि पडदणी देणें : ४ : पुत्र दानी नाळ श्रीकरी धरूनि अनुकार करणे : ५ : सात खांडिया : पांच खांडीया वेचावीया म्हणणें : ६ : बारसेया भीतरि पूजा : आरोगण : ७ : १६ : टोंकणेयां आवारा पूर्वे मंगळागौरीचें स्थान : १७ : तेयासि उत्तरे : पांडां वीसांचेनि मानें अवकाळीं वांगें मागणें : तो आवारू पूर्वामुख : १८ : तेया पूर्वे पांडां वीसांचेनि मानें : आपेयाचे आवार : १९ : त्या दक्षिणे समीप : करंडवेयाचे आवार : २० : ॥ ९ ॥

आतां उत्तरेचे पाणि वाटें : २१ : तेथौनि राजबीदीं : साळेचा दारवठापर्यंत : २२ : नागमठाण साळेचीए जगती बाहीरि : इसान्य कोणी पूर्वाभिमूख : २३ : तेया पूर्वे बीदीसि श्रीचरणें वळण बांधणें : उदक धरणें : २४ : उत्तरे कडौनि राजबीदी

चंडिका बोळवीत येणें : २५ : नागमठाणा पूर्वे घोडा : २६ : घोडेयावरि आसन : २७ : दो : ची वोवाळणी : २८ : घोडेया दाक्षिणे माहाजनाचो भेटि : २९ : ॥ ❀ ॥

घोडेया पूर्वे चौतोंडा गणेसू : १ : तेथ लपंडाही खेळणें : १ : श्रीमुगुट दाखवणे : २ : तेथ चि चिंचोरा खेळु : ३ : तेथचि तापणे : ४ : भुइं आणवणें : ५ : खीरि वाढणे : ६ : ॥ ❀ ॥

गणेसापूर्वे पांडां वीसांचेनि मानेः तोंडळेया जोगनाएकाचा आवार पूर्वाभिमूख : नळींचें वस्त्र तेणें वोळगवीले : ३ : त्यासि उतरेः तोंडळेया गोंविदनाएकाचा आवारू : पूर्वामूख : ३१ : जोगनाएकाचेया आवारा दाक्षिणे : तोंडळेया विठलनाएकाचा आवारूः उतरामुखः त्याची सेंदः तेणेंचि वोळगवीलें : ३२ : ॥ ❀ ॥

साळेचीए जगतीचीए कोणी : तीव्हाळा प्रकाशु दर्शनु : ३३ : साळेचीया अग्न कोणी : पांडां दाहांचेनि मानें : चंडिकापुराचें देउळ : तेथ गणेसी अनीयेधवासीं पहुड : ३४ : चंडिका पुराकडे मामेयां माउसीयेंचें घरः तेथ अवस्थान : ३५ : चंडिकापुरा इसान्येः पांडां चाळिसांचेनि माने सुना दुध वाढणें: तो आवारू पूर्वामुख : ३६ : तेयापूर्वे जवळीचि : पाठि घासणें : तो आवारू पूर्वामुख : ३७ : तेया पूर्वे जवळीचि वीसाण घालणें : तो आवारू पूर्वामुख : ३८ : त्या आवारा दक्षिणे पांडां चाळिसांचेनि माने : तेलीयांचीं घरे : तेथ वेसिद्वारी लोकाची भाकरी म्हणणें : १ : डोनेहुनि देणें : २ : लेंकरूं नेउनि देणें : ३ : ते आवार उत्तरदक्षिण : पूर्वपसीम बीदी : ३९ : राजमढां पुढां : राजबीदीचां पूर्वीली सीरां : रीगतां डावेया हाता : बाळांतिणी पेज वाढणें : तो आवारू पूर्वामुख : ४० : तेचि राजबीदी पूर्वपसिम : ४१ : ॥ ❀ ॥

पेजेचेया आवारा पूर्वे : पांडां वीसांचेनि मानें: रूपनाएकाचा आवारूः उतराभिमूख : ४२ : तेथ आमचेया सर्वज्ञां मर्दना : मादनें : पूजा : आरोगण : ४३ : त्या पासिमे त्यांचेया जावायाचा आवारू : उत्तरामूख : ४४ : घर निरतर क्रीडा : ४५ : एवं रीधपूर ग्रामवासू : ॥ ❀ ॥

आतां दामविहीरिं मार्गीचीं स्थानें : रामनाथा अग्नेमार्गी वीघेया चौंचेनि मानें : साधातें मातांगाचें किडारूं म्हणणें : १ : त्या पूर्वे पांडां चौंचेनि मानें : साधातें

काळवसो म्हणणें : २ : तेया पुढें दुरि वामाची भेटि : ३ : तीए उतरे पांडां वीसाचेनि माने : वामाचा उपाहार स्वीकारू : ४ : तीये भेटी पूर्वे : पांडां चाळिसांचेनि माने : नरसिंगदरणेयांची भेटि : ५ : तीए भेटि पूर्वे पांडां द हां-चेनि माने : मातांगा स्थीति : ६ : तीए पूर्वे दुरि उजवेया हाता गुढा : ७ : गुढेयासी खेळु : ८ : गुढाचा फळ वरि आसन : ९ : टांका भवरि देणे : १० : श्रीकर भवडणे : ११ : घोडेयाचीया परी : आसन : १२ : वोठ गाति आसन : १३ : बाउलेयासि खेळु : १४ : आंगुळिया लावणें : १५ : श्रीचरणु लावणें : १६ : येतां वांकिचा श्रीचरणु लावणे : १७ : ॥ ⊛ ॥

गुढेयापूर्वे वीधेया चौ पांचेनि मानें : अधिकार्याची भेटि : १८ : भेटी नैर्ऋत्ये पांडा वीसांचेनि माने : दुस : तेथ मर्दना मादने : पूजा : आरोगण : १९ : त्यापूर्वे वीघेया पांचाचेनि माने : धर्म हळु : २० : उत्तर दाक्षिण तेणेसी खेळु : २१ : तया दाक्षिणे अडु : २२ : आडा दक्षीणे पांडा येका कोपटी : तेथ सीदोरी : आरोगण : २३ : पोह-रांचे उदक स्वीकारू : २४ : अडापासिमे पांडां चाळिसांचेनि मानें : पांच पीपळ तेणेसी खेळु : २५ : पीपळा नेर्ऋत्ये भटां बाइसांची भेटि : २६ : ये तीऐं म्हणणे : दर्भेश्वरा जाए म्हणणे : २७ : पीपळा उत्तरे वडु : तेथ गोपाळांसीं खेळु : २८ : पीपळा दाक्षिणे नेतनाचेनि माने : आंबजे तीऐसीं खेळु : २९ : आंबजै इसान्ये : वाटे दाक्षिणे : उत्तर दाक्षिण दोन्ही आपवीहीरे : तयांसीं खेळु : ३० : श्रीमुख पाहाति : ३१ : श्रीचरणे पाणी हालवीति : ३२ : हास्य करीति : ३३ : ॥ ⊛ ॥

तेयापूर्वे पसिमीली पीवळतळौली : १ : तेयापूर्वे विघेयां पांचांचेनिमानें : दोहीं देवां भेटि : ३४ : भेटी पूर्वे पांडां चाळिसांचेनि मानें : दुसरी पीवळ तळौली : तेयाचीये पसिमीली पाळी : वाव्य कोणा आश्राइत : तेथ दोहीं देवां आसन : सवादु : २ : दाभ वीहीरीं आमचेया सर्वज्ञा जंव अवस्थान : तंव प्रतिदिनी आसन : श्रीप्रभु सर्वज्ञ येति : श्रीप्रभुची श्रीमूर्ति दीसे तंव आमचे सर्वज्ञ चरणचारी उभे : मग जए करूनि बीजें करीति : ३५ : तेयासि दुरि अग्न कोणी : वीघेया दाहाचेनि माने : दाळोंचे क्षत्र खाजे : आरोगण : ३६ : तेया दक्षिणे आमचे सर्वज्ञ चरणचारी उभे : ३७ : तेया अग्ने वीघेयां सांचेनि मानें : काळा-गुढा : ३७ : तेयासि अग्ने नेतना येकाचेनि मानें : माएपूताची जुझावणी : ३९ :

तेयासि दाक्षिणे विचेयां आउठांचोनि मानें तेलिणी चाडो आणुनि देणें : ४० : तेयासि दक्षिणे नेतनां दोंचेनि माने : तळेयाचीए पसिमीली त्रिभागीं मह्रीक- स्नान : १ : या पाठकासि टीळा जाला म्हणणें : २ : या पाठकासी टीळा नव्हेचि म्हणणें : ३ : मेला जाए हा खणगर्वा म्हणणें : ४ :ऐसें अनुकार करणें : ४१ : तळेयाचीए दक्षिणीलें पाळी रीगांवा विसेख : पोळांचे बैल शृंघारणे : १ : दीवाळी चींया म्हैसी शृंघारणे : २ : गौरिकुमारी तेयांमध्यें खेळु : ३ : भोंडना माडें पोह्वणे : तेयामध्यें खेळु : ४ : रीगावेया पसिम पाळीवरी : गोपाळांचा वडु : तेथ गोपाळांसी खेळु : आरोगण : ५ : ॥ ७ ॥

आतां दर्भेश्वर : दर्भेश्वरु पूर्वामुख : १ : चौहटचा रीगांवा दक्षीणामुख : चौकी आसन : २ : चौका उतरे भैरवांची देउळी : दाक्षिणाभिमूख : तेथ अवस्थान दीस- वीस : भीतरि जावेया चौका आंतुनि वाट : ३ : रीगावां उजवेया हाता सोंडि- एवरि आसन : ४ : तेथौनि वेठी गमन : ५ : तेथाचि रूपनाएका वीनती : ६ : दर्भेश्वरा दक्षिणे सेजेसि मलिनाथाची देउळी पूर्वामुख : ७ : मल्लिनाथा अग्ने आश्रा- इत : दाक्षिणे गणेसाचें सांजे : ८ : जगतीचा दारवठा पूर्वामुख : ९ : रीगता डाविया हाता भीतरि अडु : १० : जगतीची दक्षिणे खिडकी : ११ : जगती इसान्य कोणी : समसान स्थळी : १२ : जगती पूर्वे वीथेया एका परिश्रये : १३ : जगतीचीए अग्न कोणी वीथेयां चौ कामथु : १४ : तळेयाचीए दक्षिणीली पाळी : दर्भेश्वरा इसान्य कोणी : पांडां वीसांचेनि मानें : पींपळु : तेथ वोटपळी पूर्वे तथा पसीमे : १५ : दर्भेश्वरा उत्तरे घाटीं भोजनंता : १६ : एवं दर्भेश्वरूः ॥ ७ ॥

आतां नगराचा रीगांवा उतराभिमुख : १ : तेयासि उतरे पांडां चाळिसांचेनि मानें: नगर वीसांवा तेथ चरण चारी उभे : २ : नगराचा दुसरा दारवठा पूर्वा- मुख : ३ : नगरांतु रीगतां बाहिरी उजवीया हाता हणुमंतु : तेणेंसीं खेळु : ४ : हणुमंता पुढां होळी : तीसि प्रदक्षिणा : ५ : ॥ ७ ॥

रूपनाएकाचेया आवारा जावेया राजबीदि पूर्वपसिम : १ : नगरांतु राज- बीदी दक्षिणे तेलीणीचें घर : उतरमुख : तेथौनि दो नेउनि देणें :२: तेलीणीचेया आवारा उतरे : पांडा वीसांचेनि मानें: उमाइसांचा आवारू उतरामुख : ३ : चौकी उतराभिमुख : ४ : तेथ श्रीमुगुटु वींचरणें : श्रीमुगुटीं उचालणें : ५ : तेथचि मांचळीवरि आसन : आरोगण : ६ : ॥ ७ ॥

उमाइसांचेया आवारा वाव्ये पांडा चाळिसांचेनि मानें : भावैयेचा पारू : तेथ भावैसीं खेळु : ७ : ॥ ७ ॥

रूपनाएकाचा आवारू गांवापासिमे : राजबीदीचा वरिली सीरा : पूर्वाभिमुख : ॥ ८ ॥

चौकी पूर्वामुख : १ : दुसरी चौकी उत्तरामुख : २ : घोटवडि पूर्वपासिम : दक्षिणाभिमुख : ३ : पूर्वामुखे चौकीये आमचेया सर्वज्ञां मर्दना : आंगणीं मादने : ४ : चौकीये भीतरि पूजा : आरोगणा : ५ : ॥ ९ ॥

रूपनाएकाचेया आवारा इसान्ये : वीघेया दोंचेनि माने वडु : तेथ आसन : भटां म्हाइंभटांची वीनती स्वकारू : ॥ १० ॥

## एवं श्री ऋद्धिपूरीचे विसेखु समाप्त

## परिशिष्ट ब

### ऋद्धिपुर चरित्रांतील उतारे

#### जन्मवृत्त

" ऋद्धिपुरप्रांतीं अवतारू स्वीकारू : ऋद्धिपुरा नांदिगावा माझारि दिढा गाउ-वांचेनि मानें : आधागाऊंवांचेनि मानें : माउरे : कांटसुरे : खेडें नांव गव्हाण : तेथ काणवा ब्राह्मणाचां घरीं : श्रीगोविंदप्रभु सर्वज्ञ : अवतारु स्वीकरिला : तेयाचें पवित्र कूळ : अनंत नायक पिता : नेमाइसें माता : तयाचां गर्भि अवतारू स्वीकरिला : सर्वज्ञांचेया मातेया पीतेयासि : बहुत लेंकरूवें जालीं : परि : तियें जितीचिना : मग आवघेया सेवटीं : सर्वज्ञ अवतरले : मग : माता पितेंनि : सर्वज्ञाते भणितिलें : बा दगडु गुंडा वाढे ऐसा वाढ : श्रीगोविंदप्रभु : गुंडोबा ऐसें नांव ठेविलें : मग सर्वज्ञा जन्मलेयां उपरि वरिषां दों मध्यें माता पीता काळधर्मा गेलीं : मग माउसीया आणि मामेनि : सर्वज्ञांत वाढविले : वरिषा सातां : आठां मूजि बधन केलें : मूजिबंधन केलें-या उपरि : सर्वज्ञाते ऋद्धिपुरा घेउनि आली : मूजिबंधन ऋद्धिपुरीं जालें : ॥१॥ ऋद्धिपुरीं अवस्थान : सींउबा : चडिकापुराकडे तयाचे घर होतें : तेथ अवस्थान जालें : ॥ २ ॥ वेदाध्यायेन : ऋद्धिपुरीं बोपदेवो उपाध्ये : तिको उपाध्ये : राम देवो उपाध्ये : एक : तयाचें नांव नेणिजे : तयापासि मामेनि आणि माउसीया पढों घातलें : उपाध्ये हो आमुचेया गुंडोकरवि तुम्हीं वेदाध्यायेन करवावें : मग सर्वज्ञ वेद पढों लागले : आचाट प्रज्ञा स्वीकरिली : सर्वज्ञा दीसें ये तें आणिकांसि मासें न ये : सर्वज्ञा मासें ये तें आणिकांसि वरिषें न ये : ॥

#### श्रीचक्रधर स्वामीची प्रथम भेटि

दोहीं देवां भेटी : ॥ : श्रीचां : ४१ : कामाख्या निमित्यें पुर त्येजिलें : मग भरवसे प्रधान पुत्राचें स्वीकरूनि कितिएक दीस राज्य केलें । मग एकवेळ : सर्वज्ञें भणितलें : रामयात्रेसि आवें : प्रधानें भणितलें : तो देसू पारिका तेथ जावों नये ऐसें मोडिलें : सर्वज्ञ व्रत घेतलें : राम देखिजैल तैं भर्वना माल्दनें व्याळी : सर्वज्ञ

तीक्ष्माताची आरोगणा करीति : श्रीमूर्ति कृश जाली : सर्वज्ञांचीया माता भणितलें प्रधानातें सौंदर श्रीमूर्ति कृश जाली : दुवाही राउत पाइक जाति तैसा पाठवावा : केतुलेनि एकें परिवारेंसीं दांडियेवरि आरोहण करूनि बीजें केलें : सारिसा उगाणा कोठी चाटे बडुवे तैसे निगाले : पेणें प्रति एक एकें निरोपेंसीं एक एकातें पाठवीति : मग दोघजण सारिसे होते : तयातें चुकौनि : सर्वज्ञ रुद्रपूरा बिजें केलें : श्रीगोविंदप्रभु रांधवण हाटीं क्रिडा करीत असति : स्याम श्रीमूर्ति : नाभि चुंबीत खाड : उत्तरीये वस्त्र : गगनाची वास पांत : आपणेया आपण बोलत : रांधावनाचां घरीं तीही पदा-थेंसीं खेळु करीत असति : ते क्रीडा आमचे सर्वज्ञ पांत असति : श्रीगुंडमप्रभु रांधनवर्णी सेंगुळें बुडुंडे आरोगिलें ते श्रीगुंडमप्रभु प्रसादु करूनि आरे घे घे घे म्हणे : ऐसें श्रीगुंडमप्रभु सर्वज्ञांकडे टाकिलें : सर्वज्ञ वरिचेया वरि झेलिलें : श्रीमुकुटावरी धरिलें : मग आरोगिलें : तेथ प्रभु सर्वज्ञा ज्ञानशक्ति दीधली ते सर्वज्ञ स्वीकरिली : ॥१४॥

## द्वितीय भेटि

दोहीं देवा भेटि : ॥ : आमचेया सर्वज्ञा : श्री गुंडम प्रभुः दोहीं पींपळ तळौलीया मधीं : भेटि जाली : प्रहर दोनि काटि तळी : आसन : जालें : श्रीगुंडमप्रभु ऋद्धिपुरासे येति : श्रीमूर्ति दिसे तंव आमचे सर्वज्ञ : अवलोकिति : चरणचारी उभे होते : मग दाभ विहीरीसि येति : तेथ अवस्थान जालें दीस वीस ॥ १२६ ॥

## उंचमढीं अवस्थान

अग्नि निमीत्यें उंचमढीं अवस्थान : सर्वज्ञ तिकोपाध्याचिए आवारीं होतें : ४ : गावीं अग्नि पातु जाला तो आवघा गांव जळाला : तिकोपाध्यांचेही घर जळालें : मग सर्वज्ञ चांग बोला ॥ २ ॥ श्रीगुंडमप्रभु उंचमढा भक्तांसहीत येती : तेथ अवस्थान जालें : १ : सि । : जगती आंतु तीनि मठ : राजमढु पूर्वामूख : त्रीपुरुषाचा मढु उत्तरामूख : उंच मढीचीये पटिसाळे उत्तरोली विभागी गाइपासी सर्वज्ञा अवस्थान जालें : ॥ १६७ ॥

## महाजन विज्ञप्ति

महाजनाभ्यर्थनी ऋद्धिपूरा प्रयाणवृत्ति : ॥ सर्वज्ञें ऋद्धिपूरीहूनि बीजें केलेया उपरि ऋद्धिपूरीं थोरू पीडा काळ हों लागला : घरोघरीं चोर पेखणें पडिति : माणुसें मरेति : ऐका ज्वरू : एका रूजा : खोकले लागले : माळुवा भुंकती :

ऐसी पीडा होंं लागली : ते महाजनीं वीठनायेका केशव नायेका पासि कटक देव-गीरीसि लीहुनि पाठवीलें : तें परिसौनि वीठलनायेकें केशव नायेकें ऋद्धिपुरिचे या महाजनासि लीहुनि पाठवीलें : गावि इतुके मठ मंडपें देउळें असतां : श्रीगोविंदाचा स्थानीं नवचंडिका मांडिली : हा तुम्हीं अन्यावो केला : आन श्रीगोविंदातें कैसें जावों दीधलें : तरि आतां तुम्हीं समस्तीं देउळा वाडेया जावें : आन आमुचें आपुलें होते मार्गी आडु पडावें : आन श्रीगोविंदातें तम्ही ऋद्धिपुरा घेउनि यावें : श्रीगोविंदातें माने तो मठ देउळु स्वतंत्रु करूनि देयावें : मग आवघे माहाजन देऊळ वाडेया सर्वज्ञातें विनवावेया आले : प्रतिमठीं सर्वज्ञांचें दर्शन जालें : भाणिजे : नृसींहाचा मंडपीं सर्वज्ञांचें दर्शन जालें : पानें पोफळें नारियेळें वस्त्रें सर्वज्ञा पुढें ओळगवीले : दोन्हीं श्रीचरणा लागले : सर्वज्ञापुढें बैसले : सर्वज्ञ महाजनातें देखौनि हरिखु स्वीकरिला : तयाचियें डोईवरी श्रीकरु ठेवीति : मानेवरि श्रीकरु ठेविती : खादांवरि श्रीकरु ठेविती : आन म्हणे मेला मागलासि : म्हणे जी भागु गेला : १ : सि । : सर्वज्ञ हास्य करीति : आ मेली म्हणे अमुका नाएकू आला : अमुका भट्ट आला : अमूका धूबा आला : ऐसीं तयाचीं नावें घेउनि बोलाविति : मग अवघे महाजन : सर्वज्ञा आड पडिले : आन विनवीलें : जी सर्वज्ञ आपुलीये नगरासि बीजें करावें जी : सर्वज्ञावीण आम्हीं पोरटीं जालों : सर्वज्ञावीण नगरीं पीडा काल होत असे : सर्वज्ञ गावों सांडिला : तेणें गावीं अरिष्टें उठिलीं जी : तरि सर्वज्ञ आपुलेया नगरा बीजें करावें जी : मागील आवघें आमचें उपसावें जी : सर्वज्ञ येति आन समैल : ऐसी वीनती केली : सर्वज्ञ तयाची वीनती आइकौनि हरिखु स्वीकरिला : मठा आंतुनि बाही येति मागुतें मठांत जाती : आन तेवीचि अनुकार करीति : आ मेली जावें म्हणे न वचावें : आ मेलि आतां जावेंचि म्हणे : ऐसी सर्वज्ञां बीजें करावेयाची वृत्ति जाली : मग म्हाइंभटीं महाजनातें भणितिलें : जरि आम्हांसि अड मढु मढुलीयें तिन्हीं विकतें याल : तरि श्रीगोविंदाचें तेथें येणें होईल : ऐसें महाजनातें भणितिलें : तंव महाजनीं भणितिलें : श्रीगोविंदा आन तुम्हां जो मढु मानैल : तो सख्यापरिखागें ऐसाचि घ्या : परि विकत कैसा देवों : ऐसें विचारा पां : तंव म्हाइंभटीं भणितिलें : विकत नेदा तरि गोविंदाचें येणें नव्हे : मग महाजनीं विचारूनि भणितिलें : देउनि : मग म्हाइंभटीं साठि आसू देउनि तीन्ही ठायें वीकत घेतलें : दामूतीं विद्यमान तांबेयाचें पत्र केलें : मग भटीं म्हाइंभटीं ऋद्धिपुरा जावेयाची आइती करूं आदरिली : तंव दामूतें सर्वज्ञा वीनवीलें : जी सर्वज्ञ पर्वंवरीं राहावें: मग बीजें करावें जी : ते वीनती सर्वज्ञ स्वीकरिली : मग भटीं

म्हाईभटीं महाजनातें भणितिलें : तुम्हीं जा : सर्वज्ञ येथ पर्व करीती : मग येति : मग महाजनें : सर्वज्ञातें दर्शन करूनि ऋद्धिपुरा निगाले : सर्वज्ञां जावेयाची वृत्ति भणौनि : तया मार्गेचि सर्वज्ञें धांव घेतली : ते पूर्णे पैलाडि चींचाखालि : सर्वज्ञातें देखौनि महाजन उभे राहिले : सर्वज्ञ तयापासि येति : तव मागिला कडौनि भट म्हाइंभट : दामूर्तीतें घेउनि सर्वज्ञां पासि आले : साष्टांगें नमस्करिलें : आन वीनवीलें : जी दामूर्ते सर्वज्ञातें पर्ववरी राहावीतो : तरि वीनती स्वीकरीजो जी : मग वीनती स्वीकरिली : तथा भटोबासीं सर्वज्ञातें चींचापासि टाकिलें : आड पडिले : जी मजवरी वाट करूनि जाइजो : आन सर्वज्ञ उभे राहीले : आ मेली हरिमा होयेः म्हणेः भ : आ मेली हरिमा हरिमा होये म्हणे : आ मेली उठीः उठी म्हणे : मग सर्वज्ञ राहिले मग उठिले : मग मठासि बीजें करिती : ॥ १७८ ॥

## ऋद्धपुरीं प्रयाण

ऋद्धपुरीं प्रयाणः ॥ मग येरी दीसीं सर्वज्ञां भणितिलें : भटीं म्हाइंभटीं ऋद्धिपुरा जावेयाची आइति केली : आइति करितां देखौनि सर्वज्ञ हरिखुस्वीकरिला : सपूजित दांडिये आरोहण केलें : ऋद्धिपुरा निगाले : दामूर्त आपुलेनि परिवारेंसी : सर्वज्ञातें बोळवीत निगाला : सर्वज्ञातें बोळवीत गांवींचे महाजन नीगाले : ते गांवा बाहीरि राहाविले : सर्वज्ञ येति ऋद्धिपुरामध्यें माधानेंत ते : भटीं म्हाइभटीं सर्वज्ञातें विनवीलें : जी दामूर्त दूरवरी बोळवीत आला : आतां यातें राहावीजो जी : मग दांडी उभी करूनि सर्वज्ञ दामूर्तीतें भणितिलें : आमेली तूं राहे राहे : म्हणे तंव भटीं म्हाइंभटीं भणितिलें : दामूर्त राउवा : सर्वज्ञ तुमतें राहावीलें आतां तुम्ही राहा : तंव दामूर्ते म्हणितिलें चाला : भटो मीं ऋद्धिपूरवरि येईन : परि भटी म्हाइंभटीं राहाविलेच्चि : मग तो घोडेयाखालि उतरला : सर्वज्ञांचेया श्रीचरणावरि माथा ठेविला : भटां म्हाइंभटां नमस्कार केला : आन मूरडला : देउळवाडेया गेला : मग सर्वज्ञ पुढारें येति : भ : मानकादिलीं : आसन :जालें : चरणक्षाळण केलें : चरणोदक भक्तीं घेतलें : सर्वज्ञ उदक प्राशन केलें : मग सर्वज्ञ पुढें येतिः सर्वज्ञातें आइकौनि ऋद्धिपुरीचा लोकु हरिखैला : आमचे श्रीगुंडम आले : घरोघरीं गुढिया उभिलीया : सडे समार्जनें केलीं : चौक रंगमाळिका भरिलिया : मग महाजनीं दोन्ही मठ झाडविले : सडा समार्जनें करविलीं : कळस घेउनि महाजन सर्वज्ञां साउमे आले : दोहीं श्रीचरणा लागले : मग कळसेंसी महाजन पुढां चालेति :

आन चांग बोला म्हणति : मागें भक्तें मध्यें सर्वज्ञांची दांडी : ऐसें महाद्वारासि येति : तेथ दांडी खालते उतरले : पुढारें चरणचारी येती : उंचमठीं मांचेयावरि आसन जालें : सि । : मठासिये नेत्रा पाहावि : सर्वज्ञां तिकडे वृत्ति नाहीं : मग सर्वज्ञां मागुतें वोवरांचि अवस्थान जालें : ॥ ॥ महाजनीं भक्तांसहीत आरोगण निफजवीला होता : मग सर्वज्ञां मर्दना मादनें केलें : पूजा केली : सि : वस्त्र पूजा केली : ॥ धूपार्ति मंगळार्ति केली : ताट केलें : सर्वज्ञ आरोगमा जाली : गोविंदा विडा मग पहुडु जाला : मग भट म्हाइंभट मुख्य समस्तां भक्तां प्रसादा सहीत जेवणें जालीं : ॥ १८१ ॥ इति पूर्वार्धे :

## जगळदरणायाची भक्ति.

मग मंचां राजमठा भीतरि अग्नि कोणीं घातला : दक्षिणे श्रीमुकुट्याचा कडु केला : उत्तरे श्रीचरणाचा कडु केला : मग तैं लागौनि राजमठीं नित्य वासें सर्वज्ञ अवस्थान स्वीकरिलें : ॥ १ ॥

जगळदरणेयाची सेवा स्वीकार : ॥ ॥ जगळदरणा तो स्वतंत्र माना ठाकुरीया : तो राजूर रोहीणखेडिचा बैसणाइतें : तेथ स्वतंत्र राज्य करी : गुंडमप्रभु सर्वज्ञ ऋद्धिपुरीं राज्य करीति : सर्वज्ञाचेया सामर्थ्याचीया गोष्टी लोकु जगळदरणेया पुढां सांघेति : ऋद्धिपूरी श्रीगुंडम : राउळ सर्वज्ञ असति : ते मेलीं प्रेतें उठवीताति : अप्तितें अनगतें सूचिकें सांघताति : घरोघरीं अनेगी परीचे खेळ खेळताति : श्री गोविंदातें लेंकरूवें देउळांतु कोंडीति तंव गुंडम हाटवटिये दीसताति : घरोघरी चीया फळतीया फुलतीया द्राक्षि कोहाळिया उपडीति : तिया मागुतीया तीसरां दीं लावीताती : त्या पानीं फुलीं फळीं तैसीयाचि लागताति : मेलीं वासुरूवें जीववीताति : मेलीं लेंकरूवें खांचे आंतूनि काढुनि जीववीलीं : अनेगी परीचीं सामर्थ्यें त्या गोष्टी आइकौनि जगळदरणेनि बुधि धारेली : सर्वज्ञां कारणें राज्यधर्म स्थीतिची राहाटि पुरोहीता हातीं पाठवीली : दांडीपडवा : १ : छत्र : २ : कनकदंड चंवर : ३ : लोहे : ४ : गंगाळ : ५ : तांभाण : ६ : दोन्ही तांब कळस : ७ : ८ : ताट : ९ : वाटें : १० : वाटीं : आरिसा : वांकि : १३ : सांखळें : १४ : कांबि १५ चरणगादी : १६ : पाटगादी : १७ कापूर सेंदळी : १८ : श्रीखंड : १९ : तथा पारिस : २० : अत्रादि : २१ : कस्तुरी : २२ : तथा फणी : २३ : नवामाचा : २४ : सूपवती : २५ : पडदा : २६ : पासवडा : २७ : पाटांउ कुटी :

२८ तथा आडणी : २९ : आर्ती : ३० : कांहीं द्रव्यें : ३१ : दोन्ही बुभतीखा-गाई : ३२ : इतुके सर्वज्ञा कारणें पाठवीले : ते सर्वज्ञें स्वीकरिले : आणीकही कांहीं कांहीं पाठवीतचि जाये : आन : प्रत्येही सर्वज्ञांचा ताट प्रसाद आन चरणोदक येईल ते व्हेळीं जेवीन ऐसा नियेमू केला : मग प्रतिदीनीं भट म्हाइंभट सर्वज्ञांचा ताट प्रसादु चरणोदक : अनुलेपन : श्रीकंठिची पूतमाळ : तथा आंगारा :॥ ऐसें जगळदरणेयांचीया धावनिका हातीं देति : ॥ बाईसी : जगळदरणेयां कारणें तळींच वळींव सूकलाडु : पुरिया : ऐसा प्रसादु जाये : मानु मानिये तया कारणें मांडा पोळी नीटसु ऐसा प्रसादु जाये : भक्तां तों चाविरेया थुंकिरेया : आवघा कर्दमू ऐसा असे तो होये : ॥

मग तो प्रसादु धावणेकार विळणि तया पासि घेउनि जाये : तेव्हळि जगळदरणेयासि श्रवण होये : आन कोण्ही जगळदरणेयावरि परचक्र मेळावा ये तेव्हळि जगळदरणा सर्वज्ञांचेया अनुलेपनाची उटि घे : गळां प्रसादाची माळ घाली : मग घोडेयावरि बैसोनि ऋद्धिपुराकडे हात जोडौनि दंडवत करी : मग पारकेयाप्रति नांव सारी : हा मी जगळदेवो श्रीगुंडम राउळांचा : हाति आला आला हो सर्वज्ञ अरणीवरि उठावणी दे : तंव ते अरणी मोडे : ते पुढां पळति : तों नांव सारीत पाठीं लागे : परि तयावरि कोण्हासि पूरे न व्हवे : पारिके तया सरिसे स्यापांचा राउतांची उठावणी उठिता देखति : मग तयावरि कोण्हीं न चलेति : ऐसी जगळदरणा सर्वज्ञांची सेवा करी : मग सेवटीं सेवटीं ब्राह्मणीं तया पूढां व्यावृति केली : भणितलें : महादेवो पाठकें : । : राजेहो तुम्हीं जें पाठवितां तें राउळाचेया उपयोगा जात नाहीं तें नागदेवो भटांचेया उपयोगा जातें : ऐसी व्यावृत्ति केली : मग जगळदरणेनि हात आखुडिला : मग भटोबासीं तथा प्रसादु वर्जिला : मग त्यावरि परीचक्र चालिलें : तेव्हळिं तयाचें मागिला सारिखें सौर्येपण न दीसे : तो परचक्रें भंगिला मणिजे जूंझीं पडिला : ॥ ९ ॥

## श्रीकृष्णरुक्मिणी विवाह

बीवाह स्वीकारू : ॥ : काकोकरि चांग बोला म्हणवणें : तथा श्रीकृष्णरुक्मिणी धवळीं गावणें : एक वेळ चैत्र वैसाख मासा : भटोबासाचें पुत्र महेश्वर पंडीत : वैराग्य देव केशवनायेकाचा : परमेश्वर नायेकाचा एकोचा पूल देवो : सूखनायेकाचा रामनाथु : याच्या एकेंचि लग्नें मूजी नीगालीया : केशव नायेक:

परमेश्वरनायेक मुख्य समस्त : भटो म्हाइंभटापासि आले : मग तेंही भणितिलें : सर्वज्ञांचीये दृष्टी पुढें मूजि बांधों : श्रीगोविंदप्रभु आवघां आपुलालीया आइती केलीया : राजमठांचा रायागणीं मांडो बहुलें घातलें : तेथ तयाची मूजी : सर्वज्ञाचीये जानुवरि बाधलीया : ७ :

सर्वज्ञातें भणितिलें : भिक्षे गेलीं होतीं : गावांतु घरोघरीं लमें लागलीं होतीं : त्या कारणें बेगड भरी बासींगें माळीणि नेति होती तीये नांव तेल मेहरि : तियेसी बाइसीं भणितिलें : आवो आमचेया सर्वज्ञाचां श्रीमुकुटीं बांधावेया एक बासींग दे : तीया घ्या : दीधलें : तें वोटीये घालुनि : बाइसीं आणिलें : सर्वज्ञातें वीनवीलें : दृष्टी पुढां धरुनि राहिलीं : स्वीकरि जोजी भणितिलें : तें देखौनि : सर्वज्ञें भणितिलें : मेली बांधबांध भणितिलें : मग सर्वज्ञाचा श्रीमुकुटीं बाइसीं बांधलें : आन श्रीचरणा लागली : मग सर्वज्ञ मुकुट हालवीति : तंव बासींगाचीं तोंगलें झळफळितें श्रीनेत्रांवरि येति : तें कवतीक भक्त पाहाति : यावरि सर्वज्ञ बाइसातें भणितिलें आमेली : महादीफेंदी कांकण डाउ बांधावा भणितिलें : हळदी उटावें भणितिलें : म्हणे तुरें वाजवावीं : म्हणे तुपें पऱ्हीवे वाहावावें : म्हणे : बहुलें घालावें : म्हणे : मादळु वाजवावा : म्हणे मांडो घालावा : म्हणे ऐसे सर्वज्ञ अनुवादु केले :। : सर्वज्ञांचेया दर्शना गावींचीं पोहरें येति : येका समार्थाची वरात आली : त्यांचीं बासींगें देखौनि वृत्ति जाली : मग अनुकार केले : सर्वज्ञ मणति विवाहो करावा : म्हणे ऐसा ऐसा मांडो घालावा : भणे येथ बहुलें करावें : भणें चौक न्हाणें न्हावें : वारूलां न्हावें : भणे कांकण बांधावे : भणे बासींग बांधावें : भणे लुगडीं घेयावी : भणे आइती करावी : भणे चौ दीसीं चौ गांविचा लोकु जेवावा : म्हणे तांदुळीं तुपीं पऱ्हीवे वाहावें : म्हणे : तंव म्हाइंभटीं भणितिलें : भटो आतां काइ करावें : वेचूसी करीन : परी नोवरी कैंची : कोण देइल : ऐसा विचारु करिताती तंव : परमेश्वर नायेक आले : तेहीं भणितिलें : भटो म्हाइंभटो सर्वज्ञां : विवाहो स्वीकारावेयाची : वृत्ति जरि असैल : तरि मी आपुली कन्या देइन : चाला : सर्वज्ञातें वीनवा : मग ते आले सर्वज्ञातें वीनवीलें : सर्वज्ञां विवाहाची वृत्ति जाली : तरि मातें कन्यारत्न असे ते : सर्वज्ञ स्वीकरी जो जी : तंव : सर्वज्ञें भणितलें : आमेली होये ऐसा नव्हे : म्हणे : या परी निराकरिलें : मग म्हाइंभटें आवधी वऱ्हाडाची आइती केली :

सेजा आंबीचीं तुपें वीकते घेउनि घागरी भरिलिया : आन सर्वज्ञांचें वऱ्हाड होतें गावांतु घरोघरीं गहुं देउनी कणकी करवीलीया घरोघरीं साळी घालुनी तांदुळ करविले : मग आउसी सेवया सखळीं : सांडया : कुरवडीया : पापड : ऐसें केलें : म्हाइंभटीं डोंगरींहुनी मांडवाचें दळवाडें आणीलें : रायांगणी मांडो घातला : मांडवाचे पूर्व विभागीं चित्रीवा कांबीचे कंड लाविले : रायांगणी उतर विभागा बहुलें घातले : साता कळसांचा आवीघू आणिला : म्हणजे : नवा कळसांचा : । : नगरीं हाकारा करूनि फळ तांबुळ दीधलें : तेलवाण जालें : । : तवं आउसीं मढीं रांधा रांधी केली : कडे मांडे मुख्य अनेकी परीची तळिवें वळिवें पक्वान्नें : निफजवीलीं : सर्वज्ञातें हळदी उटिलें : पंचकळसी मादनें केलें : पीवळीये पाजनीची श्रीवडि : ओळगविली : अळंकारू ओळगविलें : वांकि : सांखळें अनंत : हस्त कडगें : बासींज : श्रीकरीं कांकण : श्रीमुकुटावरी पुष्पांची जाळी : माळिणी पुष्पांचें बासींग आणिलें तेहीं : बाइसी बांधिल सर्वज्ञ ऐसा ऐसा मुकुटु हालवीति : आन बासींगाचे झळंबुके दोहींकडे लागती : सर्वज्ञ हास्य करीति : ऐसी नोवरकळा स्वीकारिली : मग बहुलियावरी पाट पासवडीला तेथ : सर्वज्ञ आसनीं उपविष्ट जाले : आउसीं तार्टी पांचे मंगळ द्रव्ये घालुनि : दीपु उजळुनि : सर्वज्ञा आक्षेवाणें केलें : मग गावांतुला महाजनाचिया घरिचीया सोवासनी आलिया : तेही सेस भरूनि ओवाळिलें : म्हाइंभटी केशवनायक : विठल नायक : परमेश्वर नायक : रूपनायक : मुख्य आवघे लोक पाचारिले : ते सर्वज्ञातें पाहात मांडवांतु बैसले : सर्वज्ञ तयातें अवलोकीति : मग म्हाइंभटीं आवघेयासि गंधाक्षत केलें : : विडे दीधले : बाहीरि मांडवाचां द्वारीं : मंगळ तुरें : वाद्यंतरें वाजति : मग ऐसा अवसरीं लोकु धवळ गाति : रूपदेवोबा चांग बोला : म्हणे : ४ : ते जवळी नसताचि तेव्हळि : सर्वज्ञ काकोसातें भणितिलें : आमेली चांग बोला म्हणेना : चांग बोला म्हण : मग तेही चांगबोला म्हणितीला : आन सर्वज्ञ बाइसातें भणितिलें : आमेली गायेना म्हणे : गाये गाये म्हणे : भा : ४ : वाळिचांचा अवसरी भणितिलें : आमेली : गाये म्हणे : गायेना म्हणे : बाइसीं भणितिलें काये गायें जी : आवो कांहीं गा : तरी धवळ गावां जी : ३९ : नागदेवो भागवताचे पाच धवळ गाइले : सर्वज्ञें भणितलें : आमेली हें ना म्हणे : आणिक कांहीं गायेना म्हणे : तरि काये गायेजी : आमेली : " कृष्णरुक्मीणी गजरथतुरें " या थाट ऐसें गाये म्हणे : कैसें गायें जी : उं : चक्रधराचे सीरीं धरूनिया चरण ऐसें गाये :

म्हणे : ऐसा वरू दीधला : मग बाइसा स्फूर्ती जाली : बाइसीं : श्रीचक्रधराचे सीरीं धरूनीया चरणु : या पहिलेया कडवेया पासौनि लागला : निरूता जीवीं हें कडवें पर्यंत भणितिलें : तें आइकोनि सर्वज्ञ भणितिले : होये होये मेली निरूता जीवीं लागला : म्हणे : १ : तंव इतुका अवसरीं आउसी सर्वज्ञातें आरोगणेलागि विनवीलें : भणिजे व्याळिये लागि : जी आरोगण करावेया बीजें कीजोजी : तंव म्हणणे: आमेली : जेविला म्हणे : भ : आमेली हे जेविलें जेविलें : १ : आउसीं भणितिलें : कन्हणें ठाइं जेविलेतिजी : आमेली रुक्मिणीदेवीचां राउळीं जेविलें : म्हणिजे रुक्मिणीचेनि हातें : ७ : बाइसीं भणितिलें जी तें द्वापरीं कीं : आन हें कलियुग : तें जेविलेया बहुत दिस जाले : कीं जी : या शब्दावरि सर्वज्ञ गदुगदा करि हास्यें केलें : मग बहुलेया वरूनि उठीलें : मठांतु येति : आउसीं सकल पदार्थांचें ताट वोगरूनि मुखवस्त्र घालुनि ठेविलें होतें तेथ आसन जालें : आउसीं मुख वस्त्र काढिलें : सर्वज्ञ ताटा अवलोकुनि भणितिलें : आमेली भाकरी नाहीं म्हणे : मग आउसी भणितिलें : तथा बाइसीं : । : जी वन्हाडी भाकरी केंची जी : तेथ गारिया पूरिया : उंबेरे : वडे : मांडे : ऐसें कीं : आन सर्वज्ञ हास्य केलें : म्हणे आमेली भाकर नाहीं म्हणे : मग भोकरे झारिची ओळगविली : आरोगना केली : मग येरा ब्राह्मणा : महाजना मांडवा भीतरि : म्हाइंभटी पांती केलिया । तुपाचिय घागरिया उलथिलिया : साचो कारीया सारणी तुपें वाहिलीया : लोकु जेवीले : विडे दीधले : आपुलालेया घरा गेले : यापरी च्यान्हीदी साचोकारें वन्हाड केलें : च्यान्हीदी रुक्मिणी सैवराची माळ बहुलां आइकीती : तंव च्यान्ही दीस म्हाइंभटीं बेंचू सारिखाचि केला : मग सर्वज्ञांची वृत्ति भंगली . बासींग डाउ कांकण परितेजिलें : सग मर्दना मादनें जाले : तियें वस्त्रें परितेजिलीं : आणिके जेविलीं : परमेश्वरें नायेकें : सर्वज्ञा कन्यादेवों केली होती ते तैसीचि होती : ॥ ५१ ॥

## अवतार समाप्ति·

वृत्तिवसे पुरुष त्यागु : ॥ : ४ : सर्वज्ञ उदरवेथेचा नटू स्वीकरिला : सर्वज्ञांची वृत्ती भटमुख्य समस्त भक्तां कळली : मग आवघेयां थोर दुःख जालें : भटांसि अवस्था प्रकटली : यावरि सर्वज्ञ आस्वासीलें : भटातें भणीतिलें : आमेली : आतां दत्तात्रेयप्रभूचीया ठाया जाये : त्या निरोविलासि : मग भाटोबासीं भणितिलें : आतां काइ जाइन जी : असे किती वियोग देखत असेन : तंव सर्वज्ञाचीये श्रीमूर्ति

पासौनि प्रकाश पडिला तेथें आवघा मढु भरला : समस्ता भक्ताचे डोळे प्रकाशा भरले : मग भक्ता वाटलें जें : सर्वज्ञ पुर स्येजिलें : मग भटीं म्हाईंभटीं पाहाव एकु माचां पाहिले : तंव सर्वज्ञातें न देखतीचि : मग दुःख केलें : मग मूर्ति दर्शन जाले : मग आरोगण स्थाना : मर्दन स्थानामाजि मादनें करूनि आसनीं बैसवीलें : बहुतीं फुलीं मंगळ द्रवीं माहापुजा केली : धूप वोळगवीला : आर्ती केली : दंडवतें घातलीं : मग चाणाख्येपासि निक्षेपु केला : ॥ . शके १२०७ व्ये संवत्सरे भाद्रपद शुा अष्टमी जेष्टा नक्षेत्र अवसी पाहारा आंतु : सर्वज्ञ येति . मग धातुर्वादिक अभिचारिकां सिद्धसाधका बतीसलक्षणा पुरुषाचीया संदी काढितात : भटोबासें कैवाडु केला : परता एक भितीतळीं निक्षेपू केला : आसनें लिंग मांडिलें : तेंही तेथ खणीतलें ते चुकलें : मग समस्त जनासि आश्चर्य जालें : ॥ १९२ ॥

मग भट सर्वज्ञें बीजे केलेया उपरि आउसें वांचौनिया आवघेया भक्तासहीत गंगातीरासि आले : निंबां राहिलें : मग भटांपासोनि कोणी **वराडासि** जाये : तयातें भटोबास भणति : तुम्ही वराडा सावळापुरीं श्रीप्रभुसर्वज्ञांची लेंकी असे : तीयेतें आधी पडताळावें : मग ऋद्धिपुरा जावे : आन ऋद्धिपुरीं आधीं आउसातें भेटावें : पाठीं मढु नमस्करावा : मग जंव्हे भिक्षुक जाति : तीये भटोबासी भणितिलें तैसेचि करीति : ॥ १९३ ॥

म्हाइंभट द्रव्येवीण योगु : म्हाइंभटीं दोही पुरुषार्थाचे द्रव्य आणिलें : एकें तीनसे साठि : एकें सातसें : आणि पोमाइसांचिया साठि प्रतिवर्षी येति : आणि भटी म्हाइंभटातें आपजवीति : आन बतीसमें घरींहुनि आणिलीया : ऐसीया बेतालीस सें साठि आसू : आणि जगळदरणा पाठवी : आण आणिक म्हाइंभट नाणवटें आर्जिलिते : आन सर्वज्ञांचिये सेवे लागि कोण्हीं कोण्हीं पाठवीति ते : अथवा घेउनि येति : दर्शन करीतिः इतुकें द्रव्य सर्वज्ञांचेया वीण योगा गेलें : ॥१९४॥



# कठीण शब्दांचा कोश

(टीपेंत अर्थ दिला आहे असे शब्द येथे दिले नाहीत)

अक्ष = आमिष
आइती = सिद्धता, तयारी
आंडोर = मूल
आरव = वृक्ष
आसु = तत्कालीन सोन्याचे नाणे
उसंगीं = उत्सगीं, मांडीवर
कीडडी = तिरडी
खाते = देउळीं
जगती = आवार
जोजार = जंजाळ
झाउवी = झळ
डाही = कोकणामध्ये तरवे भाजतात ती
डो = तेल्याचें तेल काढण्याचें पात्र
तुरे = वाद्यविशेष
दांडी = पालखी
दारसंका = दरवाजाचे बाहु
दुटी = वस्त्र
दूस = राहुटी, पाल
देशाऊर = बंदर, स्थळ
नाखिवे = कोरीवे
नोकु = धिक्कार करूं
पसीम = पश्चीम
पन्हीवा = पनाळ, मोरी
पात्रनाच = कळसूत्री बाहुल्यांचा नाच
फूंजत = स्फुदत
भानवस = स्वयंपाकगृह
भोजन्नता = भोजनस्थान
भोरी = उटी
मर्दना मादेन = मर्दनयुक्त स्नान
माणिकुळी पिळिली = लाल झाली
माता = अंथरूण, बिऱ्हाड
रायांगण = देवळासमोरील अंगण
वाइले = वेगळे, दूर
वालभैले = प्रीती, आवडी करूनि
वास = वाट
विसेख = विशेष
वोगरीजणें = वाढणे
वोणा = ओढा, लोट
व्याळी = जेवण
समसान = स्मशान
सल्ल = शल्य
साउमे = पुढें, समोर
साजात्य = सजातीय
सुंतसे = भावीतसे, पहातसे
सेन = शेण
सैंग = अंगण
हात, पांड, बिघे व नेतन = जमीन मोजण्याचीं तत्कालीन मापें

# शुद्धिपत्र

| | पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| प्रस्तावना | ३ | २२ | नाशीक | कनाशी |
| ,, | १६ | ,, | नदरेस | नजरेस |
| ,, | २७ | १७ | भासणार | भासली |
| ,, | ३३ | १९ | शंकु | रांकु |
| ,, | ३४ | १५ | स्थूलवर्णनात्मक | स्थलवर्णनात्मक |
| ,, | ३८ | १० | द्वी | — |
| ,, | ,, | १७ | आपाणस | आपणास |
| ,, | ,, | २५ | चालावलो | लाचावलो |
| ,, | ४१ | २७ | [foot-note] | — |
| मूळ | २० | ८ | वित्त | वीत |
| ,, | ५० | २२ | चाहटळ | वोहटळ |
| ,, | ६२ | १५ | जगा | जळा |
| ,, | ६९ | १७ | उपमेररीत | उपमेरहीत |
| ,, | ७१ | २ | परापकारी | परोपकारी |
| ,, | ७३ | २२ | विंविधा | विविधा |
| ,, | ८० | २४ | चाकोणी | चौकोनी |
| ,, | ८४ | ६ | रुपवेधाचे | रुप वेधाचे |
| ,, | ,, | २३ | पोळी | चोळी |
| ,, | ८५ | ८ | ठाउ ए | ठाउए |
| ,, | ,, | २३ | कर्पास | कार्पास |
| ,, | ९१ | १८ | चाविजैल | पाविजैल |
| ,, | ९२ | ४ | आळिं बनी | आळिंबनी |
| ,, | ९३ | ९ | साखळे नसी | साखळेनसी |
| ,, | ९७ | ८ | असा | असो |
| ,, | १०० | २२ | रात्रमठी | राजमठी |
| ,, | १०४ | २१ | अखडानंद | अखंडानंद |

| | पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ,, | १०५ | १६ | अनुमानं उपमान | अनुमान ४ उपमान |
| परिशिष्ट अ | १०७ | ६ | अज्ञ | आग्नेय |
| ,, | ,, | १२ | वासन | आसन |
| ,, | १११ | १३ | नाएक | न्याय |
| ,, | १२४ | १ | गाटी | गारी |
| ,, | १२८ | २६ | दागोचे | दामोचे |
| ,, | १२९ | १ | तेलिणी चाडो | तेलिणीचा डो |
| परिशिष्ट ब | १३६ | ५ | पूतमाळ | पुष्पमाळ |
| ,, | ,, | ११ | सखळी | सरवळी |
| ,, | ,, | ११ | बासर्गि | बासीग |

## विद्वद्भूषण श्री. नरसिंह चिंतामण केळकर बी. ए. एल्एल्. बी., संपादक केसरी, अध्यक्ष महाराष्ट्र साहित्य सम्मेलन बडोदा, यांचा अभिप्राय.

आपण मानभावी वाङ्मय संशोधून प्रसिद्ध करण्याचा व्यक्तिशः जो उपक्रम पूर्वी केला त्याला आतां संस्थेचें स्वरूप आलें हें पाहून फार आनंद वाटतो. महानुभाव ग्रंथमालेतील इतर ग्रंथही हळुहळू बाहेर पडतील अशी आशा आहे. महानुभावी वाङ्मय हें महाराष्ट्र भाषेंतील एक स्वतंत्र व समृद्ध असें दालन आजवर बरेंचसें गुप्त होतें तें अलीकडे खुलें होऊन, त्यांतील मौल्यवान वस्तु लोकनिदर्शनास येऊं लागल्या आहेत. महानुभाव सांप्रदायाच्या किंवा त्या पूर्वीच्याहि काळचें मराठी वाङ्मय अगदींच अनुपलब्ध होतें असे नाहीं. पण तें फार थोडें होतें. ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांखेरीज इतके जुने पण इतके मौल्यवान ग्रंथ दुसरे कोणते प्रसिद्ध असल्यास मला तरी माहीत नाहीं. पण महानुभावपंथाच्या वाङ्मयानें ही उणीव बरीच भरून निघणारी आहे. हे दोन्ही सांप्रदाय आपल्यापरीनें वेगळे असले तरी वाङ्मयाच्या दृष्टीने ते एकच आहेत. निदान आजच्या व भावी पिढीला तें वाङ्मय सारखेच आदरणीय आहे. मराठी भाषेचा प्रवेश विद्यापीठांत होऊं लाग-ल्याकारणानें, या जुन्या वाङ्मयाचा विशेष आस्थेनें अभ्यास होईल व तसें झाल्यास मराठी शब्दसंपत्तीत भर पडून, भाषेच्या इतिहासाच्या साखळींतील नवे दुवे जोडून बसवितां येतील.

आपण पाठविलेले 'ऋद्धिपुरवर्णन' काव्य पाहिलें. काव्य अगदीं उत्तमापैकीं आहे. विशेषतः टीप ग्रंथाचें कौतुक वाटलें. इतक्या जुन्या ग्रंथावर इतका जुना टीपग्रंथ इतर वाङ्मयांत माझे पाहण्यांत नाही. गुरुशिष्य-परंपरेमुळें ज्ञानेश्वरी-पासूनच्या जुन्या ग्रंथांची अवघड भाषा समजण्यास प्रवचन हें एक साधन उपलब्ध होत राहिलेंच आहे. परंतु तोंडच्या प्रवचनापेक्षां अशा टीपग्रंथांत निश्चितार्थाचें साधन अधिक यांत शंका नाहीं. मूळ ग्रंथ १३ व्या शतकांतलि खरा. परंतु टीप-ग्रंथ निदान १६ व्या १७ व्या शतकांतला असल्यामुळें मूळ ग्रंथांतील शब्दांचे सामान्य किंवा सांप्रदायिक अर्थ काय होते हें १९ व्या किंवा २० व्या शतकांतील प्रवचनकारापेक्षां या टीपग्रंथावरूनच अधिक निश्चित व विश्वसनीय रीतीनें कळतील हें कोणीही कबूल करील.

बऱ्हाड व गोदावरीतटाक हाच मूळ किंवा प्राचीन महाराष्ट्र. तेव्हां या भागां-तच प्राचीन मराठी वाङ्मय अधिक सांपडणार हें उघड आहे. व तें शोधून काढून प्रसिद्ध करण्याचें भाग्य तुमच्या संस्थेला लाभणार म्हणून अभिनंदन करणें अवश्य आहे. कोणत्याही भाषेचें तत्कालीन स्वरूप हेंच सर्वांत परिणत स्वरूप खरें. पण तेंच सर्वांत अधिक शुद्ध स्वरूप असें ठरत नाहीं. मुखाकडे नदी अधिक विस्तृत व कार्यक्षम होत जाते हें खरें. परंतु तिच्या उदकाचें शुद्ध स्वरूप पाहावयाचें असेल तर उगमाकडेच अधिकाधिक जावें लागतें. महाराष्ट्र भाषेचीहि तशीच गोष्ट आहे.

आपण या ग्रंथाला जी विस्तृत प्रस्तावना लिहिली तिच्या योगाने या ग्रंथाच्या समजुतीला तर विशेष साहाय्य होणारच आहे. पण महानुभाव सांप्रदायावरहि विशेष प्रकाश पडणार आहे. पूर्वी हे ग्रंथ प्रसिद्ध झाले तेव्हां या सांप्रदायाविषयीं अवमानबुद्धि उत्पन्न होण्यासारख्या कांहीं गोष्टी घडल्या, किंवा कांहीं लिहिलें गेलें. परंतु भाषेच्या अभ्यासकांनीं धर्मसांप्रदायाच्या गुणावगुणाकडे पाहण्याचें कारण नसतें. किंवा श्रेष्ठ कनिष्ट वादांत खोल शिरण्याचेंहि कारण नसतें. कृष्ण वस्त्र परिधान करणारें हे धर्मदृष्ट्या काषाय वस्त्र परिधान करणाऱ्या संन्याशा-इतकेंच आदरणीय होत. गौरव सांप्रदायीक तत्त्वाचें असतें. सांप्रदायिक गुणाला बाध आणणाऱ्या व्यक्ती किंवा आचार कोणत्याही सांप्रदायांत आढळणारच. कळावें.

## साहित्याचार्य श्री. कृ. कोल्हटकर, अध्यक्ष महाराष्ट्र साहित्य सम्मेलन पुणें, यांचा अभिप्राय.

आपण एक नवीन माला सुरू केली असून तिचें पहिलें पुष्प तयारही झालें आहे. हें पाहून संतोष होतो. आपली माला यशस्वी होवो अशी माझी अंतःकरण-पूर्वक इच्छा आहे आणि मालेचे संपादक आपणासारखे विद्वान व उत्साही साहित्य-सेवक असल्यामुळें ती इच्छा फलद्रूप होण्याची खात्री वाटते. मालेस सुदैवानें आपणासारख्यांच्या नांवाचा पाठिंबा असल्यामुळें तिच्या उत्कर्षास माझ्या-सारख्याच्या अभिप्रायाची जरूरी नाहीं. कळावें लि.

## विद्वद्वर्य माधव श्रीहरी अणे बी. ए., बी. एल्., एम्. एल्. ए., अध्यक्ष महाराष्ट्र साहित्य सम्मेलन ग्वालेर, यांचा अभिप्राय.

कोणत्याही राष्ट्राचा इतिहास पूर्णपणें अवगत व्हावयास त्या राष्ट्रांतील वाङ्मयाच्या साद्यंत इतिहासाचें यथार्थतया ज्ञान होणें आवश्यक आहे. महाराष्ट्रांत इतिहाससंशोधनाच्या कार्याकडे बऱ्याच विद्वानांचें लक्ष लागत चाललें आहे असें दिसत आहे. परंतु ज्ञानेश्वरसमकालीन व तत्पूर्वकालीन गद्यपद्यात्मक वाङ्मय आजपर्यंत महाराष्ट्रीय वाचकांस उपलब्ध झाले नव्हतें.

यवतमाळ येथील शारदाश्रमाचे विद्वान व इतिहासभक्त संस्थापक रा. यशवंतरावजी देशपांडे यांनीं पराकाष्ठेचे परिश्रम घेऊन नाथसंप्रदायी व महानुभावीय प्राचीन ग्रंथांचें अमूल्य भांडार हस्तगत करून घेतलें आहे व आश्रमांतील कांहीं वाङ्मयप्रेमी सभासद त्या ग्रंथाचा यथाशास्त्र अभ्यास करीत असतात. आज ऋद्धिपुर वर्णन हा ग्रंथ मराठी प्राचीन वाङ्मयाचा पहिला खंड म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे. ह्यावरून या आश्रमांतून चाललेल्या उद्योगाची थोडीशी तरी कल्पना वाचकांस करतां येण्यासारखी आहे. जेव्हां हे सर्व खंड आश्रमांतील विद्वान संपादकांच्या विस्तृत व विवेचक प्रस्तावनांसह प्रसिद्ध होतील तेव्हां मराठी भाषेच्या व महाराष्ट्राच्या सर्वांगीण इतिहासाच्या आजतागायत अप्रसिद्ध व अज्ञात असलेल्या भागावर अनेक रीतींनें प्रकाश पाडण्यास त्याचा फार मोठा उपयोग होईल अशी माझी खात्री आहे.

## प्राचीन मराठी वाङ्मयाचे तज्ज्ञ श्री. वा. अ. भिडे बी. ए. यांचा अभिप्राय.

यवतमाळच्या श्री शारदाश्रम संस्थेनें प्राचीन मराठी वाङ्मय प्रसिद्ध करण्याचा संकल्प केला आहे. व या वाङ्मयांत प्रथमतः महानुभाव पंथाचे इ० स० चे तेराव्या व चौदाव्या शतकांत रचलेले सात आद्य ग्रंथ समाविष्ट होणार आहेत. या नियोजित ग्रंथमालेपैकीं पहिलें पुष्प कवीश्वराम्नायदीक्षित पंडित नारायण व्यास यांनीं रचलेला ऋद्धिपुरवर्णन हा ओंवीबद्ध काव्यप्रबंध होय.

या प्राचीन ग्रंथमालेचें संपादकत्व श्रीशारदाश्रमानें ' महानुभावी वाङ्मयाचे कर्ते रा० य० खु० देशपांडे या विद्वान, उत्साही व अधिकारी भाषाभक्ताकडे सोंपविलें आहे, ही गोष्ट अत्यंत अभिनंदनीय आहे.

रा. देशपांडे यांनीं संपादलेली श्री ऋद्धिपुरवर्णनाची छापील प्रत, प्रस्तावना, टीपग्रंथ, परिशिष्टे, इत्यादिकांसह मी समग्र चाळून पाहिली व ती समग्रशः नांवाजण्यासारखी उतरली आहे, असे म्हणण्यास मला मुळीच सकोच वाटत नाहीं.

रा० देशपांडे यांची प्रस्तावना चागली सग्राहक व उद्बोधक वठली आहे. ग्रंथाच्या अभ्यासकाला व भाषेच्या इतिहासाला ज्या ज्या अंगांची आवश्यकता भासते, त्यांसंबधी सर्व मुख्यमुख्य प्रश्नांचा उलगडा या प्रस्तावतेत संपादकांनीं अगदीं थोडक्यांत पण मार्मिकतेनें व संशोधकबुद्धीनें केला आहे.

वरील काव्यप्रबंधाबरोबर छापलेला टीपग्रथ सोळाव्या सतराव्या शतकांतील आहे असें समजते, म्हणजे मूळ ग्रथानतर तीन चार शतकांनी टीपग्रंथ लिहिण्यांत आला आहे. यामुळे त्यातील टीपा सर्व डोळे मिटून बरोबर धरून चालण्याचें कारण नाहीं. उदाहरणार्थ 'राडवालिए ३१', 'वज्रलेप ५१', 'बोहरी ५५' 'अवधातुते १०७,' 'जुंपे १२४,' जीणसी ८०,' 'हंसाळिचे ठसे ४९५,' 'तेलउतीकेउलचोळी ५४०,' इत्यादि कित्येक स्थळीं टीपग्रथांतील टीपा सदोष आहेत अशी शंका येते. परंतु बऱ्याच जुनाट शब्दांचे अर्थ, महात्मसंप्रदायाचे रहस्य परंपरा, आणि सतराव्या शतकांतील किंवा तत्पूर्वील लोकाचार व समजुती या बाबतींत या टीपग्रंथाचें उत्तम साहाय्य होण्यासारखें आहे. लिखाणांतील अपपाठ दुरुस्त करण्यालाही हा टीप ग्रंथ उपयोगी आहे.

परिशिष्टाच्या व मूलग्रंथाच्या परिशीलनानें महानुभाव पथाचें खरेंखरें स्वरूप वाचकापुढें तपशीलवार रेखाटलें जाऊन तत्कालीन समाजस्थितीवर चांगलाच प्रकाश पडतो.

आजपर्यंत महाराष्ट्राला परिचित असलेले जुन्यांत जुने मराठी ग्रंथ तेराव्या शतकांतीलच आहेत. हे ग्रंथ म्हणजे ज्ञानदेवी आणि ज्ञानदेवनामदेवादिकांचे अभंग. परंतु भाषेच्या इतिहासाला हें वाङ्मय अगदींच अपुरें असून त्याच्यांत भाषेच्या अर्वाचीकरणाच्या दोषानें अपरंपार बंड माजविल्यामुळें तें भाषा-

शास्त्राच्या दृष्टीनें फारच हीणमोल आहे मराठी भाषेच्या इतिहासांतील ही साधनांची उणीव निदान तेराव्या-चौदाव्या शतकांपुरती तरी या महानुभावीय ग्रंथांनीं दूर होणार आहे. ही ग्रंथसंपत्ति विपुल आहे, इतकेच नव्हे, तर ती बऱ्याच अंशीं अविकृत आढळते, ही बाब विशेष महत्त्वाची आहे.

महानुभावीय ग्रथांचा मोठा सांठा वऱ्हाडांत आहे. हे ग्रथही प्रथमतः तिकडेच रचले गेले. महानुभाव पंथाचा उदयही तिकडेच झाला. महानुभावांचा मराठी भाषेविषयीचा अभिमानही मोठा महनीय आढळतो. ज्ञानदेव, एकनाथ, मुक्तेश्वर वगैरे सोळाव्या शतकापूर्वी होऊन गेलेल्या प्रसिद्ध महाराष्ट्र कवीचा व्यापही बहुतांशी त्याच बाजूला झालेला आढळतो. या कवींचे प्रसिद्ध ग्रथ या महानुभावी ग्रथांशीं ताडून पाहिले, तर ते विशिष्ट संप्रदायाचे म्हणून लिहिलेले नाहींत, इतकेच, बाकी कल्पना, स्फूर्ति व काव्यरीति या बाबतींत ते ग्रथ महानुभाव पथाच्याच वाङ्मयखाणींतील व परपरेतील आहेत, ही गोष्ट प्रत्ययास आल्यावाचून रहात नाही. हें ऐतिहासिक सत्य लक्षांत घेतलें, म्हणजे आज जरी वऱ्हाड महाराष्ट्रापासून निराळा मानण्यांत येतो, तरी महाराष्ट्राचें मूळ वऱ्हाडांतच आहे, आणि मराठी भाषेचे जनन व संगोपन पूर्वकाली वऱ्हाडांतच झालें, हे मान्य केल्यावाचून गत्यन्तर रहात नाहीं; आणि शारदाश्रमाच्या प्रस्तुतच्या वाङ्मयसेवेनें मराठीच्या प्राचीन इतिहासाचें केन्द्रही वऱ्हाडच ठरणार, यांत संदेह नको.

आजपर्यंत उपलब्ध असलेल्या मराठी वाङ्मयांत न आढळणारा एक विशेष प्रकार महानुभावी ग्रथसग्रहांत आढळून येतो; तो हा कीं, त्यांत केवळ वाङ्मय दृष्टीनें लिहिलेले ग्रथही पुष्कळ आहेत. म्हणजे भाषेतिहास, भाषाशास्त्र, शब्दसिद्धि-छंदःशास्त्र, कोश, व्याकरण, अर्थनिर्णायक टिप्पणी इत्यादि विषयांवरही पुष्कळ रचना करण्यांत आली आहे.

महानुभावी ग्रथांचा तत्त्वज्ञान व समाजशास्त्र यांच्या दृष्टीनेंहि मोठा उपयोग होण्यासारखा आहे.

प्रस्तुत ग्रंथाची रा. देशपांडे यांनीं सपादिलेली प्रत भाषेच्या अभ्यासकांस व संशोधकांस अत्यंत उपयोगी झालेली आहे व मुंबई-नागपूर येथील विद्यापीठांकडून तिची योग्य संभावना होईल असा मला भरंवसा आहे.

## प्राचीन वाङ्मयाचे तज्ज्ञ श्री· ना· कृ. गद्रे, वाई, यांचा अभिप्राय

आपणांकडून आपल्या कृपापत्रासह आलेलें "पंडित नारायण व्यास बहालिये कृत श्री ऋद्धिपुर वर्णन (ओवीबद्ध)" या नांवाचें मुद्रित पुस्तक लोकप्रसिद्धी-पूर्वीच मजकडे आलें तें मला पौष कृ० ७ शुक्रवारीं सायंकाळापूर्वीच पोंचलें. पाहून महानंद झाला.

"प्रस्तुत मालेचा उद्देश विश्वविद्यालयांतील उच्च शिक्षणाकरितां प्राचीन पुस्तकांची उणीव आहे ती भरून निघावी हा होय. याच दृष्टीने जुनी सोळाव्या शतकांतील टीप, कठीण शब्दांचा कोश आणि चिकित्सक प्रस्तावना दिली आहे." असें आपण पत्रीं लिहितां, ते यथायोग्यच आहे. आपण वरलि अवतरणान्तर्गत वाक्यांत व्यक्त केलेला उद्देश खरोखरच कालोचित आणि महोदारच आहे. आपल्या उद्योगाने मला अत्यानद होत आहे; आणि असल्या ह्या आपल्यासारख्या खऱ्या सरस्वतीभक्तास शोभणाऱ्या उद्योगास प्रत्यक्ष त्या ब्रह्मकुमारी वाग्देवीचाच 'शुभाशीर्वाद' सहज लभ्य असणार. आणि ती 'भक्तवत्सलनदिनी' आपणाकडून आपल्या संपूर्ण आयुष्यभर असल्या प्रकारची सेवा घेवो आणि माझ्यासारख्यास त्या सेवेच्या सत्फलाचा अंश प्रसाद म्हणून लाभूं देवो अशी मी त्या वाङ्माउलीची प्रार्थना करितों. आतां थोडी अवांतर चर्चा—ही केवळ अंगुलिनिर्देशापुरतीच मी करणार आहे. कारण आपली प्रस्तावना आणि तींतील संदर्भ समजण्यास अवश्य तो पुढील मूळ ग्रंथ आणि टीप वाचूनहि अशा चर्चेस जी कांहीं अत्यंत संकुचित बाब मला आढळली तिचा विचार करितां अधिक लेखनाची आवश्यकताच नाहीं. टीपग्रथ १६ व्या शतकांतील म्हणजे मूळ ग्रंथापासून कित्येक वर्षांनीं अर्वाचीन अर्थात जी ज्ञानेश्वरांची एकनाथोत्तर कालीं स्थिति तीच येथेंही, म्हणजे मुळाचा अर्थ आणि मूळ पाठही टीपकारास बरेच दुर्बोध झाले असण्याचा संभव. उ. १ लीच ओवी—"जे=देव=वाणी=परा—वाचा." येथें देववाणी जी परावाचा असें जे म्हटलें आहे तें चिंत्य दिसतें. देववाणी म्हणजे देव जो परमेश्वर त्याची वाणी म्हणजे वेद. आणि ह्या प्रकरणाचा शेवटही 'आगम' आणि 'निगम' असाच आहे. 'नंदनी' हें रूप खोटें. तें 'नंदिनी' असें म्हणजे मध्यम स्वर 'इ' असणारे हवे. त्या पदाचा अर्थ कामधेनुकन्या. 'कादिंबिनी' = कादंबिनी असेंच हवें. ह्याप्रमाणें सर्व ओवी लावूं लागलें तर एक परिच्छेदच लिहावा लागेल

आणि तितक्या योग्यतेची ती ओवी आहेही. केवळी परब्रह्मीं (ओ० ३) ह्यावरील टीपही अशीच चिंत्य आहे. केवळीं="मायायुक्त" हें चूक होय. केवळ-ल= मायारहित, विशुद्ध परब्रह्मीं=विशुद्ध अशा ब्रह्माचें ठिकाणीं हाच अर्थ. परब्रह्मावतारी हा प्रतिशब्द चूक होय.

## प्रो. द. सी. पंगु, एम्. ए., मराठी भाषेचे अध्यापक, राजाराम कॉलेज, कोल्हापूर, यांचा अभिप्राय.

प्राचीन मराठी वाङ्मय या ग्रंथमालेचा प्रथम खंड ऋद्धिपुरवर्णन हा ओवीबद्ध महानुभावी काव्यग्रंथ यवतमाळचे सुप्रसिद्ध सशोधक श्री. यशवंत खुशाल देशपांडे यानीं नुकताच सपादित केला आहे. प्रस्तुत ग्रंथाचा काल ज्ञानेश्वरोत्तर असल्यामुळें तत्कालीन भाषेचा ठसा यांत प्रामुख्यानें दिसून येतो. महानुभावी साती ग्रंथांपैकीं कालानुक्रमानें जरी हा शेवटचा असला तरी त्यांत समाविष्ट झालेल्या स्थल व व्यक्तिवर्णनांनीं यास पहिल्या प्रतीचें स्थान मिळण्यास हरकत नाहीं. ग्रंथकर्ते पंडित नारायण व्यास बाहाळिये यांच्या दिव्य प्रतिभेचा प्रत्यय या ग्रंथांत ठिकाठिकाणीं येतो. सारांश हा ग्रंथ वाङ्मयात्मक, धार्मिक, तात्त्विक इ० सर्वच दृष्टींनीं हृदयगम असून महानुभावी वाङ्मयोद्घाटनास याची बरीच मदत होईल यांत शंका नाहीं.

श्री. देशपांडे यानी या प्राचीन ग्रंथाच्या सपादनाने आपली वाङ्मयाभिरुचि, संशोधनप्रियता, उद्योगशीलता व दृढ व्यासंग इ० गुण लोकनिदर्शनास आणले आहेत. ग्रंथाचें प्रकाशनही काळजीपूर्वक झालें आहे. आरंभी ४४ पानांची विस्तृत प्रस्तावना जोडली असून तिच्यांत ग्रंथरचनाकाल, कविचरित्र, महानुभाव पंथाची माहिती, काव्याचा वर्ण्य विषय, मराठी वाङ्मयनिरीक्षण, तत्त्वज्ञान, जुने टीपग्रंथ, प्रतिलेखन, इ० मुख्य विषयांचा समावेश झाला असून त्यामुळें ग्रंथाशीं समरस होण्यास वाचकांस मुळींच अडचण पडत नाहीं. गोविंदप्रभु व चक्रधरस्वामी यांचीं दिलेलीं चरित्रें नवीन माहितीनें भरलेलीं असून मराठी वाङ्मयनिरीक्षणांत तर श्री देशपांडे यांची सर्वव्यापी व सूक्ष्म अशी संशोधनदृष्टी दृष्टोत्पत्तीस येते. काव्याचें व तत्त्वज्ञानाचें विवेचन विद्वत्ताप्रचुर झालें असून त्यावरून प्रस्तावनेची मट्टी उत्तम साधल्याचें दिसून येईल. मूळ ओवीबद्ध ग्रंथ जाड अक्षरांत छापला असून त्याच्याच खालीं बारीक अक्षरांत या ग्रंथावरील टीप (टीका) छापली आहे.

या नूतनोपक्रमानें मूळग्रंथाच्या आकलनास विशेष सुकरता आली आहे.

ऋद्धिपुर वर्णन हा ग्रंथ बी. ए. किंवा एम्. ए. परीक्षेस ठेवण्यास सर्वथैव योग्य असून श्री. देशपांडे यांनीं तो प्रस्तावना, टीपा, परिशिष्टें, पाठभेद इ० आधुनिक उपकरणांनीं सजवून विशेष सुसंघटित व सुबोध केला आहे.

## प. महंत श्री गोपीराज उर्फ महात्मा मुशाफीर, ऋद्धिपुर यांचा अभिप्राय.

श्रीमान् विद्यार्णव श्री. यशवंत खुशाल देशपांडे एम्. ए., एल्‌एल्. बी., या सद्गृहस्थानें पक्षपातरहित निरपेक्ष बुद्धीने पांच सहा वर्षांपासून पंजाब, थेट पेशावरपर्यंत प्रवासाचें कष्ट सहन करून मोठ्या आस्थेने महानुभावीय वाङ्मयाचा अभ्यास करून अज्ञात दालनांतील एक रत्न पंडितवर्य श्रीनारायणकवि उर्फ बहाळीये नारोव्यासकृत "श्रीऋद्धिपुरवर्णन" हा ग्रंथ मोठया प्रयासाने प्रकाशित केला. आणि त्या ग्रंथास श्री महाद्वार येथील स्थापित मूर्तींचा फोटो व स्थळवर्णात्मक श्रीऋद्धिपुर स्थान पोथीचा उतारा, श्रीराजमठाचा नकाशा, श्रीऋद्धिपुर चरित्रांतील उतारे व विस्तृत प्रस्तावना जोडल्यामुळे या ग्रंथास फारच महत्त्व आले आहे. या प्रकारें हा ग्रंथ प्रथमच या रूपांत प्रकाशीत करण्यांत आला आहे. साधनवंतांस व मराठीच्या सद्भक्तांस पूजनीय स्थळवर्णात्मक दृष्टीनें किंवा जुन्या मराठी वाङ्मयाच्या अभ्यासाच्या हेतूनें कां होईना या ग्रंथाचा अभ्यास करावा व सर्वांनीं एक एक प्रति संग्रहास ठेवावी. अशी आमची सर्वांना विनयपूर्वक शिफारस आहे.

## महात्मा मुकुंदराज आराध्य, माजी संपादक 'महात्मा' अमृतसर, यांचा अभिप्राय.

आपण छापविलेला "श्री ऋद्धिपुर वर्णन" ग्रंथ महंत श्री गोपीराज महानुभाव यांचे जवळून पाहिला. आपल्या धाडसाची जेवढी म्हणून तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. पुस्तक सर्वांगसुंदर वठलें असून आपल्या कुशाग्र बुद्धीची साक्ष पटवीत आहे. विद्वत्तापूर्ण प्रस्तावना, महाद्वाराचा नकाशा, श्री गोविंदप्रभूचें चरित्र, स्थानपोथींतील खाणाखुणा, आणि पाठभेद वगैरे तर ऋद्धिपुरवर्णनरूपी मुद्रिकेंतील रत्नपंचकाप्रमाणें शोभा देत आहेत. आपल्या या सत्साहसाबद्दल मी आपलें मनःपूर्वक अभिनंदन करीत आहे, व प्रत्येक महात्मधर्मानुयायी व काव्य-

रसज्ञास असल्या अप्रतिम ग्रंथाची एक एक प्रत संग्रहीं ठेवण्याची शिफारिश करीत आहे. भगवान श्रीचक्रधर अशीच आपल्या हातून सेवा घडवीत राहो अशी त्याचे चरणीं प्रार्थना आहे. शमिति.

## हात्मा संतराजशास्त्री, हरीपूर हजारा पंजाब, यांचा अभिप्राय.

**श्रीऋद्धिपुरवर्णन—**

श्री विद्वच्चूडामणि महानुभाव (महात्म) कुलावतंस पं. श्रीनारायणव्यास (बाहाळिये) कृत; प्रकाशक पुरातत्त्वज्ञ श्री. रा. रा. यशवन्त खुशाल देशपांडे बी. ए., एल. एल. बी., वकील (यवतमाळ, वराड).

आज इस ग्रन्थके अवलोकनका परम सौभाग्य मिला. उक्त ग्रन्थमे श्री चक्रधर स्वामीके साररूप पवित्र उपदेशको कवितामय गुणमे ग्रथितकर कविने अध्यात्म रहस्यके उद्‌घाटन करने मे "काव्यस्य प्रयोजन हि रसास्वादो राजपुत्र-प्रभृतीनामिति–" अलङ्कारिकोंके इस वाक्य का प्रत्यक्ष उदाहरण उपस्थित किया है। जैसा कि यह ग्रन्थ साम्प्रदायिक दृष्टया उच्चतम गौरव प्राप्तकर चुका है, वैसाही वैदर्भीरीति गुम्फित शान्तकरुण रस तथा तद्भास वा उपमा अतिशयोक्ति रूपक अनुप्रासादिशब्दार्थो अलङ्कारादियोंसे विभूषित होनेसे उतनाही काव्य दृष्टिसेभी सौष्ठवान्वित है।

इसपर प्रकाशक महोदयकी विस्तृत भूमिकाने सुवर्ण मुद्रिकामे कुन्दनका स्वरूप प्रकट किया है। तथा साथही परिशिष्टस्थान सूचि आदिसे ग्रन्थके आन्तरीय सौन्दर्य और छपाई सफाईसे बाह्यरूपभी विशेष मनोहर भासित होता है। मेरा उन महानुभावों तथा तत्त्वज्ञोंकी सेवामे सविनय अनुरोध है जो धार्मिक तत्त्वोमें तथा प्राचीन मराठी साहित्यमें विशेष अनुराग रखते हैं इस अप्रतिम ग्रन्थको अपनाकर महात्म वाङ्मयहितचिन्तक श्रीप्रकाशक महोदयकी वाङ्मय-सेवामें हात बाटावें।

## महात्मा प्रभाकरशास्त्री, लालामूसा, पंजाब, यांचा अभिप्राय.

पण्डित श्री नारायण व्यास बाहाळिये इत्येतैर्निर्मितः श्री यशवन्त खुशाल देशपाण्डे इत्येतैः सम्पादितश्च श्रीऋद्धिपुरवर्णनं नाम ग्रन्थः प्रस्तावनया परिशिष्ट-द्वयेन च सहितोऽद्य समालोकि मया समालोक्य च मनो मे मोदं मोदं हर्षं वितनुतेतराम्। यतो हि मम मानसमपि बहुदिनेभ्यः इदमेवाभिलषदासीत् यत् कदा नु

च्चे वा सटिप्पणीमिमां सप्तग्रन्थीं प्रकाशयितुमारप्स्यति यतः पाठकानामियं सुगमा भवेत् । तदेवेदं शुभदिनं समागमत्--यत् तस्या एकतमो ग्रन्थः टिप्पणीयुतो मुद्रितो दृष्टिगोचरतमागात् । अपि चास्य ग्रन्थस्य सम्पादकः पक्षरहिततामवलम्ब्य प्रस्तावनां परिशिष्टद्वयं च सम्पादितवान् । अनेन महानुपकारः पुरातत्त्वजिज्ञासूनां महाराष्ट्रभाषा-(मरहट्टी)-कोविदानां विशेषतो महानुभावधर्मानुयायिनाम् । अतः संग्राह्योऽयं सर्वैरिति साग्रहमनुरुन्धे निखिलान् महानुभावधर्माभिमानिनः ।

## महात्मा गोविंदराज दयाळराज, संपादक ज्ञानसिंह, पुणें, यांचा अभिप्राय.

मराठी वाङ्मयक्षेत्रांत महानुभावपंथीय कवी व लेखक यांनीं अद्वितीय दिग्विजय मिळविला आहे; महानुभाव कवींची कविता प्रतिभा पूर्ण कसोटीला उतरून ती आज बावनकशी ठरली आहे, हें सांप्रत प्रसिद्ध होणाऱ्या महानुभाव वाङ्मयावरून सहज दिसून येईल.

महानुभावेतर लोकांत आजपर्यंत महानुभाव पंथाविषयीं बराच अनादर वसत होता, व वाङ्मयक्षेत्रांत तर हा पथ अगदीच अजाण आहे, अशी सर्वत्र समजूत होती. परतु कांहीं महानुभाव व महानुभावेतर विद्वानांच्या आटोकाट परिश्रमानें जेव्हां महानुभावपंथांतील ज्ञानभांडार उजेडांत येऊ लागलें तेव्हां या पंथाविषयीं महानुभावेतरांच्या मनांतील अढी हळूहळू निवळू लागली, व महानुभाव वाङ्मयाविषयीं पूर्ण आदर वाटून ते महानुभाव वाङ्मयामृताचें पान करूं लागले. यावरून महानुभाव पंथाचे व मराठी भाषेचे दुर्दिन संपत आले असून उन्नतीचे दिवस जवळ येत चालले असें आम्ही समजतो. आजपर्यंत महानुभाव पंथाची ज्ञानप्रबोध, एकादश स्कंद, शिशुपालवध, वत्सहरण हीं चार प्रतिभासंपन्न काव्यें प्रसिद्ध झालीं असून या काव्यावर मराठी वाङ्मयसंशोधक लुब्ध झाले आहेत. या चार काव्यांपैकीं मुंबई युनिव्हर्सिटीनें शिशुपालवध एम्. ए. च्या परिक्षेसाठीं ठेवलें असून वत्सहरण बी. ए. ला ठेवलें आहे. याच तोडीचें किंबहुना कांकणभर ज्यास्त प्रतिमासंपन्न असें 'ऋद्धिपुरवर्णन' हें काव्य आहे. वैदिकधर्मीयांना काशी, भागवतधर्मीयांना पंढरपूर अगर परधर्मीय इस्लामीयांना मक्का, ख्रिस्तीयांना जेरुसलेम हीं स्थानें जशीं पवित्र आहेत तद्वतच महानुभाव-पंथीयांतील आबालवृद्धांना 'ऋद्धिपूर' हें क्षेत्र प्राणापलीकडेही पवित्र आहे. अशा पवित्र क्षेत्राचें वर्णन ज्या ग्रंथांत

आहे तो ग्रंथ पर्यायानें महानुभावीयांना किती पवित्र असणार हें सांगावयास नको.

या काव्यांतील प्रतिभा, पावित्र्य व ऐतिहासिक महत्त्व पाहून कोणताही महात्मपंथीय जीव मोहवश झाल्याशिवाय राहाणार नाहीं? परंतु काळाच्या अतर्क्य घडामोडींत या स्थळाचें ऐतिहासिक महत्त्व नामशेष होऊ पहात असेल, अगर पंथांतरानें जरी इतरांना या काव्याचें पावित्र्य भासत नसलें तरी या काव्याची प्रतिभा कोणत्याही वाङ्मयभक्ताला वेडावून सोडील व असलें काव्य निर्माण करणाऱ्या पं. नारायण व्यास बहाळिये महानुभाव यांचेविषयीं प्रेमादर उत्पन्न करील यांत तिळमात्र शंका नाहीं.

या काव्यांत ऋद्धिपुरवर्णनाबरोबर महानुभाव तत्त्व-भांडारही पूर्ण भरलें आहे, हें याचें वैशिष्टय आहे. या दृष्टीनें हा एक महानुभाव पंथाचा मोठा फायदाच आहे. काव्यदृष्टया विचार केल्यास निरनिराळ्या कोमल भावनांचा हा फुलबाग आहे, असें कोणाही रसिकाला वाटल्याशिवाय राहणार नाहीं; व तो भ्रमर होऊन या फुलबागेंतील भावनारस चाखतांना देहभान विसरल्याशिवाय राहणार नाहीं.

राजमठांत शिरतांना भाविक जीवात्मा देहभान कसा विसरून जातो व त्याला कसा आनंद होतो याचें सुंदर काव्यचित्र रेखाटतांना कविही प्रत्यक्ष देहभान विसरे. व त्या समाधीस्थितींतच जें उपमोपमेयाचें सुंदर नंदनवन निर्माण केले त्यांत कोण मोहून जाणार नाहीं ?

व्याधा पासोनि सुटले : आतुं पक्षिणीचे पिलें :
जेवि निडी गिवीनु आले : जननिएतें ॥ ८५ ॥
जेवि असंभाव्रियांचें लेकरू : घे पयोपात्रि हावरू :
तै दैवदत्त क्षीरसागरूं : जेवि लाहे : ॥ ८६ ॥
साधनांचा चरितार्थी : जैसी साध्याची प्राप्ती :
नातरी व्याधिग्रस्ता अमृती : सौरसू लाहे : ॥ ८७ ॥
जगाबाहेरी अवचिता : मीन पडे चडफडिता :
तो दैववशें मागौता : जळेचि लाहे : ॥ ८८ ॥
तेवि तिये राजभुवनीं : जो आनंद भरला मनी :
तो कांइ एकी वाचा वाणी : प्राकृत मी : ॥ ८९ ॥

असलीं कितीतरी या काव्यांतील सुंदर स्थळें मांडतां येतील. परंतु ह पुस्तक-

परीक्षणाचें स्थळ नाहीं. स्थळ वर्णनें नानाविध रसात्मक वेंचें या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत आलींच आहेत. तेव्हां त्यांची पुनरुक्ति करणें बरे नाहीं. असो.

श्री. य. खु. देशपांडे यांनीं आरंभिलेल्या महानुभावपंथीय प्रतिभासंपन्न वाङ्मय उजेडांत आणण्याच्या सत्कार्याकडे पाहिलें म्हणजे श्री गोविंदप्रभूंच्या "मोगरसूला" ची आठवण होते. भगवान गोविंदप्रभु कुंभाराला इनाम देऊन गोरगरिबांना आवा लुटवीट असत तद्वतच श्री. देशपांडे यांनीही महानुभाव वाङ्मयभांडाराचा 'मोगरसूल' चालविला असून त्यांनीं या वाङ्मयाचा स्वाद सर्वांना सुलभ केला आहे. त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. या यांच्या प्रयत्नानें महानुभावपंथाला आपला उन्नतीचा मार्ग बराच सुलभ करून दिला आहे, अशी आमची प्रामाणिक समजूत आहे. या त्यांच्या कृत्यानें त्यांचेबद्दल आम्हाला जी कृतज्ञता वाटते, ती वर्णन करण्याला मराठी भाषेत तरी आम्हाला बरोबर शब्द दिसत नाहीं. या पुस्तकाचें शेवटीं स्थानपोथी दिली असून भगवान गोविंद-प्रभूचीं कांहीं लीलाचरित्रे दिलीं आहेत. त्यामुळें या पुस्तकाला अधिक उठाव आलेला आहे. प्रस्तावना वगैरेंनीं पुस्तक सर्वांगसुंदर झालें आहे.

या पुस्तकासोबत राजमठाचा एक जुना नकाशा जोडला आहे. ही गोष्ट ऐति-हासिकदृष्ट्या बरीच महत्त्वाची आहे.

श्री. जयवंतराव नारायणराव लोणकर पाटील ऑ. म. यवतमाळ यांनी ह्या ग्रंथाच्या प्रकाशनाचे कामीं आर्थिक मदत केली आहे. ही त्यांना भूषणावह आहे. महानु-भावपंथीय बरेच उदार धनिक सद्गृहस्थ आहेत. त्यांनी ही गोष्ट मनावर घेतली तर, असले बरेच प्रतिभासंपन्न ग्रंथ प्रकाशित होऊन महानुभावपंथाच्या सच्च-रित्रावर उत्तम प्रकाश पडेल व हा पंथ जगाला आदर्श होईल, अशी आम्हाला उमेद आहे.

मुंबई युनिव्हार्सिटीनें ज्याप्रमाणें, मराठी भाषेसाठीं मागें उल्लेखिलेलीं टेक्स्ट-बुकें म्हणून नेमली, तद्वतच हेंही काव्य नेमल्यास भावी पिढींत मराठी भाषेला नमुनेदार स्वरूप येऊन प्रतिभेच्या बाबतींत इतर भाषेची जननी होईल अशी आमची शिफारस आहे.

शेवटीं पुन्हां एकदां श्री. देशपांडे यांचे त्यांनीं चालविलेल्या अचाट प्रयत्ना-बद्दल आभार मानून लेखणीस विराम देतों.

---